# निवेदन

* आ परितोषात् विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम्

मेघदूत हें कालिदासाचें काव्य केवळ कपोलकल्पित आहे काय ? ही त्याच्या स्वतंत्र प्रतिभेची स्वतंत्र भरारी आहे ?– मेघदूताच्या कर्त्याला त्यांतली मध्यवर्ती कल्पना कशी सुचली ? यक्षवृत्तान्त हा कवीचा आत्मानुभव आहे काय ? मेघदूताचे मूलाधार कोणते ? यक्ष कोण ? हा एक अनामिक यक्ष कालिदासानें अवचित कसा निर्मिला ? त्याचें गणगोत ( अर्थात् वाङ्मयीन ) कुठलें ? कालिदासाच्या प्रतिभेत तो जन्मला कसा ? आणि हें यक्षाचें विरहकथानक कोठून आणलें ? मेघदूतांतील रामगिरि काल्पनिक कीं खरा ? खरा असल्यास कोणता ? रामटेक म्हणतात तो बरोबर कीं चुकीचा ? प्राचीन टीकाकार रामगिरीलाच चित्रकूट म्हणतात आणि आधुनिक विद्वान् हें मत नाकारतात, हें गौडबंगाल काय आहे ? खरा चित्रकूट कोणता ? आणि तोच रामगिरि हें म्हणणें युक्त कीं अयुक्त ? मेघाच्या प्रवासाचा मार्ग कोणता ? त्याची दिशा कोणती ? मुळांत मेघदूत रचण्याची स्फूर्ति कालिदासाला कां व कशी झाली ? महाकाव्याची प्रथा मोडून मध्येंच खंडकाव्याची वीज कशी चमकली ? हें काव्य सुचलें केव्हां-रचलें कुठें ? निर्मितीचें निमित्त काय ? हेतु कोणता ? मेघदूतांतील या सान्या न सुटलेल्या समस्या आहेत. या यक्षप्रश्नांचा उलगडा हें प्रस्तुत लेखनाचें उद्दिष्ट होय.

प्रस्तुतच्या संशोधनांतून मुख्य निष्कर्ष निघाले ते असेः—

१. मेघदूतांतील रामगिरि म्हणजे नागपूरजवळचें रामटेक नव्हे.

२. रामगिरि म्हणजे एक काल्पनिक डोंगर अशीहि एक समजूत आहे. त्याचप्रमाणें रामगिरि कोणता हा केवळ भौगोलिक व शुष्क वादविवाद करण्याजोगा प्रश्न आहे असेंहि मत कांहींनीं मांडलें आहे. या दोनहि समजुती चुकीच्या आहेत. हल्लींच्या मध्यप्रदेशांतील रामगड हाच कालिदासानें वर्णन केलेला रामगिरि होय.

३. रामगडपासून पश्चिमेला अमरकंटक पर्वत व नर्मदेच्या कांठाकांठानें भिलसा; नंतर आणखी पश्चिमेकडे उज्जयिनी व मग उत्तरेकडे वळून हिमालय आणि अलका हा कालिदासाला अभिप्रेत असलेला मेघमार्ग होय.

४. एवढेंच नव्हे तर रामगिरि अर्थात् आधुनिक रामगड हाच प्राचीन चित्रकूट होय.

५. अलीकडे रूढ झालेली चित्रकूट व नाशिकची पंचवटी हीं स्थळें चुकीचीं आहेत. हल्लीं समजला जातो तो राममार्ग अनैतिहासिक आहे. अयोध्येहून निघून

दक्षिणेकडे रामगडद्वारा ओरिसांतून राजमहेंद्रीनजीक पूर्वगोदावरीच्या कांठची पंचवटी हा रामाचा वनवासांतील खरा मार्ग होय.

६. पूर्वीचें दण्डकारण्य म्हणजे हल्लींचा महाराष्ट्र व विदर्भ अशी प्रचलित समजूत आहे. तसें नसून हल्लींचा मध्यप्रदेश ते आंध्र ( छोटा नागपूर प्रांत, गोंडवन, बस्तर संस्थान इ० मुलुख ) हें खरें प्राचीन दंडकारण्य होय.

७. कालिदासानें मेघदूतांत आपल्या सोयीसाठीं चित्रकूटाचा रामगिरि करून घेतला; किंबहुना तो या पर्वतावर प्रत्यक्ष आला असतांना हें काव्य सुचलें व रचलें. हल्लींचा उपेक्षित **रामगड हेंच मेघदूताचें स्फूर्तिस्थान व जन्मस्थान होय.**

८. यक्ष हा वेषांतर केलेला विरही राम होय. एवढेंच नव्हे-तर मेघदूतांतील कथानकाचा सर्व सांगाडा वाल्मीकीचा आहे. रामचरित्रांतील ठिकठिकाणचे प्रसंग, ऋतु व स्थळें यांचीं वर्णनें आणि कल्पना एकत्र करून जुळवून मेघदूत रचलेलें आहे. यक्षकथा ही कांहीं अंशीं फिरवून घेतलेली रामकथाच. अनामिक यक्ष नव्हे, **अनामिक राम हा मेघदूताचा प्रच्छन्न नायक होय.** मेघदूत म्हणजे महाकाव्यांतून निघालेलें उपकाव्य. वाल्मीकि व कालिदास यांच्या प्रतिभांचें मधुर मीलन. त्यांतून आरपार दिसण्याकरितां कालिदासाच्या कृतीवर वाल्मीकीच्या मूळ काव्याचे क्ष किरण पाडले म्हणजे यक्षांतला राम दिसूं लागतो आणि मेघदूतांतला रामचरित्राचा सांगाडा डोळ्यासमोर उभा राहतो !

हे सर्व सिद्धांत पुढील पानांतून *प्रमाणांसहित मांडले आहेत.* वस्तुतः वाल्मीकीची रामकथा हीच या काव्यांतील कोडीं उकलण्याची गुरुकिल्ली होय. पडताळ्याचें साधन या दृष्टीनें तर तें अमोल आहे. परंतु दुर्दैवानें आतांपर्यंत त्या दिशेनें संशोधनाचा प्रयत्न झाला नाहीं. या नवीन दृष्टीनें केलेलें हें वाङ्मयीन उत्खनन होय असें म्हणतां येईल. रामचरित्राच्या रवीनें मेघदूताचें मंथन केलें आहे. त्यात सांपडलें तें रसिकांपुढें ठेवलें आहे. *अर्थात् क्रम व संगति लावून.*

रामगिरि कोणता ? हा प्रश्न 'केवळ भौगालिक' नाहीं. तो रसास्वादाशीं निगडित आहे. इतकेंच काय पण त्याचा मेघदूताच्या निर्मितीशीं कार्यकारणसंबंध आहे ! तो निरूपणाच्या ओघात कळेल. सर्व दृष्टींनीं, तो प्रारंभबिंदु तसाच केंद्रबिंदु आहे. म्हणूनच मेघाप्रमाणें आम्हींही आमच्या प्रवासाचा आरंभ रामगिरीपासून केला आहे. *मेघदूतांतील स्थळें व कूटस्थळें जशीं रामायणाच्या अनुरोधानें* उलगडतात, त्याप्रमाणेंच उलट रामाच्या मार्गाचें कोडें मेघमार्गाच्या मदतीनें कसें सुटतें, हेंहि पुढें दाखविलें आहे. मेघदूताचें रामकथासंबंधित्व व त्याची व्याप्ति सुस्पष्ट न झाल्यामुळें आणि आतांपर्यंत रामगिरीचा व मेघमार्गाचा बरोबर स्थलनिश्चय न झाल्यामुळें तद्विषयक मेघदूतांतलें रहस्य व सौंदर्य यांचें यथायत् ग्रहण होणें शक्य होत नव्हतें. कोणत्याहि प्रश्नाच्या सर्व बाजू कळल्या नाहींत, तर अंधगजन्यायानें पसगत होते. मेघदूताचें मूल्य, मर्म व माधुर्य यांचें यथायोग्य मोजमाप व्हावयाला

हवें असेल तर त्या काव्याची पूर्वपीठिका व जन्मकहाणी माहीत हवी. निदान ती स्थूलमानानें बरोबर अंदाजतां आली पाहिजे. तरच तें काव्य कां निर्माण झालें, कशांतून निर्माण झालें, आणि आहे **तसेंच** कां झालें, या मौलिक प्रश्नांचा छडा लावतां येईल. हा कार्यकारणभाव उलगडण्याचा हट्ट प्रस्तुत संशोधनाच्या मुळाशीं आहे.

● ● ●

प्रस्तुत ग्रंथांत मांडलेले सिद्धांत विभक्त किंवा विस्कळीत नाहींत. उलट सूर्यमालेंतल्या ग्रहांप्रमाणें ते परस्परसंबद्ध असून त्यांचा एकमेकांना जोर आहे, ही त्यांतली मौज आहे. एक प्रकारें हें त्या सिद्धांतांच्या सत्यतेचें लक्षण होय, असें म्हणतां येईल. हे सर्व सिद्धांत प्रारंभींच्या सात प्रकरणांत क्रमानें व शास्त्रीय पद्धतीनें मांडले आहेत. इतिहासाच्या प्रांतांत शिरतांना डोळ्यावर पूर्वग्रहांचा काळा चष्मा उपयोगी नाहीं. त्यांतून सत्य दिसणार नाहीं. संशोधनमंदिराच्या प्रवेशद्वारींच मल्लिनाथाची पाटी लावलेली हवी :

नामूलं लिख्यते किंचिद् नानपेक्षितमुच्यते ।

प्रस्तुत लेखनांत हें पथ्य सांभाळण्यावर कटाक्ष आहे. फक्त आठव्या ज्ञातांत 'मेघदूताची जन्मकथा' सांगतांना भाव कल्पनाशक्तीला रान मोकळें सोडावें लागलें आहे. मेघदूताचें जन्मरहस्य आतां कोण सांगणार? बोलून चालून ही उणीव भरून काढण्याचा हा यत्न आहे. ही जन्मकथा 'जुळविलेली' असली तरी सत्याशीं लगट करणारी आहे खास.

सदरील संशोधनानें मेघदूत काव्याकडे पहाण्याचा दृष्टिकोनच बदलेल; संस्कृति आणि काव्य यांचा विकास परंपरेंतून क्रमबद्धतेनें व कदलीदलन्यायानें कसा होत आला आहे याचा प्रत्यय येईल. या 'नव्या प्रकाशा'नें मेघदूतकाव्य व त्याचा कर्ता यांची भूमिका व पूर्वेतिहास कळेल. आणि ह्या पूर्वपीठिकेच्या उंचीवरून या काव्यांतील रसवत्ता, रहस्य व रमणीयता यांचा आस्वाद डोंगरावरून तळचा देखावा पहाणाऱ्या माणसाप्रमाणें अधिक व्यापकतेनें घेतां येईल. एवंच, या अद्वितीय काव्याचें आकलन आतां अधिक यथार्थतेनें होऊं शकेल, अशी आशा आहे.

● ● ●

कांहीं कारणानें मेघदूत चाळतांना पहिल्याच श्लोकांत रामगिरि लागला. टीकाग्रंथांतून पहावें तों सगळीकडे एकाच मताचें प्राबल्य–नागपूरजवळचा रामटेक म्हणजे रामगिरि! परंतु रामटेक मनाला पटेना. खटकूं लागला. कांहींनीं तर काल्पनिक म्हणून रामगिरीची वासलात लावली आहे, तीहि रुचेना. अमरकंटक, नर्मदा, विदिशा, उज्जयिनी, कुरुक्षेत्र, गंगानदी, हिमालय, मानससरोवर, कैलास हीं व आणखी बारीकसारीक स्थळेंसुद्धां खरीं, मग एकटा रामगिरीच तेवढा काल्पनिक

सुस्पष्ट झाली. सारांश, रामायणांत दडलेली किल्ली सांपडतांच आतांपर्यंत घट्ट बसलेलीं कुलुपें लीलेनें उघडूं लागलीं ... पण तें सर्व ग्रंथांत आढळेल.

कर्मधर्मसंयोग असा कीं, रामगिरि शोधांत असतांना हे अन्य सिद्धान्त गवसले! मुंगा नादांत लाकूड पोखरीत असतो. तें कोरतां कोरतां श्री ग असा अक्षरांच्या कांहीं आकृति यदृच्छेनें दिसूं लागतात. अशा घुणाक्षरी वळणावर या ग्रंथाची पहिली श्री निघाली आहे. मग त्याचा श्रीगणेशा करून ग्र पर्यंत पोंचविला. विहीर खणतांना मोहोरांचें डमोलें सांपडावें किंवा कणीकोंडा धुंडाळतांना पंच-पक्वान्नांचें ताट वाढून यावें, असा गोड अनुभव प्रस्तुत समयीं आला. पणती पेटवितांना दीपमाला प्रकटली.

डोक्यांत भरलेला विषय ग्रंथांत उतरवून झाल्यानुळें इतके दिवस भारावलेलें मन वर्षाव केलेल्या मेघाप्रमाणें हलकें व मोकळें झालें आहे. आतां पुनः नवें जल शोषून जड होईपर्यंत वाऱ्यावर फिरायला मोकळीक! प्रस्तुत वृष्टीचा उपयोग झाला तरठीकच, त्याकरितां तर एवढा अट्टाहास. पण सुगंध नुसत्यापुरती जमीन भिजली तरी पुष्कळ झालें. सिंचनाची तृप्तता काय थोडी आहे! त्या आंतल्या पावतीपेक्षां अधिक समाधान तें कोणतें!

• • •

कालिदासाचा शब्दप्रयोग वापरून बोलावयाचें तर त्याच्या काव्यांतील रहस्य-संशोधनाचें उंच फळ तोडूं पहाणारा मी खरोखरीचाच 'वामन' आहे. कुमारसंभवांतील पार्वतीप्रमाणें प्रस्तुत लेखकाची अवस्था मावेल खरी—

जनोऽयमुच्चैःपदलंघनोत्सुकः

पण या आपल्याला कालिदासाविषयींचें प्रेम व औत्सुक्यबुद्धि कारणीभूत आहे. त्या महाकवीच्या संशोधनपूजेसाठीं हा नवकुसुमांचा हार भक्तीनें-धिटाईनें रचला आहे. जेव्हां केव्हां त्या कविकुलगुरूची अंधारांतील चरित्र-मूर्ति आपल्याला स्वच्छ दिसूं लागेल तो सुदिन. प्रस्तुतचा यत्न, तो सुयोग जवळ आणण्याच्या खटपटींतीलच एक भाग—एक अल्प किरण.

१ जुलई १९५८
शिवरामपंत परांजपे रस्ता
*११२६ बुधवार, पुणें २

वामन कृष्ण परांजपे

# अविस्मरणीय

पुढील ग्रंथालयांनीं पुस्तकांचा उपयोग करण्याचे बाबतींत भरपूर सवलत दिली. रॉयल एशियाटिक सोसायटी मुंबई, पुण्याची सरकारी वेधशाळा, भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट, भारत इतिहास संशोधक मंडळ, केसरी-मराठा ग्रंथालय, फर्ग्युसन कॉलेजची वाडिया लायब्ररी इ०. खालील सज्जनांनीं आपल्या जवळचीं पुस्तकें व नकाशे वापरण्याकरितां दिले. श्री. वि. त्र्यं. शेटे, श्री. शंकरराव ओक, सुरेश घोरपडकर, श्री. वि. मा. देशमुख वकील, डॉ. चा. रा. ढमढेरे, ॲड॰ एस्. जी. निर्गुडकर, श्री. जयंतराव टिळक, महामहोपाध्याय पोतदार इत्यादि.

*अवाढव्य प्रकाशनें हिंमतीनें शिरावर घेणारे आमचे य. गो. जोशी आणि 'साधना' चे व्यवस्थापक श्री. वझे यांचा मी आभारी आहें. लेखनाच्या प्रांतांतले माझे कायमचे सल्लागार श्री. ह. स. गोखले हे आभारांच्या पलीकडचे आहेत! इतकें सर्व करूनहि अडूर-गुहागरचे श्री. दा. वि. जोगळेकर (कारखानदार, मुंबई) यांनीं ऐन वेळीं आर्थिक साहाय्य देऊं केलें नसतें, तर प्रस्तुतचा 'प्रकाश' अंधारांतच राहण्याचा संभव होता!*

शेवटीं एक अप्रत्यक्ष ऋण नमूद करतों. या प्रसंगीं माझ्या पूज्य आजोबांची (कै. शिवरामपंत परांजपे) मला पदोपदीं आठवण होते. वेड्या मनाला वाटतें कीं, आजहि ते हवे होते. अण्णा! तुमच्या त्या रसभरित अध्यापनाची व वाङ्माधुर्याची माझी स्मृति कधींतरी म्लान होईल काय?

पाषाणादपि पीयूषं स्यन्दते यस्य लीलया ।

*असा त्यांच्या वाणीचा अधिकार होता. त्यांच्या छत्राखालीं मी लहानाचा मोठा झालों. माझ्या हातून जें कांहीं होतें तें त्यांच्याच कृपेचें फळ, अशी माझी श्रद्धा आहे.*

—लेखक

# ऋणानुबंध

माझे स्नेही श्री. वामनराव परांजपे, वकील, यांचें 'मेघदूतावर नवा प्रकाश' हें पुस्तक मी आज आनंदानें प्रसिद्ध करीत आहें.

या 'नव्या प्रकाशा'नें बऱ्याच जुन्या समजुतींना धक्का बसेल. त्यांत अनेक महत्त्वाचे सिद्धांत मांडलेले आहेत. विषयाचें संशोधन अत्यंत चिकित्सकतेनें केलेलें असून विषयप्रतिपादन मनोरम शैलीने केलेलें आहे.

प्रबंधाचा विषय संशोधनात्मक, अतएव रूक्ष असला तरी श्री. वामनरावांची लेखणी ही कै. शिवरामपंत परांजपे यांच्या घराण्यांतील असल्यामुळें-या लेखनावर 'शिवरामपंती' झाक आहे. मूळ 'मेघदूत' ज्यांनी वाचलें नसेल त्यांनाहि हें पुस्तक अत्यंत आकर्षक व मननीय वाटेल.

या पुस्तकाचें विद्वान् व रसिक वाचकांकडून स्वागत होईल ही मला खात्री आहे.

—यशवंत गोपाळ जोशी

# राममार्ग व मेघमार्ग




हे दोनहि मार्ग रामगडपाशीं मिळतात. म्हणूनच रामगड = रामगिरि = चित्रकूट.
रामायणांतून मेघदूत निघालें, त्याप्रमाणेंच राममार्गांतून मेघमार्ग फुटला आहे.
रामप्रसिद्ध चित्रकूटालाच कालिदासानें रामगिरि संबोधिलें.

रामाचा मार्ग बाणांनीं व मेघमार्ग ढगांच्या मालिकेनें दर्शविला आहे.

## मेघदूतावर नवा प्रकाश



---

सुखांत व संकटांत
जिनें सारखींच सोबत केली त्या
सौ. प्रमिलेस

# नान्दी

सरस्वतीं प्रणम्यादौ वंदे तं कवि-कोकिलम्
अ-वसन्तेऽपि श्रूयन्ते यस्य ध्वनिमनोहराः

मेघदूतसमस्त्यासु लग्नः संजातचापलः
उद्भासितं च यत्तत्र रहस्यं वक्तुमुत्सहे

वाल्मीकिस्कंधमारुह्य मेघकाव्यं विनिर्मितम्
अनामिको न यक्षोऽसौ रामः प्रच्छन्ननायकः

रामायणोपजीवित्वं कवेश्च प्रतिमा नवा
उभयोः संगमो रम्यः ग्रंथेऽस्मिन् कीर्तितो मया

आदिकाव्यानुसारेण कालिदासेन वर्णितः
स पंथा दर्शितोऽप्यत्र रामस्य वनचारिणः

रामस्य चित्रकूटोऽसौ तेन रामगिरिः कृतः
तुंगं शैलं तमाश्रित्य स्फूर्तिः श्लोकत्वमागता।

अद्य रामगढाख्योऽयं बोद्धव्यः स गिरिर्महान्
अधुना मध्यदेशोऽसौ पुरा यत् दंडकावनम्

अनुत्तीर्य नदीं रेवां केवलं चाऽनुनर्मदः
वातानुगश्च यक्षोक्तः मेघमार्ग उदाहृतः

कूजन् सुरचितं ' मेघं ' पीतरामकथाजलम्
कोकिलः स स्वयंप्रज्ञः परभृत् नैव भासते

अन्वेष्य पूर्ववृत्तं तत् लुप्तपूर्वं मयाऽधुना
ग्रथितं च प्रकाशार्थं आरंभः खलु सिद्धये

तं बुधा ज्ञातुमर्हन्ति सारासारविचक्षणाः
क्षीरं गृह्णन्तु ते हंसा विदग्धा लुब्धमानसाः

या शैशवात् प्रमुदितो रसनारसेन
तत्काव्यगूढकमले मधुपोऽस्मि बद्धः
उन्मीलनं प्रकटयन् कविगौरवार्थं
अभ्यर्थये रसविदामवधानदानम्

—

झोत १ ला

# रामगिरि म्हणजे रामटेक नव्हे

यक्षश्चक्रे जनकतनयास्नानपुण्योदकेषु
स्निग्धच्छायातरुषु वसतिं रामगिर्याश्रमेषु

—मेघदूत, श्लोक १ ला

कालिदास हा जसा भारतीयांच्या कौतुकाचा तसाच कुतूहलाचा विषय आहे. त्याच्या कृति आपल्यासमोर आहेत, पण आकृति नाहीं. म्हणूनच प्राचीन अंधकारांतून या कविश्रेष्ठाविषयींच्या जुन्या वृत्तान्ताचे नवे ज्ञानकण उपलब्ध व्हावेत, यासाठीं रसिक चातकासारखे टपलेले असतात. उज्ज्वल पूर्वजांची नवी माहिती मिळविण्यांतला संशोधकांचा आनंद तर पुत्रजन्मसम असतो. आत्मीयतेची भावना हें त्याचें एक कारण असूं शकेल. तथापि जिज्ञासापूर्ति ही त्या सात्त्विक आनंदाची खरी जननी होय. कार्यकारणभाव शोधण्यांत सारें स्वारस्य व सौंदर्य सांठविलेलें आहे. त्यांतच प्रगतीचीं बीजें असतात. कालिदासाच्या काव्यांपैकीं मेघदूताची मोहिनी विशेष आहे. दोन हजार वर्षे झालीं तरी या टुमदार व टवटवीत काव्याची पकड कमी होत नाहीं ! छोटेखानी असल्यामुळें अत्तराच्या फायाप्रमाणें सहज हुंगावा किंवा खडीसाखरेच्या खड्याप्रमाणें जातां येतां आस्वाद घ्यावा, असा त्याचा गोडवा आहे. चाल मंदमधुर, गोडी अवीट, थाट आटोपशीर असा त्याचा थाट आहे. पण मुळांत याचें रोप कोठून आणलें ? हा काव्यतरु रुजला, वाढला फुलला कसा ? हाच कार्यकारणभाव पुढील पानांतून उलगडलेला दिसेल.

## मेघदूतांतील समस्या रामायणाच्या साहाय्यानें सुटतात

प्रथम मेघदूतांतील 'रामगिरि' कोणता हें निश्चित करावयाचें आहे. या बाबतींत एकूण चार मतें किंवा पक्ष आहेत. त्यांपैकीं रामटेक म्हणजेच रामगिरि हा इल्लींचा प्रचलित व सर्वांत प्रबळ पक्ष होय. मेघदूतावरचें कोणतेंहि पुस्तक व त्यांतील मेघमार्गाचा नकाशा पहावा तों त्यांत नागपूरजवळचें रामटेक हाच रामगिरि म्हणून दाखविलेला असतो. एकंदरीनें रामटेकच सध्यां गृहीत धरून चालतात. तथापि रामटेक मार्मिकांना मान्य होण्यासारखा नाहीं; म्हणूनच कालिदासाचा रामगिरि अद्यापपर्यंत अनिश्चित आहे, असेंच म्हटलें पाहिजे. भारत सरकारच्या साहित्य ॲकेडमीनें मेघदूताची अधिकृत आवृत्ति, डॉ. सुशीलकुमार डे

यांनीं संपादित केलेली, नुकतीच प्रसिद्ध केली आहे. त्यांत रामगिरिविषयक आजची संशोधनाची स्थिति खालीलप्रमाणें दिली आहे. ( पृष्ठ ११३ )

Ramagiri—The exact location of this hill is uncertain. Both Vallabhadeva and *Mallinatha* say *that it is Chitrakuta.* Wilson identified it with Ramtek 'The hill of Rama', which is still a place of pilgrimage, situated about 24 miles to the north of Nagpur, and this conjecture is supported, according to *V. V. Mirashi*, by *an inscription* of Pravarasena II. Some would identify it with Ramagarh hill in the Madhya Pradesh, situated near Amrakuta which is the source of the river Narmada. Or *is the place as imaginary as the poet's myhtical Alaka ?*

रामगिरीविषयीं विद्वानांत व संशोधकांत एकवाक्यता नाहीं. प्राचीन संस्कृत टीकाकार रामगिरि म्हणजे चित्रकूट असें मानतात. रामटेक-सिद्धान्त प्रथम १८१३ सालीं विल्सनसाहेबांनीं प्रतिपादन केल्यापासून आतांपर्यन्त बराच बळावला आहे. तिसरा रामगड-पक्ष. हा सर्वांत क्षीणबल आहे. तो मान्य करण्याकडे फारसा कोणाचा कल नाहीं. अलीकडे तर सर्वांनीं त्या बिचाऱ्याचा हक्क बाजूस सारला आहे! चवथें मत असें कीं, हा रामगिरि म्हणजे अलकेप्रमाणेंच केवळ कपोलकल्पित होय; परंतु मेघदूतांतील रामगिरि काल्पनिक नाहीं. एवढेंच नव्हे तर कालिदासानें मेघदूतांत खऱ्याखुऱ्या पर्वताचें खरेंखुरें वर्णन केलेलें आहे आणि तो पर्वत म्हणजे हल्लींच्या मध्यप्रदेशांतील ईशान्य टोकाला असलेला उत्तुंग रामगड पर्वत हा होय हाच खरा रामगिरि, याचा प्रत्यय प्रस्तुत संशोधनावरून येईल; एवढेंच नव्हे तर हाच प्राचीन चित्रकूट आणि म्हणूनच याला कालिदासानें 'रामगिरि' केला. हे दोनहि सिद्धान्त रामायण-प्रदीपाच्या उजेडांत वाचकांना स्पष्ट दिसूं लागतील. पण त्याच्याआधीं *ठेंगणा व नर्मदेच्या दक्षिणेला असलेला रामटेक रामगिरि* होऊं शकत नाहीं, हें दाखविलें पाहिजे. त्यासाठींच हा पहिला झोत आहे.

अलीकडे नागपूरचे प्रो. मिराशी यांनीं रामटेकबाबत बरीच खटपट करून रामटेकचें जोरदार समर्थन चालविलें आहे. त्यासंबंधींचा त्यांचा 'मेघदूतांतील *रामगिरि' हा विस्तृत लेख त्यांनीं आपल्या संशोधनमुक्तावलींत ( सर पहिला )* संग्रहित केला आहे. सदर लेखाच्या आरंभीं प्रो. मिराशी लिहितात कीं, मेघदूतांतील माहितीवरून " रामगिरीचें स्थान निश्चित करणें शक्य आहे; तथापि या बाबतींत पद्धतशीर प्रयत्न कोणीं केलेला आमच्या पहाण्यांत नाहीं. " स्वतः मिराशींनीं या बाबतींत प्रयत्न केला आहे. पण तो 'पद्धतशीर' नाहीं! त्यामुळें त्यांची 'दिशा'

चुकली आहे, हें दिसून येईल. वस्तुतः रामगिरीचा स्थलनिश्चय करतांना प्राचीन ग्रंथांचा आणि विशेषतः रामायणाचा फार उपयोग आहे. मेघदूतांत आलेले हे रामकथेंतील तीन उल्लेख पहा :

(१) जनकतनयास्नानपुण्योदकेषु
(२) रामगिर्याश्रमेषु
(३) वंद्यैः पुंसां रघुपतिपदैः अंकितं मेखलासु

म्हणजे रामगिरि हा उत्तुंग पर्वत होता व तेथील जल सीतेनें स्नान केल्यामुळें पुण्यपावन झालेलें होतें. शिवाय या पर्वताच्या मेखलाभागांवर सर्वजनांना वंद्य अशीं श्रीरामचंद्रांचीं पदचिन्हें उमटलीं होतीं. या वर्णनांतलें स्वारस्य स्पष्ट आहे. राम, लक्ष्मण आणि सीता हे वनवासांत ज्या पर्वतावर राहिले तोच हा 'रामगिरि' पर्वत असावयाला हवा; दुसरा कोणताहि चालणार नाहीं. यासाठीं रामकथा, रामाचा मार्ग व रामायण जरूर तपासून व ताडून पाहिलें पाहिजे; परंतु मिराशी म्हणतात—

**"पण मेघदूताचें कथानक पडलें सर्वस्वीं काल्पनिक! तेव्हां तेथें आपणांस प्राचीन संस्कृत ग्रंथांचें साह्य होणें शक्य नाहीं."**
(सं. मु. १-५३.)

प्रस्तुत विषयाच्या उलगड्याकरितां अतिप्राचीन व आधारभूत संस्कृत ग्रंथ जो रामायण त्याचें साह्य होणें शक्य आहे. एवढेंच नव्हे तर त्याचें साह्य घेतल्याशिवाय हें रामगिरीचें रहस्य संशयातीत व समाधानकारक रीतीनें उकलणारच नाहीं, अशी वस्तुस्थिति आहे! मिराशी म्हणतात त्याप्रमाणें मेघदूताचें कथानक 'सर्वस्वीं काल्पनिक' नसून सर्वस्वीं रामायणावरून घेतलेलें आहे, हें पुढें सातव्या प्रकरणांत विस्तारानें व तपशीलवार दाखविलें आहे.

तात्पर्य, खुद्द रामगिरि हें नांव, सीता-स्नान आणि रामचरणाङ्किंतता या तीन फार मोठाल्या खुणा कालिदासानें ग्रथित करून ठेवल्या आहेत. किंबहुना दोन हजार वर्षांपूर्वीच्या अंधारांत प्रकाशाचा झोत टाकणारे हे तीन झगझगीत दिवे आहेत, हें वाचकांच्या पुढें लक्षांत येईल. त्यामुळें खऱ्या रामागिरीचा माग कोणालाहि पुसतां येणें शक्य नाहीं. रामगिरीचा डोंगर शोधतांना या डोंगराएवढाल्या खुणा डोळ्याआड करून चालावयाचें नाहीं. मिराशींचा रामटेक लटका पडतो त्याचें प्रमुख कारण हेंच. रामटेकचा ठेंगणा डोंगर (उंची सुमारें ५०० फूट) रामसीतांच्या वास्तव्याची अट पुरी करूं शकत नाहीं. तेथें राम कधीं टेकलेला नाहीं आणि जनकतनया सीता तर तेथें कधींच आलेली नाहीं. एवढ्यावरूनहि या महत्त्वाकाङ्क्षी रामटेकला रद्द ठरवितां येईल. पण या विषयाची चर्चा करण्यापूर्वी प्रथम मेघदूताच्या संहितेकडे (text) वळूं. कारण रामगिरीचा हा 'यक्षप्रश्न' सोड-

वितांना प्रथमतः खुद्द मेघदूतांतील माहितीवरच अधिक भर दिला पाहिजे. तो अन्तर्गत व अव्वल दर्जाचा पुरावा होय.

## रामगिरीच्या खुणा

कालिदासाला कोणता रामगिरि अभिप्रेत होता? त्यानें मेघदूतांत रामगिरीचीं खालील लक्षणें किंवा वैशिष्ट्यें नमूद केलीं आहेत —

१ रामगिरि हा पर्वत पवित्र मानला जात असे. वनवासांत असतां तेथील जलांत **सीतादेवीनें** स्नान केल्यामुळें त्याचें जल पुण्यपावन झालेलें होतें.

२ त्या पुण्यक्षेत्रीं **ऋषींचे अनेक आश्रम होते.**

३ रामगिरि पर्वत बराच **उंच** असल्यामुळें वर्षा ऋतूंत मेघ त्याच्या **शिखराला** बिलगले असतां वप्रक्रीडा करण्याकरितां (सुळ्यांनीं टक्कर देण्याकरितां) खालीं वांकलेल्या हत्तीसारखे ते दिसत. (श्लो० २)

४ त्यावर साजीं कुटजकुसुमें होतीं. (श्लो० ४)

५ हा पर्वत फार उंच व भव्य होता. (तुंगं शैलं–श्लो० १२)

६ या पर्वताच्या बाजूंवर जनांना वंद्य अशा **रामचंद्राचे** पाय लागलेले होते किंवा तेथें त्याचीं **पदचिन्हें** आहेत. (श्लो० १२)

७ या पर्वतावर प्रतिवर्षीं नियमानें जलवृष्टि होते. (श्लो० १२)

८ वारा **शिखर** उडवून देतो कीं काय, असें वाटण्याइतकें उंच शिखर व सोसाट्याचा वारा (श्लो० १४)

९ याच्या जवळपास मुग्ध सिद्धांगना होत्या. [अडाणी किंवा गांवढळ सिद्धांच्या स्त्रिया] (श्लो० १४)

१० तेथें सरस व रम्य असें निचुल नांवाचें वेतस किंवा 'स्थळ' होतें.

११ आसपास रानटी असंस्कृत लोकांची वस्ती (श्लो० १६)

१२ तेथें घनदाट छायेच्या वृक्षांची गर्द झाडी होती. (श्लो० १)

१३ नांगरण्यालायक असें 'माल' क्षेत्र जवळपास आहे. (श्लो० १६)

१४ येथून म्हणजे मालक्षेत्रानंतर काहींसें पश्चिमेला जाऊन पुढें पुन्हां उत्तरेला गेलें म्हणजे अलका लागेल. (श्लो० १६)

१५ या रामगिरीच्या पश्चिमेच्या बाजूला (किंचित् पश्चात् कांहींसें पश्चिमेला किंवा कांहींसें मागें) उंच व सानुमान् असा आम्रकूट पर्वत आहे.

१६ या आम्रकूटावर पेटणारे मोठे रान-वणवे त्याच्यावर हमखास होणाऱ्या प्रतिवार्षिक जलवृष्टीनें विझतात. (श्लो० १७)

१७ रान-आंब्यांच्या पिकलेल्या म्हणजे पिवळट व तुकतुकीत फळांनीं आच्छादिलेल्या या आम्रकूटाच्या शिखरावर कृष्णवर्ण असा तूं आलास म्हणजे तो पर्वत भूमीच्या स्तनासारखा दिसेल. (श्लो० १७)

१८ आम्रकूटाच्या आसपास देखील जंगली लोकांची वस्ती [वनचर-वधूभुक्तकुंजे श्लो० १९]

१९ आम्रकूटाच्या पुढें कांहीं मार्ग आक्रमिल्यानंतर (अर्थात् अजून पश्चिमेच्याच दिशेनें. कारण श्लोक १६ मधील उत्तरेण या पदाप्रमाणें उत्तरेला वळण्याची क्रिया उज्जयिनीनंतर सुरु व्हावयाची आहे.) विंध्य पर्वताच्या पायथ्याशीं डोंगराळ मार्गांतून वहात असल्यामुळें स्फुटितप्रवाहा अशी नर्मदा नदी तुला हत्तीच्या अंगावर काढलेल्या वेलबुट्टीसारखी दिसेल. (श्लो० १९)

२० नर्मदेचें पाणी घेऊन (शोषून) पुढें जा [गच्छेः], असा मेघाला आदेश (श्लो० २०) (नर्मदा नदी ओलांडून जा, असा उल्लेख नाहीं.)

२१ यानंतर दशार्ण देश व मग त्याची सुप्रसिद्ध राजधानी विदिशा व वेत्रवती किंवा हल्लींची बेटवा नदी लागेल. (श्लो० २३-२४)

२२ रामगिरीवर हारणी, मोर आणि नदी किंवा जलप्रपात आहेत. (उत्तरमेघ ४१)

२१ येथें पावसाळा सोडून वारे उत्तरेकडून दक्षिणेकडे वहात येतात. (श्लो० ४४)

२४ येथें यक्षाला शिलाखंडावर आपल्या प्रियेचें चित्र काढतां येईल, असे धातुराग म्हणजे रंजकद्रव्यें आहेत. (श्लो० ४२)

वर दिलेल्यांपैकीं बहुतेक खुणा वैशिष्ट्यपूर्ण असल्यामुळें त्या कोणत्याहि डोंगराला लागू पडणाऱ्या नाहींत, हें मेघदूताच्या मार्मिक वाचकांच्या सहज लक्षांत येईल. किंबहुना या सर्वच्या सर्व लक्षणांनीं उपलक्षित असा कोणता तरी एकच पर्वत असूं शकेल, असें निश्चयानें निष्पन्न होण्यासारखें आहे. एवढेंच नव्हे तर या बाबतींत विकल्पाला किंवा संशयाला जागा रहात नाहीं. वरील वैशिष्ट्यांनीं युक्त आणि कालिदासाच्या वर्णनाला जुळणारा एकच पर्वत आहे आणि तो म्हणजे आम्हीं पूर्वी सूचित केलेला रामगड पर्वत होय, हें आम्ही पुढील प्रकरणांत दाखविणार आहोंत. तथापि उत्सुक वाचकांना त्याची पूर्वकल्पना किंवा चाहूल अगाऊच लागावयाला हवी असेल तर त्यांनीं या प्रकरणांतील तळ-टीपा अधिक बारकाईनें वाचाव्या. म्हणजे रामगड हाच रामगिरि ही गोष्ट त्यांना आतांपासूनच प्रतीत होऊं लागेल.

पण तूर्त आपल्याला या उपरिनिर्दिष्ट चोवीस खुणा रामटेकशीं जुळतात कीं नाहीं, हें पहावयाचें आहे. अशी चिकित्सा किंवा तपासणी करतांना एकहि अपवाद न होतां सर्व लक्षणें बिनचूक जमलीं पाहिजेत, हा अशा बाबतींतला तर्कशास्त्राचा नियम लक्षांत ठेवला पाहिजे. माणूस ओळखण्याप्रमाणें स्थळाच्या निश्चितीबाबत-

देखील एक खूण विरुद्ध गेली तरी घातक ठरते. पण सुदैवानें प्रस्तुत प्रकरणांत उलट अशी मौज आहे कीं, चोवीसपैकीं तीन किंवा चार सर्वसामान्य म्हणून सोडून दिल्या तरी बाकीच्या वीस वैशिष्ट्यपूर्ण खुणा रामटेकच्या विरुद्ध आपला हात वर करीत आहेत. ह्या वीस मूक साक्षीदारांची बोलकी साक्ष फार महत्त्वाची आणि निर्णायक आहे. न्यायनिवाड्याच्या कामीं न्यायालयांतून—

" Men may lie but circumstances do not lie "

हें पुराव्याच्या शास्त्रांतलें एक महत्त्वाचें तत्त्व नेहमीं उपयोगांत आणलें जातें. त्या दृष्टीनें पाहतां चोवीसपैकीं एकहि खूण रामटेकला उचलून धरीत नाहीं. कसें तें पहा.

## रामटेक कसोटीला उतरत नाहीं

*आतां वरील चोवीस लक्षणांचा अनुक्रमानें विचार करूं :*

१ सीतास्नान हें जें रामगिरीचें पहिल्याच श्लोकांतलें पहिलें वैशिष्ट्य तें रामटेक सिद्धान्ताला अत्यंत घातक ठरतें. 'प्रथमग्रासे मक्षिकापातः' अशी रामटेकच्या पक्षपात्यांची गत होते. येथें सीतादेवीनें स्नान केलें अगर वास केला असा रामायणांत अथवा कोणत्याहि प्राचीन ग्रंथात उल्लेख नाहीं. तशी पुसट दंतकथा अगर परंपराहि नाहीं. रामटेक हाच शैवलगिरि आणि तेथें शंबूकाला मारण्यासाठीं राम आला होता, असें मिराशी म्हणतात. हें देखील मान्य होण्यासारखें नाहीं. त्याची सविस्तर चर्चा पुढें केली आहे. परंतु ही गोष्ट क्षणभर गृहीत धरली तरी देखील ही हकीकत वनवासाच्या काळातली नसून रामायणाच्या उत्तरकांडांतली आहे. ( अध्याय ७५ ) शंबूकवधाकरितां राम एकटाच विमानांतून आला होता. त्याच्या समवेत सीता नव्हती. सीताच काय दुसरा कोणीच बरोबर नव्हता. म्हणून ' जनकतनयास्नानपुण्योदकेषु ' हें जें सूचक, ऐतिहासिक आणि महत्त्वपूर्ण वैशिष्ट्य आहे तें रामटेकशीं मुळींच जुळत नाहीं, हें स्पष्ट व निर्विवाद आहे. सीतेच्या आगमनाचा व स्नानाचा अभाव आणि[1] अशक्यता हें एकच प्रमाण रामटेकचा हक्क नाशाबीत करण्याइतकें बलवत्तर आहे.

शिवाय रामटेकवर एकहि ओढा, तलाव, जलप्रवाह किंवा छोटी अगर मोठी नदी नाहीं. सीता येथें आलीच नाहीं. पण आली असली तरी तिला स्नान करण्या-

---

१ राम वनवासाला निघाल्यानंतर प्रथम प्रयाग व तेथून ओरिसातून पूर्व किनाऱ्यानें दक्षिणेंत येऊन लंकेकडे कसा गेला, हा रामचंद्राचा मार्ग पुढच्या प्रकरणातून सप्रमाण दाखविला आहे, तो पहावा. त्यावरून राम अगर सीता वनवासाच्या काळात विदर्भात किंवा पश्चिम किनाऱ्याकडे महाराष्ट्रातहि गेलेले नाहींत आणि त्यांना जाण्याचें कारणहि नव्हतें, हें दिसून येईल.

करितां 'उदक' तर पाहिजे कीं ! मुळांत 'उदक' असलें तर तें स्नानानें 'पुण्योदक' होणार ! तेव्हां या बाबतींत 'मूले कुठारः' अशी[1] रामटेकची स्थिति आहे.

२. रामटेकवर अगर त्याच्या आसपास कोण्या ऋषींचे आश्रम होते, असा कोणताहि उल्लेख कोठेंहि सांपडत नाहीं. खुद्द मिराशींचेंहि तसें म्हणणें नाहीं !

*उलटपक्षीं रामगडच्या (म्हणजे चित्रकूटाच्या) समोंवतीं कित्येक प्रसिद्ध* ऋषींचे आश्रम व तपोवनें होतीं. अत्रि-अनसूया, सुतीक्ष्ण, शरभंग, मांडकर्णी, अगस्त्य, धर्मभृत् इ० इ० शिवाय खुद्द रामगड पर्वतावर एकान्तवासाच्या, निसर्गरमणीय व आश्रम बांधून रहाण्यायोग्य अनेक जागा असून शिवाय निवासाकरितां कांहीं नैसर्गिक व कांहीं कोरलेल्या गुहाहि आहेत. तेथें प्रत्यक्ष राम, लक्ष्मण, सीता आश्रम करून राहिले होते, अशी आख्यायिका तर आहेच. पण तेथें ऋषिमुनि तपश्चर्येकरितां रहात होते. जोगी-संन्याशांची तेथे रहाण्याची परंपरा आतांपर्यंत होती, असें तेथील लोक सांगतात.

३. येथें क्र. ३, ५ व ८ हे मुद्दे विचाराकरितां एकत्र घेणें सोयीचें होईल. मेघदूतांतील या तीनहि उल्लेखांवरून रामगिरि नांवाचा पर्वत फारच उंच, भव्य आणि दर्शनीय असला पाहिजे हें स्पष्ट आहे. पुनरुक्तीमुळें ही गोष्ट पक्की झाली आहे. ज्याअर्थीं कालिदास तीन वेगवेगळ्या ठिकाणीं वेगवेगळ्या रीतीनें त्याचें वर्णन करीत आहे त्याअर्थीं रामगिरीची उंची भव्यता त्याच्या मनांत बिंबलेली होती, हें उघड आहे. कालिदास या[2] रामगिरीवर व त्याच्या आसमंतांतल्या भागांत

---

१. प्रो. मिराशी यांनीं सरदेसाई-स्मारक ग्रंथात रामटेकवरील शिलालेख याबाबत संशोधनात्मक लेख छापला आहे. त्या लेखातील विधानाची चर्चा पुढें केली आहे. सदर लेखाचे अखेरीस रामटेकवर असलेल्या अनेक देवळांची व तीर्थांचीं नावें सिंदूरगिरि-माहात्म्य नावाच्या दोन पोथ्यांच्या आधारें व शिलालेखांत उल्लेखिलेलीं दिलीं आहेत. त्या लांबलचक यादींतहि सीता-तीर्थ अगर सीता-कुंड असा उल्लेख नाहीं. अगर सीतेच्या नांवाचें कोणतेहि स्थळ नाहीं. तशी पुसट दंत-कथा असती तरी श्रद्धाप्रवण लोकांनी सीता-देवीचे नांव यादींतल्या २८ स्थळांपैकी एखाद्याशीं खासच निगडित केलें असते.

२ मेघदूतातील रामगिरि म्हणजे रामगड असें आम्हीं पुढें दाखविलें आहे. हा रामगड विंध्यपर्वताचा भाग समजला जात असे. विंध्य आणि त्याचा परिसर कालिदासाच्या अतिशय प्रेमांतला आणि परिचयातला हें निःसंशय. प्रतिभा पल्लवित झालेल्या तरुण कालिदासाच्या पहिल्या, नवशिक्या ऋतुसंहार काव्याची पहिली झडप विंध्य-प्रदेश आणि त्यांतील दृश्यें यावर पडली. यावरूनहि हेंच दिसून येतें. सदरचा रामगड पर्वत ३२०० फुटाच्यावर उंच असून भव्य व प्रेक्षणीय आहे. त्यावर प्राचीन कालापासून राम, लक्ष्मण व सीता यांचें देवालय असून हनुमान् आणि दशमुखी रावण यांच्याहि मूर्ति आहेत. राम, लक्ष्मण व सीता यांच्या नावानें गुंफा आहेत. यापैकीं एका गुहेच्या शिलेवर दोन

[ पुढील पानावर चालू

अनेकदां आला असला पाहिजे, किंबहुना त्यानें आपलें वर्णनप्रधान मेघदूतकाव्य किंवा त्याचा कांहीं भाग तरी खुद्द रामगिरीवरच रचला असावा, असा तर्क केल्यास तो चुकीचा ठरण्याचें कारण नाहीं. रामगिरीच्या उंच भव्यतेनें खालील तीन

मागील पानावरून चालू]

पदचिन्हें किंवा पादुका कोरलेल्या असून तीं रामचंद्राचीं पावलें असें समजतात. राम-लक्ष्मण-सीता वनवासात तेथें राहिले, अशी अजूनहि तेथील लोकांची समजूत आहे. तद्विषयक अनेक दंतकथा आहेत. सविस्तर माहिती व चर्चा पुढें. या रामगड पर्वताचें वैशिष्ट्य हें कीं, याच्या पाऊण हिस्सा उंचीवर एक मला मोठा नैसर्गिक बोगदा, विवर किंवा आरपार गुहा आहे लांबी ४५० फूट आणि उंची व रुंदी इतकी कीं, हत्ती लीलेनें इकडून तिकडून आरपार जाईल. हिला 'हाथीफोड' गुहा म्हणतात. या गुहेंत आंत एक नैसर्गिक झरा मर्मरशब्द करीत झुळझुळ वहात आहे. गुहेमुळें त्या जलप्रपाताचा मोठा प्रतिध्वनि उत्पन्न होऊन सबंध गुहा निनादित होत असते. उंच पर्वतावरचा हा वैशिष्ट्य-पूर्ण व अद्भुत निसर्गचमत्कार दुसरीकडे कोठें पहाण्या-ऐकण्यात नाहीं. सदर रामगड हाच रामगिरि आणि हाच चित्रकूट हें अगदीं पुढें दाखविणार आहोंत. प्रस्तुत मुद्दा एवढाच कीं, ऋतुसंहारात विंध्य-दर्याचें वर्णन असूनहि या चमत्कारपूर्ण व चित्तवेधक पर्वताचें वर्णन कालिदासानें केलेलें नाहीं. तें त्यानें पुढें रघुवंशांत केलें आहे. यावरून असा तर्क वाहतो कीं, रघुवंश-रचनेच्या वेळीं रामकथा प्रस्तुत असताना त्यानें रामाच्या वनवासांतील स्थळाना भेट दिली असावी. त्या प्रसंगीं हा नजर खेचणारा (रघु १३-४७) चित्रकूट पर्वत त्यानें पहिल्यांदा स्तिमित नेत्रानीं पाहिला. अर्थात् येथें राम राहिले म्हणून तो रामगिरीच. या निसर्गरमणीय पर्वतावर कांहीं काळ केलेल्या वास्तव्यातच त्याला मेघदूताची कल्पना सुचली असावी व त्यातले प्रारंभींचे कांहीं श्लोक त्याला तिथेंच स्फुरले असावेत. रामायणाचा विषय डोक्यात घोळतच होता. रामवनवासाचें प्रत्यक्ष स्थळ डोळ्यांसमोर होतें. विरही रामाचा दूत जो हनुमान् त्यानें रामगडशेजारच्याच महेंद्र पर्वतावरून सीतेला रामाचा निरोप सांगण्याकरिता उड्डाण केलेलें. पत्नी-वियोग नसल्यामुळें विरहव्यथेची तात्पुरती चुणूक का होईना पण अनुभवाला येतच होती. किंवा प्रतिभासंपन्नाना प्रत्यक्ष अनुभव तरी कशाला पाहिजे? रामगड पर्वताच्या उंच शिखरावर हत्तीप्रमाणें टकरा देणारे कृष्णमेघ त्यानें प्रत्यक्षच पाहिले असतील रामगडा-वर हत्तींचे कळप अकबरापर्यन्त होते, हल्लीहि आहेत, मग कालिदासाच्या वेळीं असतील यात काय नवल? आजहि काळवीट, हरिणें, मोर विपुल आहेत नानाविध रंगाचे व आवाजाचे पक्षी आहेत इतकी सामुग्री जमून आल्यानतर अशा स्थळीं एखादा सामान्य मनुष्य गेला तरी तो कवि होऊन माघारा येईल. मग येथें कालिदासासारख्यानें मेघदूता-सारखें काव्य रचलें यांत आश्चर्य कसलें? अशा रीतीनें एका महाकाव्यातून एक लघुकाव्य-उपकाव्य निघालें असावें, असें मनोदेवता सागते 'ग्रामं गच्छन् तृणं स्पृशति' या न्यायानें किंवा चुलीवर भात शिजत ठेवला कीं एकीकडे वैलावर कालवण शिजतें. त्याप्रमाणें रघुवंश रचताना तत्संलग्न अथवा त्यामुळें साहजिकपणें सुचलेलें संविधानक घेऊन कालि-दासानें आपलें मेघदूत हें अमर खडकाव्य रचलें. बहुधा हीं लहान-मोठीं मावडें सहोदरच नव्हे तर समकालीनहि असावीं, असा तर्क करण्याइतकीं अतर्गत प्रमाणें सांपडतात. त्यांचा निर्देश पुढें यथास्थान केला आहे

प्रकारांनीं वर्णन आलें हे. तो उत्तुंग पर्वत होता (तुंगं शैलं १२), मेघ टकरा मारतील इतका उंच (श्लोक २), वारा शिखर उटवून देतो कीं काय असें बाजूच्या लोकांना याटण्याइतकें उंच शिखर व सोसाट्याचा वारा तिथें वहात असे (श्लोक १५). पण याहीपेक्षां अत्यन्त आणि अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे या रामगिरीला उंच असें शिखर किंवा शिखरें होतीं (श्लोक २ व १४). आतां रामगिरीचें हें भव्य स्वरूप कुणीकडे आणि रामटेकची ठेंगणी मूर्ति कुणीकडे! या टेकडीची उंची अवघी ५०० फूट सुद्धां नाहीं. म्हणजे पुण्याच्या पर्वतीइतपत किंवा फार तर थोडी अधिक. **शिवाय ही टेकडी पसरट घाटाची असून तिला शिखर नाहीं.** जिथें शिखरच नाहीं तिथें मेघ त्याला बिलगणार कसा? (मेघमाश्लिष्टसानुम्–श्लोक २) शिखराला टकरा मारणार कसा? वांझेच्या मुलाला पागोटें बांधून ठेवण्यासारखाच हा प्रकार आहे. या मुद्द्याला दुसरा एक महत्त्वाचा पैलू आहे. तो असा कीं, शिखर नसल्या-मुळें मेघ त्या टेकडीच्या कडेला टकरा मारीत होता असें मानावें लागतें. मग यक्ष कुठें होता? टेकडीच्या माथ्यावर यक्ष उभा आहे असें कल्पिलें तर मेघ त्याच्या खालीं म्हणजे खालच्या पातळीवर होता असें निष्पन्न होईल. म्हणजे यक्ष वर आणि मेघ खालीं, असा विपर्यस्त विसंगत व असंभवनीय प्रकार होतो! ही कल्पना अथवा हें दृश्य कालिदासाला अभिप्रेत असेल असें म्हणवत नाहीं. तें सर्वस्वीं अनुचित, रस-हानिकारक आणि अशक्यप्राय वाटतें. (पुढें आम्हीं रामगड या ३२०० फूट उंचीच्या पर्वताचें वर्णन दिलें आहे. त्याच्यावर जमिनीपासून पाऊण हिश्शावर विस्तीर्ण पठार व जलप्रवाह असून त्याच्याहि वर पठाराच्या उत्तरेस ७००।८०० फूट उंचीचें शिखर आकाशांत घुसलें आहे. या ठिकाणाला मेघदूतांतील वर्णन किती तंतोतन्त लागू पडतें हें वाचकांनीं पहावें.)

शिवाय वर्षाव न करणारे ढग सहसा ५०० फुटांच्या खालीं येत नाहींत, आणि कालिदासासारखा कवि मेघाला इतका खालीं आणील आणि तें दृश्य वर्णीत बसेल, ही कल्पना स्वीकारण्याला मन राजी होत नाहीं. कालिदास भव्यतेच भोक्ता आहे, या गोष्टीकडे रसिकांनीं ध्यान द्यावें. कालिदासाला (अर्थात् मेघाच्या-द्वारा) अखेर गांठायचें आहे हिमालयाचें कैलासशिखर आणि मग त्यावर वसलेली कुबेरनगरी अलका.

गन्तव्या ते वसतिरलका नाम यक्षेश्वराणाम्
बाह्योद्यानस्थितहरशिरश्चंद्रिकाधौतहर्म्या ॥

अशा त्या उंचांतल्या उंच पर्वताच्या 'मांडीवर गंगा नदीरूप वस्त्र दूर सरकलेल्या अलका नगरीला जाण्याकरितां निघायचें कुठून? तर एका ठेंगण्या छोट्याशा टेकडी-वरून! कल्पना जुळत नाहीं, मेळ बसत नाहीं. अखेरीच्या हिमगिरीला शोभेल असाच प्रारंभींचा रामगिरि नको काय? मेघदूताचें कथानक कल्पनेनें जुळवावयाचें

असल्यामुळें प्रारंभबिंदु निवडण्याची कवीला पूर्ण मुभा होती. मग काय तो रामटेकची उपेक्षणीय आणि तिसऱ्या दर्जाची टेकडी पसंत करील? तो वर्णन करण्याला उद्युक्त झालेल्या उज्ज्वल स्थलमालिकेंतला पहिलाच मणि इतका फिका व वैशिष्ट्यहीन असा ओवील? बरें, आपल्या देवयोनींतील नायकाला-यक्षाला रहाण्याकरितां कालिदास इतक्या खालच्या पातळीचें जमिनीशीं लगट करणारें ठिकाण पसंत करील म्हणावें तर त्याला तितकेंच जबरदस्त असें दुसरें कोणतेंच कारण दिसत नाहीं. दोन-तीन किरकोळ अपवाद (तेहि कदाचित् सकारण असतील) सोडले, तर कालिदास विशाल दृश्यांचें आणि भव्य निसर्ग-चमत्कारांचें वर्णन करून राहिला आहे, असें दिसेल. ' रामटेकची क्षुद्र आणि बिनशिखराची टेकडी कालिदासानें पसंत केलेली असणें शक्य दिसत नाहीं.

४ कुटजकुसुमें किंवा कुड्याचीं फुलें— हीं बहुतेक कोणत्याहि डोंगरावर असतात. त्यामुळें हें लक्षण निर्णायक होऊं शकणार नाहीं.

कुटज याचा अर्थ या ठिकाणीं (श्लोक ४) कुडा असा करतात पण त्याबाबत शंका येण्यासारखी स्थिति आहे. पुढें २२ व्या श्लोकांत कालिदासानें " ककुभसुरभौ पर्वते पर्वते ते" असें वर्णन घातलें आहे. त्यांतील ककुभवृक्षाचा अर्थ मल्लिनाथानें साधार कुटज अथवा अर्जुन असा दिला आहे. (ककुभः कुटजेऽर्जुने-शब्दार्णव) ककुभ आणि अर्जुन किंवा मराठींत अर्जुनसादडा यांत बरेंच साम्य आहे. त्याच जातीचा हा कुटजवृक्ष असला पाहिजे असें वाटतें. कारण ऋतुसंहारांत व अन्यत्र 'कुटजवृक्षाचा उल्लेख करतांना कालिदासानें अर्जुन व साल वृक्षांचाहि उल्लेख केलेला आहे. अग्निवर्ण राजा कुटज आणि अर्जुन या फुलांचे हार पर्जन्यकाळीं घालतो. मात्र कुटज शब्द आहे तिथें ककुभ अगर ककुभ आहे तिथें कुटज घातलेला नाहीं. या ककुभ किंवा कुटज वृक्षाच्या पुष्पकलिका स्त्रियांना कानावर घालण्याकरितां 'कर्णायनंम म्हणूनहि उपयोगी पडत असत. ऋतुसंहारांत विंध्याचें वर्णन आहे. त्यांत 'कदंबकुटजार्जुनसर्जनीपां'चाच प्रामुख्यानें उल्लेख आहे. सारांश, मेघदूताच्या प्रारंभापासून विंध्य कवीच्या डोळ्यांसमोर आहे, असा अंतःप्रत्यय वाचकाला येत रहातो. 'ककुभसुरभौ पर्वते पर्वते ते' या २२ व्या श्लोकावरून मेघाचा मार्ग पूर्वेकडून पश्चिमेकडे म्हणजे रामगडाकडून विदिशा-उज्जयिनीकडे, विंध्यपर्वतराजींतल्या डोंगराडोंगरांवरून जाणारा असून, तिला दक्षिणोत्तर छेदून जाणारा

नाहीं, हें प्रतीत होतें. म्हणजेच मेघाची वाट accros the Vindhya range नसून along the Vindhya range अशी आहे. किंचित् पश्चात् म्हणजे आधी कांहींसा मार्गे व पश्चिमेला जा आणि मग पुन्हा उत्तरेच्या दिशेनें जा (श्लो० १६), असा कवीनें दिशेसंबंधीं जो स्थूलमानानें पण स्पष्ट आणि प्रमुख उल्लेख केलेला आहे, त्याची पुढें चर्चा केली आहे. त्यावरूनहि हाच मेघाचा मार्ग सूचित व सिद्ध होतो.

**स्निग्धच्छायातरुषु ( श्लो० १ ) :**

स्निग्ध याचा एक अर्थ निबिड असा आहे तोच या ठिकाणीं दृढ घेतला आहे. मल्लिनाथादि पुष्कळ टीकाकारांनीं तोच स्वीकारला आहे. छायातरु म्हणजे सावलीचे वृक्ष म्हटलें तर कांहीं बोडके डोंगर सोडल्यास बहुतेक डोंगर-पर्वतांवर लहानमोठे वृक्ष किंवा छायातरु असतातच. तसेच ते रामटेकवर असतीलहि. अर्थातच हेंहि गमक रामटेकचें वैशिष्ट्यदर्शक किंवा निर्णायक होऊं शकत नाहीं.

तथापि वर सांगितलेले विंध्यांतले वृक्ष [1]कदंब, कुटज, अर्जुन, सर्ज इत्यादि रामगडवर विपुल प्रमाणांत आहेत. आणि रामगड हा विंध्याचाच भाग. सर्ज म्हणजे सालवृक्ष तर वीस-वीस फूट घेराचे आणि दोन-दोनशें फूट उंचीचे आहेत. कालिदासाच्या आवडत्या वंश किंवा वेतस अथवा बांबूच्या बेटांनीं तर हा भूप्रदेश गजबजलेला आहे–रामगडपासून पश्चिमेला थेट नर्मदेचा उगम असलेल्या अमर-कंटकपर्यंत रामगड आणि त्याच्या आसमंतात् दहा मैलांच्या घेरांत इतकें दाट जंगल आहे कीं, रामगडला जावयाचें तर हत्तीवरून जावें लागतें. झाडी इतकी गर्द आहे कीं, मैलामैलांत सूर्याचा कवडसा खालीं पडत नाहीं! गर्द झाडीचाच विचार करावयाचा झाला तर रामटेक रामगडच्या पासंगालाहि पुरणार नाहीं छायातरूंचें संख्याधिक्य व गर्दपणाच पहावयाचा झाला तर निकाल रामगडच्या बाजूनें द्यावा लागेल!

५ वर क्र. ३ मध्यें याचा विचार आलेला आहे.

## रामगिरीचें रहस्य

६. रामगिरीचें सर्वांत मोठें, महत्त्वाचें, वैशिष्ट्यदर्शक निर्णायक व बिनचूक असें लक्षण म्हणजे रामपदचिन्हांकितता. ती वर्णन करणारा श्लोक खालीं समग्र दिला आहे. त्यांत दिलेली खूण म्हणजे रामगिरीचा रस्ता व पत्ता बरोबर लागावा एतदर्थाकरितां कालिदासानें लावलेला झगझगीत दिवा किंवा पाटीच होय.

---

१ येथें सांगितलेले वृक्ष मात्र रामटेकवर नाहींत. फक्त कांहीं सीताफळींचीं व आंब्यांचीं सामान्य झाडें आहेत, अशी माहिती नागपूर–रामटेककडील स्वतः पाहिलेले लोक सांगतात.

रामगिरीचें हें रहस्य उलगडून दाखविणारा मेघदूतांतील बारावा श्लोक असा-

आपृच्छस्व प्रियसखममुं तुंगमालिंग्य शैलम्
वन्द्यैः पुंसां रघुपतिपदैरंकितं मेखलासु ।
काले काले भवति भवतो यस्य संयोगमेत्य
स्नेहव्यक्तिश्चिरविरहजं मुञ्चतो बाष्पमुष्णम् ॥

**मराठी भावार्थ :** आतां तुझा प्रियसखा रामगिरि याला सोडून तुला निघालें पाहिजे. तेव्हा त्याचा निरोप घे. याची योग्यता मोठी आहे. लोकांना वंद्य अशा रघुपतींच्या पावलांचीं चिन्हें या उत्तुंग पर्वताच्या उतरणीवर उमटलेलीं आहेत. त्या दृष्टीनेंहि हा पर्वत उच्च आहे! अशा या तुझ्या उच्च प्रिय मित्राला जाण्यापूर्वी एकदां कडकडून भेटून घे आणि त्याचा निरोप घेऊन नीघ. दरवर्षी पावसाळ्यांत तुझ्या आणि याच्या भेटीचा योग बारा महिन्यांच्या ताटातुटीनंतर येतो. त्यामुळें हा तुझा विरहतप्त सखा दीर्घ काळानंतर तुमची गांठ पडतांच पाझरतो म्हणजे उष्ण अश्रु ढाळतो. आणि अशा रीतीनें तुझ्याविषयींचें त्याचें ममत्व व ओढ प्रकट होते.

हा श्लोक अनेक दृष्टींनीं अत्यंत बहारीचा आहे. कालिदासाच्या सर्व काव्य-गुणांनीं तो नटलेला आहे. त्यावर त्याच्या शैलीचा शिक्का आहे. शाकुंतलाप्रमाणें मेघदूतांतलें उत्कृष्ट श्लोकचतुष्टय वेंचून काढावयाचें म्हटलें तर त्यांत हा श्लोक निवडावा लागेल. वस्तुतः यांत मेघाला "तूं रामगिरि सोड म्हणजेच प्रयाणाला सुरवात कर" एवढाच आशय व्यक्त करावयाचा आहे. पण त्याभोंवतीं कालिदासानें आपल्या काव्यकलेची किती नाजुक वेलबुट्टी चितारून दिली आहे पहा. बिंदूचा सिंधु केला आहे. यांत तीन-चार अलंकार तर सहजतेनें साधले आहेत. पण शिवाय अचेतनांवर सचेतनत्वाचा आरोप करून चमत्कृति उत्पन्न करण्याची जी कालिदासाची नेहमींची हातोटी आहे, त्याचा रम्य आविष्कार येथें दिसतो पहिली जलवृष्टि झाल्यामुळें तप्त डोंगरावरून पाण्याच्या धारा वाहूं लागतात, या सामान्य निसर्गघटनेवर उष्ण अश्रुपाताची केलेली उत्प्रेक्षा समर्पक व हृद्य आहे. रामाचा संबंध तर असा खुबीनें जोडून दिला आहे कीं, वा रे वा! त्यामुळें पावित्र्य, ऐतिहासकत्व व रामाला पुढें झालेला विरह इत्यादि प्रकृतरसानुकूल गोष्टी सहजच वाचकाच्या मनाला प्रतीत होतात. त्यामुळें काव्याची आस्वाद्यता वाढते. शिवाय 'रघुपतिपदैः' हें दोन-तीन अर्थ होणारें श्लेषगर्भ पद कवीनें मोठ्या चातुर्यानें व बुद्धि-पुरस्सर वापरलें असलें पाहिजे. रामचंद्र या पर्वतावर राहिले हा पहिला साधा अर्थ तर आहेच. त्यानंतर येथें म्हणजे रामगड पर्वतावर सीतागुफेच्या एका शिलेवर रामाचीं पावलें कोरलेलीं आहेत. हीं खोदलेलीं पदचिन्हें फार प्राचीन आहेत. कालिदास-पूर्व काळापासून तीं असावींत. त्यांनाहि उद्देशून हा शब्दप्रयोग आहे. शिवाय हा पर्वतच चित्रकूट हें आम्हीं पुढे दाखविलें आहे. अर्थातच सुप्रसिद्ध

भरत-भेट येथेंच झाली. त्या वेळीं भरताच्या आग्रहावरून रामचंद्रानें आपल्या पादुका याच ठिकाणीं भरताला दिल्या व त्या शिरोधार्य मानून व बरोबर घेऊन येथूनच भरत मोठ्या कष्टानें अयोध्येला परत गेला. याच पर्वतावर रामानें दिलेल्या आणि भरतानें स्वीकारलेल्या राम-पादुकांचा वास ' रघुपतिपदैः ' या पदांत असूं शकणार नाहीं काय? मार्मिक व खुबीदार श्लेष-रचना करण्याच्या कालिदासाच्या पद्धतीचें हें उत्कृष्ट उदाहरण होय.

पण त्याहीपेक्षां कवीनें या श्लोकांत आपल्या विप्रलंभशृंगाराला पोषक वातावरण कसें उभें केले आहे पहा. या श्लोकांत प्रतिमा, कल्पनाशक्ति, निसर्गवर्णन, अलंकार या सर्वोपेक्षांहि हृदयस्पर्शी करुणरसाची जी 'मंदाक्रांत' छटा किंवा प्रवाह आहे त्यानें समरस झालेला वाचक भारून गेल्याशिवाय रहात नाहीं. तसेंच यांत विरही व एकाकी पुरुषाच्या चित्तवृत्तीचें विश्लेषण व चित्र मानसशास्त्राच्या दृष्टीनें किती मार्मिक आणि अचूक आहे पहा. गिरिशिखरावर ओथंबलेला मेघ जावयाला निघतो या साध्या घटनेंत कामुक यक्षाला निरोप घेणें, आलिंगन देणें, त्यांचा दीर्घकालीन विरह, पुन्हा नियमानें होणारा संयोग म्हणजे प्रेमभेट, स्नेहाचें प्रदर्शन, भेटींतले आनंदाश्रु इत्यादि अनेक दृश्यें दिसतात! विरहातुराला याखेरीज दुसरें कांहीं सुचूं शकेल काय? यक्षाला विरहकाळ संपल्यावर म्हणजेच शापान्तानंतर प्रियेशीं होणाऱ्या मीलनाचीं स्वप्नें आतांपासून जागेपणींसुद्धां पडूं लागावीं, हें किती स्वाभाविक. पुढें उत्तरमेघांत ( श्लो० ४७ ) संगमोत्सुक यक्ष हें बोलूनच दाखवितो—

पश्चादावां विरहगुणितं तं तमात्माभिलाषम् ।
निर्वेक्ष्यावः परिणतशरच्चन्द्रिकासु क्षपासु ॥

मनांत होतें तें प्रकट झालें. इतका वेळ आजूबाजूनें, अन्य वस्तूंच्या मिषानें बोलत होता तें आतां प्रत्यक्ष बोलूं लागला. दुसरें काय? हेंच मानसशास्त्रीय रहस्य ताक घुसळून काढलेल्या लोण्याप्रमाणें तत्त्व-रूपांत कालिदासानें शाकुंतलांत पुढें मांडलें आहे—

अहो चेष्टाप्रतिरूपिका कामिजनमनोवृत्तिः ।

कामुकांच्या आचार-विचारांत त्यांच्या मनोवृत्तींचेंच प्रतिबिंब असते. पुरूरवा, यक्ष व दुष्यंत यांचीं चित्रें या मानसशास्त्रीय विश्लेषणाच्या आधारावरच कवीनें रंगविलीं आहेत. मात्र तीं याच क्रमानें अधिकाधिक गूढरम्य, संयमित व परिणाम-कारक होत गेलीं आहेत. त्यामुळें वरील कालिदास-कृतींच्या रचनेचाहि तोच क्रम असावा, याचा हा अंतर्गत पुरावा होऊं शकतो.

असो. एका दगडानें अनेक पक्षी मारावे किंवा एका दिव्यानें अनेक ठिकाणीं उजेड पाडावा त्याप्रमाणें कवीनें या एका श्लोकांत कित्येक गोष्टी साधून घेतल्या आहेत.

रामगिरि ज्याप्रमाणें रामचंद्राचीं पावलें उमटल्यामुळें लोकांना वंद्य त्याप्रमाणेंच या श्लोकावर कालिदासाच्या प्रतिभादेवीचीं पदचिन्हें उमटलेलीं असल्यामुळें तो रसिकांना आदरणीय झालेला आहे. या त्याच्या रचनेंत शब्द, अर्थ, ध्वनि व रस हे काव्यगुण चढत्या श्रेणीनें उतरले आहेत. त्यांतील काव्यवैभव आणि अलंकार-सौंदर्य यांचा रसास्वाद प्रस्तुत वादविषयावर प्रकाश पाडणारा म्हणून आवश्यक आहे. पण आतां या श्लोकांतील रामाच्या पावलांचा किंवा संचाराचा जो ऐतिहासिक निर्देश आहे, त्याकडे मुख्यतः लक्ष वेधलें पाहिजे. रुक्ष संशोधनाला काव्यापेक्षां इतिहासाचें महत्त्व अधिक !

या श्लोकांतील राम-उल्लेखाचा एकूण सूर आणि मथितार्थ वनवासाच्या काळाला अनुलक्षून आहे, हें कोणताहि मर्मज्ञ रसिक आनंदानें मान्य करील. विशेषतः 'जनकतनयास्नानपुण्योदकेषु' या चरणाबरोबर या रामचरणांचा विचार केला म्हणजे तर ही गोष्ट अधिकच दृढ आणि संशयातीत होते. या श्लोकांत केवळ रामाच्या पादुका आहेत असा अर्थ नसून येथें रामानें वास्तव्य केलें, संचार केला, असा ध्वनि आहे. (किंबहुना हे दोनहि अर्थ कालिदासाला अभिप्रेत होते आणि ते त्यानें आपल्या नेहमींच्या खुबीदार *श्लिष्ट रचनेच्या पद्धतीनें व्यक्त केले आहेत*, हें पुढें रामगडच्या वर्णनाच्या व चर्चेच्या वेळीं दाखविलेलें आहे.) स्वतः रामचंद्र येथें रहात होते हें सांगण्यांत, मल्लिनाथ म्हणतो त्याप्रमाणे, त्या स्थळाचें पावित्र्य व माहात्म्य वर्णावयाचें आहे. नंतरचा विरही राम पूर्वी याच ठिकाणीं सीतेसह रहात होता, हा रसोत्पादक उल्लेख येथें करण्यांत कवीनें फार श्रेष्ठ प्रकारचें काव्यकौशल्य, योजकता आणि व्यंजना उपयोगांत आणली आहे यांत शंका नाहीं.

आतां एक सूक्ष्म पण महत्त्वाचा मुद्दा. या श्लोकांत 'रघुपतिपदैः' असा पद शब्दाचा बहुवचनी प्रयोग कशाकरितां ? पाय दोन असल्यामुळें 'पद्भ्याम्' असा द्विवचनी प्रयोग करण्याऐवजीं रामाच्या पुष्कळ पायांनीं असा विचित्र अर्थ होणारा प्रयोग काटेकोर कालिदास कशाला करील ? येथें वाच्यार्थ बाधित होऊन लक्ष्यार्थ किंवा व्यंग्यार्थच घ्यावा लागतो. मल्लिनाथानें दिल्याप्रमाणें 'पदैः' याचा अर्थ 'पदन्यासैः' असाच असला पाहिजे हें उघड आहे. आणि म्हणजेच त्यामुळें रामाचें येथील वनवासांतील वास्तव्य ध्वनित होतें, यांत शंका रहात नाहीं. जिथें पद याचा अर्थ पाय असा अभिप्रेत असेल, त्या त्या ठिकाणीं चरणयुग, चरणयुगुल, पद्भ्याम् *किंवा अशा अर्थाचे द्विवचनी प्रयोगच कालिदास करतो. त्यामुळें येथें पदैः याचा* अर्थ पाय (feet) असा नसून पदचिन्हें किंवा पावलें म्हणजे पावलांचे ठसे-खुणा (foot-prints) असा आहे.

येथें या विषयातील अत्यंत मौलिक व मौलीभूत मुद्द्याकडे वाचकांचें लक्ष वेधणें जरूर आहे. रामचंद्र सीतेसह राहिले, असे फक्त दोनच पर्वत इतिहासाला

माहीत आहेत. एक चित्रकूट आणि दुसरा [१] ऋष्यमूक. **या दोहोंखेरीज तिसऱ्या कोणत्याहि पर्वतावर राम-सीता यांनीं वास्तव्य केल्याचें वर्णन रामायणांत अगर अन्यत्र कोठेंहि नाहीं.** आतां रामटेकचा डोंगर अथवा दक्षिणेंतील तुंगभद्रा-कांठचा ऋष्यमूक हा चित्रकूट होऊं शकत नाहीं, ही गोष्ट निर्विवाद आहे. मग रामटेकवर राम व सीता रहात होते, असा कालिदासाचा अर्थ किंवा अभिप्राय कसा असूं शकेल? कालिदास त्याच्या काळांतला प्रथितयश व जबाबदार कवि होता. तो अनौचित्याचा किंवा प्रसिद्धार्थविरुद्धत्वाचा दोष पत्करील असें वाटत नाहीं. किंवा निराधार विधान ठोकून देण्याचें अनावश्यक धाडस तो करील असेंहि म्हणवत नाहीं. मेघदूत हें बोलून-चालून 'स्वतंत्र' काव्य होतें. त्याला स्थळ-काळाचें किंवा पूर्वकथेचें बंधन किंवा जखडबंदी कांहींच नव्हती. रामगिरीचें वर्णन करतांना राम-सीतेचा त्याच्याशीं संबंध जोडण्याची कवीवर कोणाची सक्ती नव्हती. रामगिरीवरचा जलप्रवाह जनक-तनयेच्या स्नानानें पुण्यपावन झालेला नसता किंवा त्याचा मेखलाभाग रामपदाचिन्हांकित झालेला नसता, तरी मेघदूताच्या कल्पेचें त्याच्यावांचून कांहीं अडत नव्हतें. हे उल्लेख अपरिहार्य होते असें मुळींच नाहीं. मग ते त्यानें कां घातले? त्यांच्याविना त्या खंडकाव्याच्या कथानकांत किंवा रस-प्रवाहांत खंड पडण्याचा संभव नव्हता. कालिदासाला हे रामविषयक उल्लेख न आणतांहि आपलें मेघदूत सजवितां आलें असतें. पण कालिदासाला चित्रकूटच अभिप्रेत होता, म्हणून त्यानें हे राम-चरित्रांतले उल्लेख हेतुपुरःसर केले आहेत. शिवाय रामगिरि हें नांवच पहाना. त्या पर्वताच्या नांवांतहि राम आहेच! राम राहिला म्हणून तर तो रामगिरि; नाहींतर त्यांत राम काय राहिला? नाहीं, मेघ-दूतांतून 'राम' कोणालाहि काढतां येणें शक्य नाहीं. रामावांचून जसें रामायण नाहीं तसेंच रामावांचून रामगिरि नाहीं. या गिरीशीं रामाचा संबंध आगंतुक किंवा कपोलकल्पित नाहीं. या रामगिरीवर म्हणजे पूर्वीच्या चित्रकूटावर राम होता म्हणून कालिदासानें राम घातला आहे.

मेघदूताच्या पाठीमागें राम उभा आहे! रामानेंच आपल्या वनवासांतल्या चरित्रानें—सीताविरहाच्या वृत्तान्तानें कालिदासाला मेघदूताची स्थूल कल्पना बीज-रूपानें सुचविली. रामानेंच—हनुमान् हा आकाशपंथानें उड्डाण करणारा आणि मेघा-प्रमाणें भासणारा दूत (रामायणांतीलच उपमा, सुंदरकांड १-३०।५२) आपल्या प्रियेला निरोप सांगण्यासाठी खुणेसकट धाडला—या स्वचरित्रांतील अद्भुत

---

१. कालिदास ऋष्यमूकच्या ऐवजीं किंवा त्याच्या शेजारचा म्हणून माल्यवान् पर्वताचा उल्लेख करतो असें दिसतें. वाली-सुग्रीवाची राजधानी किष्किंधा या पर्वतावर होती. हा पर्वत म्हणजे दक्षिणेंत तुंगभद्रेच्या कांठचा अनेगुंदी डोंगर समजतात. या माल्यवान् पर्वतावर रामानें सीता-विरहानंतरचा पहिला पावसाळा काढला, असें रामायणांत आणि रघुवंशांतहि वर्णन आहे. (रामायण किष्किंधाकांड व रघु० सर्ग १३.)

घटनेच्या साहाय्यानें व साहस्यानेंच कालिदासाच्या कल्पनातरल डोक्यांत मेघाला दूत बनविण्याची अजब पण काव्यमय कल्पना भरवून दिली. त्याच रामचंद्रानें *आपल्या पदन्यासानें पुनीत झालेला आणि आपल्या प्रिय सीतेच्या स्नानानें* पुण्योदक झालेला ( चित्रकूट ) पर्वतहि कालिदासाला त्याच्या काव्याच्या प्रारंभाचा बिंदु किंवा स्थळ म्हणून पुरविलेलें नसेल काय ? रामानें यक्षाला आपलें सोंग अर्पण केलें, एवढेंच नव्हे तर आपलें रहाण्याचें ठिकाणहि बहाल केलें !

तात्पर्य, रामायणामुळें व परंपरागत ज्ञानामुळें चित्रकूटावर–दुसऱ्या कोणत्याहि पर्वतावर नव्हे–राम राहिले हें लोकांना माहीत आहे, हें कालिदासाला माहीत होतें. त्यामुळेंच त्यानें हे उल्लेख केलेले आहेत, हें स्पष्ट आहे. मल्लिनाथप्रभृति सर्व प्राचीन संस्कृत टीकाकार रामगिरि म्हणजे चित्रकूट समजतात तें उगीच नव्हे. त्यांना पूर्वपरंपरेनें चालत आलेली माहिती उपलब्ध होती. दहाव्या शतकांत झालेल्या **वल्लभदेवानें** तर रामगिरीच्या पूर्वाश्रमीच्या नांवावर तर्कशुद्ध व अचूक रीतीनें बोट ठेवलें आहे जनकतनयास्नानाचा उल्लेख आलेल्या पहिल्या श्लोकावर व्याख्यान करतांना तो म्हणतो—

रामगिरिरत्र चित्रकूटः । न तु ऋष्यमूकः तत्र सीताया वासाभावात् ।

यावरून मार्मिक व माहितगार प्राचीन टीकाकार चित्रकूट म्हणजेच रामगिरि असें मानीत होते तें किती योग्य आहे, हें लक्षांत येईल. येथें दोन तर्क संभवतात. एक तर कालिदासाच्या काळीं चित्रकूट पर्वत रामाच्या वास्तव्यामुळें रामगिरि या नावानें प्रख्यात असावा. किंवा राम-साहचर्य लक्षात घेऊन कालिदासानें चित्रकूटाला रामगिरि संबोधण्यास सुरुवात केली असावी व तेव्हापासून चित्रकूटाचें हें दुसरें नांवहि प्रचारांत आलें असावें तसें असेल तर कालिदासाचें हें नामकरण त्याच्या काव्यप्रतिभेचें द्योतक आहे, यांत शंका नाहीं.

**वरील विवेचनावरून एक गोष्ट निश्चित झाली. रामगिरि ठरवितांना तो चित्रकूटहि ठरला पाहिजे आणि उलटपक्षीं चित्रकूट निश्चित करतांना तो रामगिरीच्या भूमिकेशीं जुळला पाहिजे.**

रामटेक म्हणजे रामगिरि नव्हे हें ज्याप्रमाणें प्रस्तुत प्रकरणांत दाखविलें आहे, त्याप्रमाणेंच हल्लींचा ठरविण्यात आलेला म्हणजे बुंदेलखंडातला चित्रकूट हा खरा चित्रकूट नव्हे, हें पुढील प्रकरणांत सिद्ध केलें आहे. मेघदूतांतल्या वर्णनाला जुळेल असा एकच पर्वत आणि तो म्हणजे **रामगड** व चित्रकूट शोभेल असाहि एकच पर्वत आणि तो म्हणजेहि **रामगडच.** आतांपर्यंत रामगिरि शोधायला चुकल्यामुळें किंवा भलताच धरल्यामुळें तो चित्रकूटाशीं जमेना ! आणि चित्रकूट चुकल्यामुळें त्याचा रामगिरीशीं मेळ बसेना ! अशी संशोधन-क्षेत्रात स्थिति होती. परंतु रामगिरि व चित्रकूट बरोबर शोधले व निश्चित केले म्हणजे आपण एकाच ठिकाणीं येतो.

आणि तें ठिकाण म्हणजे उत्तुंग असा रामगड पर्वत होय. चित्रकूटाचा रामगिरि झाला ही गोष्ट नजरेआड झाली, त्याचप्रमाणें पुढें त्याच रामगिरीचा रामगड झाला ही गोष्टहि लुप्त झाली. त्यामुळें हा रामगिरीविषयक संभ्रम व वाद उत्पन्न झाला आहे. वस्तुतः रामगिरि आणि चित्रकूट हे एकाच ठिकाणीं शोधले तर सांपडणारे दोन भिन्न पर्वत आहेत! हरि-हरांप्रमाणें नांवें दोन असलीं तरी वस्तु एकच आहे! कांहीं जणांनीं रामगिरीला नागपूरजवळ रामटेकावर नेऊन स्थापन केला आणि कांहीं जणांनीं चित्रकूटाला बुंदेलखंडांत बसविला! परंतु हा दुहेरी विपर्यास आपण दूर सारूं त्या वेळीं आपल्याला रामगड = रामगिरि = चित्रकूट या समीकरणाची सत्यता पटेल आणि रामचंद्र व कालिदास या विभूतींच्या वास्तव्यानें वैशिष्ट्यपूर्ण झालेला व रामायणानें आणि मेघदूतानें अमर केलेला अमरकंटकजवळचा तो ऐतिहासिक उन्नत पर्वत आपल्याला प्रतीत होऊं लागेल. पण त्याला अद्याप आवकाश आहे. अजून मधले टप्पे पुरे करावयाचे आहेत. संशोधनाच्या सफरींतला अखेरीचा मुक्काम वाचकांना आधींच कळावा एवढ्याकरितां त्याचें सूत उगाच येथें करून ठेवलें आहे. पायापूर्वीं कळसाची त्याप्रमाणेंच प्रमाणांच्या आधीं सिद्धान्ताची अगाऊ कल्पना असणें सोइस्कर असतें.

## रामाच्या पादुकांची ओढाताण

पुन्हा विषयाचें मुख्य सूत्र हातीं घेतलें पाहिजे. नागपूरचे प्रो. मिराशी यांनीं या बाबतींत बरेंच संशोधन करून दोन लेख[1] व 'कालिदास' नांवाचें पुस्तक लिहिलें आहे. त्यांत त्यांनीं 'रामटेक हाच रामगिरि हें मत सर्वांत सयुक्तिक' असें ठरविलें असून रामटेकची बाजू जोरदार रीतीनें मांडण्याचा प्रयत्न केला आहे. रामटेकशीं रामचंद्राचा कसलाच संबंध रामायणांत अगर कोणत्याहि प्राचीन ग्रंथांत आलेला नाहीं, हें पूर्वी सांगितलेंच आहे. ही मोठी उणीव लक्षांत आणून मिराशी यांनीं रामटेकला कुठून तरी आणि कसे तरी रामाचे पाय लागावे एवढ्याकरितां शिकस्तीचा प्रयत्न केला आहे. यावरून रामचरणांकिततेचा अभाव त्यांना बराच डांचत असला पाहिजे, असें दिसतें. मिराशींच्या प्रतिपादनाचा योग्य व सविस्तर परामर्श घ्यावयास हवा. कारण एक तर ते रामटेक पक्षाचे अध्वर्यु आहेत आणि दुसरी गोष्ट म्हणजे त्यांचा युक्तिवाद व पुरावा हेत्वाभासांनीं भरलेला, ओढाताणीचा व भ्रामक आहे. प्रो. मिराशी यांनीं संशोधनाच्या क्षेत्रांत वरींच वर्षें घालविलीं आहेत त्यामुळें आपाततः त्यांचें म्हणणें बरोबर असेल, असें मानण्याकडे मनाचा कल झुकणें स्वाभाविक आहे. म्हणून मिराशींच्या विधानांचें खंडन सविस्तर रीतीनें

१. मेघदूतांतील रामगिरि (संशोधनमुक्तावली, सर १ ला. पृ. ५२)
रामटेक येथील रामदेवराव यादवाच्या काळचा शिलालेख (सरदेसाई-स्मारक-ग्रंथ पृ.११५)

करावयास हवें होतें. तथापि विस्तारभयास्तव त्यांची विचारसरणी किती निर्मूल व निरुपयोगी आहे एवढेंच निश्चितपणें दाखवून पुढें जाऊं.

रामटेकचा रामाशीं संबंध जोडण्याकरिता मिराशी यानीं खालील सिद्धान्त प्रस्थापित करण्याची खटपट केली आहे :—

( अ ) रामटेक हें पुण्यक्षेत्र म्हणून फार प्राचीन आहे—निदान दीड हजार वर्षे. एवढेंच नव्हे तर त्याच्याहि पूर्वी तें प्रसिद्ध असावें.

( ब ) रामटेकचेंच नांव पूर्वी शैवलगिरि होतें. हेंच शंबूकाच्या तपश्चर्येचें स्थान. या ठिकाणीं रामानें त्याचा शिरच्छेद केला.

( क ) शंबूकवधानंतर त्याच्या सांगण्यावरून श्रीरामचंद्रांनीं या गिरीवर वास केला.

( ड ) वऱ्हाडांत उमरावतीजवळ ऋद्धपूर येथें प्रभावतीगुप्तेचा एक ताम्रपट सांपडला आहे. तो तिनें *रामगिरिस्वामीच्या पादुकांजवळून* ( **रामगिरिस्वामिनः पादमूलात्** ) दिला, असें म्हटलें आहे. या प्रान्तांत रामगिरि या नांवाचें दुसरें कोणतेंहि प्राचीन ठिकाण नाहीं. तेव्हां वाकाटकांच्या कालीं ( चवथें-पांचवें शतक ) ही टेकडी रामगिरि या नांवानें प्रसिद्ध होती.

मिराशींचे हे चारहि ' सिद्धान्त ' बुडबुड्यांप्रमाणें पोकळ असून परीक्षणाच्या पहिल्याच हस्तस्पर्शानें फुटून जाण्यासारखे आहेत. त्यांच्या युक्तिवादाचा डोलारा म्हणजे कच्च्या पायावर उभारलेली कच्ची इमारत होय. रामटेकचें प्राचीनत्व सिद्ध होत नाहीं. सिद्ध झालें तरी तेवढ्यानें काम भागत नाहीं. रामटेक म्हणजेच शैवलगिरि हें म्हणणें टिकण्यासारखें नाहीं. त्याला कोणताहि विश्वसनीय आधार नाहीं. शंबूक-वधानंतर श्रीरामचंद्रांनी या गिरीवर वास केला असें मानलें तरी देखील मिराशींचा हेतु साध्य होत नाहीं ! कारण प्रस्तुत प्रकरणीं रामाचा नुसता ' वास ' नव्हे; सदेह रामाचें प्रत्यक्ष वास्तव्य अभिप्रेत आहे. एरवीं *' रघुपतिपदैः अंकितं '* हें कालिदासानें केलेलें वर्णन सार्थ होत नाहीं. *प्रभावतीगुप्तेच्या ताम्रपटांत ' रामगिरिस्वामिनः पादमूलात् '* असें म्हटलें आहे त्यांतील रामगिरि म्हणजे रामटेकच याला दुसरा कोणताहि पुरावा नाहीं. या ताम्रपटांतील **' रामगिरि '** म्हणजे रामटेक हें सिद्ध करण्याऐवजीं मिराशींनीं तें गृहीत धरलें आहे ! उलटपक्षीं ताम्रपटांतील **' रामगिरि '** म्हणजे रामगड असूं शकेल, हें आम्हीं पुढें दाखविलें आहे. एवंच येन केन प्रकारेण रामाशीं संबंध जोडण्याकरितां ही मिराशींची ओढाताण आहे. तथापि ती साधण्यासारखी नाहीं. आता त्यांचें एकेक विधान तपशीलवार तपासून तें कितपत टिकतें तें पाहूं.

पहिली गोष्ट अशी कीं, मिराशींचा आधार म्हणजे काय तो शंबूकाचा वृत्तान्त. परंतु या शंबूककथेवर त्यांनीं इतकी भिस्त ठेवायला नको होती. कारण

हा कथाभाग रामायणाच्या उत्तरकांडांतील आहे. बालकांड आणि उत्तरकांड हे उघड उघड प्रक्षिप्त भाग आहेत. वाल्मीकिरचित मूळ रामायणामध्यें यांतील बहुतांश भाग नव्हता याबाबत संदेह नाहीं. मूळ रामायण फक्त अयोध्याकांडापासून युद्धकांडापर्यंतच होतें. अवतारवाद व अद्भुतरस यांची पेरणी ही प्रक्षेपाची खात्रीलायक खूण. आदिकवीचें रामचरित्र हें नर-काव्य होतें. मागाहून त्यांत देवत्व ओतलें. प्रक्षेपकांच्या करणीनें नराचा नारायण झाला! त्यांनीं प्रारंभींचें बाल व अखेरीचें उत्तर अशीं दोन कांडें दोन्ही बाजूंना जोडून दिलीं. राम + अयन म्हणजे रामपर्यटन हें नांवदेखील याचेंच गमक आहे. शंबूकाची हकीकत ही तर शुद्ध भाकडकथा असून मागाहून रामायणांत घुसडलेली आहे. त्यांत अद्भुताचा व अवतारकल्पनेचा मनसोक्त विलास आहे. शिवाय या वृत्तान्ताचा मुख्य कथावस्तूशीं कांहींच संबंध नाहीं!

" रामायणके प्रायः समस्त समालोचक उत्तरकाँडको प्रक्षिप्त मानते हैं। (पृष्ठ १२० ). शंबूकवध एक स्वतंत्र कथा प्रतीत होती है, जो बादमें जोड दी गई है। (पृष्ठ ४०८)."

— फादर बुल्के : रामकथा–उत्पत्ति और विकास.

विद्वानांनीं जीं प्रबळ कारणें दाखविलीं आहेत, त्यांवरून उत्तरकांडाच्या प्रक्षेपाबद्दल शंका उरत नाहीं डॉ० याकोबी यांच्या सप्रमाण प्रतिपादनानंतर तर या प्रश्नांचा पूर्णपणें निर्णय लागलेला आहे. वाल्मीकीनंतर सुमारें तीन चारशें वर्षांनीं प्रथम बालकांड व सहासातशें वर्षांनंतर उत्तरकांड रचून रामायणाला जोडलें असें समजतात. त्यांतील मजकूर विसंगत व असंबद्ध असून भाषाशैलीहि वेगळी व कनिष्ठ दर्जाची आहे. त्यावरून ही वाल्मीकिरचना नव्हे हें स्पष्ट आहे. म्हणजे कोणीतरी केव्हांतरी रचून रामायणांत दडपलेलें हें उत्तरकांड. अशा स्थितींत त्यात आलेल्या हकीकतीवरून व स्थलवर्णनावरून काढलेल्या स्वैर अनुमानांना कितीसें महत्त्व असणार?

दुसरा महत्त्वाचा मुद्दा. मिराशींना प्रारंभीं एकच साधें उत्तर दिलें तरी पुरेसें आहे. मग त्यांचा युक्तिवाद खोडून काढण्याचीहि गरज रहात नाहीं. तें उत्तर असें कीं, मिराशींचे सिद्धान्त मान्य करूनहि त्यांचें उद्दिष्ट साध्य होत नाहीं! रामटेक म्हणजे शैवलगिरी आणि तेथें येऊन रामानें शंबूकाचा वध केला, असें क्षणभर गृहीत धरलें तरी एकटा राम येऊन हें निभण्यासारखें नाहीं. त्याला सीताहि पाहिजे! ' जनकतनयास्नानपुण्योदकेषु ' याची वाट कशी लावणार? शंबूकाला मारण्याकरितां राम एकटाच आला होता. ओढून ताणून रामाला आणला पण जनकतनया येतच नाहीं! ती कशी येणार? त्याचे आधींच रामानें सीतेचा त्याग केलेला होता! दुर्दैवी सीता त्या वेळीं वाल्मीकीच्या आश्रमांत दिवस कंठीत होती! सारांश, इतकें करूनहि मिराशींचा रामटेक सीतास्नानाची अट पुरी करूं शकत नाहीं तो नाहींच. शिवाय शंबूक-वध हें उत्तरराम-चरित्र आहे (उत्तरकांड, सर्ग ७६). म्हणजे

ही हकीगत राज्याभिषेकानंतरची आहे, **वनवासांतली** नव्हे ! वनवास संपल्या-नंतरचें कोणतेंहि स्थळ 'रामगिरि' होऊं शकणार नाहीं, ही पहिली खूणगांठ बांधावयास हवी. ती जमत नाहीं. त्यामुळें मिराशींचा शंबूक-शैवलगिरीचा 'रामबाण' बोथट ठरतो.

वरील दोन प्रारंभींचे मुद्दे 'मूले कुठारः' या न्यायानें रामटेक-प्रस्थापनेला अत्यन्त बाधक आहेत. तथापि ते बाजूला ठेवले तरीदेखील मिराशींचा रामटेक-समर्थनाचा प्रयत्न व पुरावा किती निर्बल ठरतो तें पहा.

(अ) रामटेकच्या टेकडीवर अनेक देवळें आहेत. त्यांपैकीं दोन नृसिंहाचीं, वामनावतार, गजेंद्रवेदन, मारुती इत्यादि इत्यादि. त्यांपैकीं एक देवालय राम व सीता यांचें आहे आणि त्यांच्याच शेजारीं लक्ष्मणाचें स्वतंत्र नवीन देऊळ बांधलें आहे. (यावरूनहि राम-लक्ष्मण-सीता यांच्या वनवासकाळांतील वास्तव्याचें हें प्रतीक किंवा पुरावा नाहीं, हें दिसून येतें.)

हीं देवळें किंवा त्यांतील [1]मूर्ति फारशा प्राचीन दिसत नाहींत. तज्ज्ञांचें मतहि असेंच आहे. फक्त वामनावताराची भग्न स्थितींतील मूर्ति तेवढी प्राचीन दिसते, म्हणून पुराणवस्तुसंशोधन खात्यानें ती व तिचें विशीर्ण देवालय आपल्या ताब्यांत घेतलें आहे. वरीलपैकीं जें लक्ष्मणाचें स्वतंत्र देऊळ आहे, त्याच्या सभामंडपांत गर्भगृहाच्या पुढील भिंतीवर एक खंडित शिलालेख कोरलेला आढळतो तो रामदेवराव यादवाच्या काळचा आहे, असें मिराशींचें म्हणणें आहे. शिलालेखांत उल्लेखिलेला रामचंद्र राजा म्हणजे श्रीज्ञानेश्वरांचा समकालीन तेराव्या शतकांतील रामदेवराव यादव होय, असें मिराशी म्हणतात. परंतु रामटेकचें प्राचीनत्व याच्याहि मागें नेण्याकरितां त्यांनीं रामटेकचा प्राचीन संबंध विदर्भांतील वाकाटक घराण्याशीं जोडण्याचा प्रयत्न केला आहे. सुप्रसिद्ध गुप्त-सम्राट् द्वितीय-चंद्रगुप्त-विक्रमादित्य हा इ. स. चवथ्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला. याची मुलगी प्रभावती गुप्ता ही विदर्भनृप द्वितीय रुद्रसेन यास दिली होती. वऱ्हाडांत उमरावतीजवळ ऋद्धपूर येथें या प्रभावतीगुप्ताचा एक ताम्रपट सांपडला आहे. तो तिनें कार्तिक शुक्ल द्वादशीस 'रामगिरिस्वामीच्या पादुकांजवळून' दिला, असें म्हटलें आहे. एवढ्यावरून लगेच प्रो. मिराशी यांनीं तर्क रचला—

"या प्रान्तांत रामगिरि या नांवाचें दुसरें कोणतेंहि प्राचीन ठिकाण नाहीं. तेव्हां वाकाटकांच्या कालीं ही टेकडी रामगिरि या नावानें प्रसिद्ध होती व तेथें श्रीरामचंद्राची पादुकारूपानें पूजा होत असे, असें स्पष्ट दिसतें."
(सं. मु. सर पहिला, पृ. ६१.)

१. खुद्द मिराशी म्हणतात—"सध्याच्या मूर्ति रामटेकास दुधाळा नामक तळ्यात सांपडलेल्या व पूर्वीच्या मूर्ति भग्न झाल्यामुळें त्याची त्याच्या जागी स्थापना करण्यात आली असें समजतें" (सरदेसाई स्मा. ग्रंथ, पृष्ठ ११६).

या उताऱ्यांतील ' रामचंद्राची पादुकारूपानें पूजा ' लेखकाच्या पदरची आहे. प्राचीन कोरींव लेखांत पादमूल या शब्दाचा प्रयोग कोरलेलीं पदचिन्हें किंवा पादुका असा होतो. त्या ठिकाणाहून ताम्रपट किंवा त्यांतील दान दिलें असा आदरदर्शक उल्लेख करण्याची ती रीत आहे इतकेंच. तथापि मिराशींना रामटेकवर ' रामाच्या मूर्तीसमोर पादुका असून त्यांची पूजा होत असे ' याच्याशीं त्या ' पादमूला'चा संबंध आणून भिडवावयाचा आहे. पण रामटेकचें देऊळ व त्यांतील मूर्ति या सुद्धां इतक्या प्राचीन नाहींत, मग त्यासमोरच्या पादुका कुठून असणार ? पादुका शेंकडों ठिकाणीं दिसतात म्हणजे त्या प्राचीन असतात असें नव्हे शिवाय प्रभावतीगुप्ताच्या सदर ताम्रपटांत उल्लेखिलेला ' रामगिरि ' म्हणजे रामटेकच कशावरून ? ही गोष्ट सिद्ध करावयाची आहे ती मिराशींनीं गृहीत धरली आहे. ते म्हणतात : या प्रांतांत रामगिरि या नांवाचें दुसरें कोणतेंहि[1] प्राचीन ठिकाण नाहीं. परंतु हें विधान करण्यापूर्वीं रामटेकलाच पूर्वी रामगिरि हें नांव होतें, हें आधीं शाबीत करावयास पाहिजे. रामगिरि या नांवाचें प्राचीन ठिकाण जर प्रसिद्ध असतें, तर मग संशोधनाची काय गरज होती ? रामगिरि हें नांव कालान्तरानें मागें पडलें किंवा बदललें म्हणून तर हा सगळा वाद. तात्पर्य, 'रामगिरिस्वामिनः पादमूलात्' हा उल्लेख रामगिरीचीं इतर वर्णनें व कसोट्या यांचें समाधान करून जो कोणी योग्य रामगिरि ठरेल त्यालाच लागूं शकेल आणि आधारभूत होईल. हा कोरींव उल्लेख रामटेकसंबंधींच आहे, असा कोणताहि जोडणारा दुवा मिराशींपाशीं नाहीं णून आम्ही म्हणतों कीं, रामगिरित्वाचा ताम्रपट कांहीं रामटेकला दिलेला नाहीं !

शिवाय, ज्या स्थळाहून ताम्रपट दिलेला असेल त्याच्या जवळपासच्या ठिकाणीं तो सांपडतो, हें तर्कशास्त्र कुठलें ? उदाहरणार्थ नंदिवर्धनास दिलेला याच प्रभावतीगुप्ताचा एक सर्वांत प्राचीन ताम्रपट पुण्यास सांपडला आहे. म्हणजे नागपूरजवळचें नंदिवर्धन पुण्याच्या परिसरांत शोधावयाचें कीं काय ? सारांश, दानाचे ताम्रपट कुठें सांपडतील याचा नेम सांगतां येणार नाहीं आणि त्यांच्या उपलब्धि-स्थळावरून तसा तर्क करणेंहि चूक होईल. दान दिलेला सत्पात्र ब्राह्मण जेथें राहील किंवा स्थलान्तर करील त्यावर तें अवलंबून राहील, हें उघड आहे. शिवाय मुहूर्तानें दान

---

१. आम्हीं पुढील प्रकरणात जो खरा रामगिरि दाखविणार आहोंत तो रामगड पर्वत या प्रांताच्या म्हणजे विदर्भाच्या अगदीं लगत, सीमेवर आहे, किंवा कदाचित् त्या काळीं तो खुद्द विदर्भांतहि मोडत असावा. कारण विदर्भाची पूर्वसीमा कुशस्थली ( = रामगड ) पर्यंत भिडलेली असावी, असें तत्कालीन व कालिदासाच्याहि उल्लेखावरून वाटतें ( रघुवंश ). म्हणून रामगिरि ठरण्यासारखें दुसरें कोणतेंहि प्राचीन ठिकाण या प्रांतांत नाहीं, असें म्हणणें योग्य नव्हे. रामगडवर उत्तुंग गुहेच्या बाहेरच्या पर्वतभागावर रामाच्या कोरलेल्या पादुका फार प्राचीन आहेत. त्यांचें वर्णन पुढे पहावें. अर्थात् ताम्रपटांतील उल्लेख या स्थानाला लागू पडतो हें सांगणें नकोच; किंबहुना रामटेकवरील अलीकडच्या काळांतील पादुकांना तो लागू पडत नाहीं- असें म्हणतां येईल.

देणारे राजे विशिष्ट ठिकाणीं दानाचा फक्त संकल्प सोडीत असतील किंवा जाहीर करीत असतील आणि प्रत्यक्ष ताम्रपट घडविण्याचें-कोरण्याचें काम मागाहून राजधानीच्या किंवा शहराच्या ठिकाणीं होत असेल, अशीहि शक्यता आहे. किंबहुना तसेंच होत असलें पाहिजे. एवंच ताम्रपटाचें दानस्थळ उपलब्धीच्या ठिकाणापासून जवळ असतें या चुकीच्या सिद्धान्तावर आधारलेलीं पुढील अनुमानें सहज ढासळणारीं आहेत, हें वेगळें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

शिवाय ताम्रपट-उपलब्धि-समीपतेचा सदोष युक्तिवाद देखील दुसऱ्या एका दृष्टीनें मिराशींना फारसा उपयोगी पडण्यासारखा नाहीं. कारण याच लेखांत ते लिहितात—

"वाकाटकांचें राज्य विदर्भावर होतें. प्राचीन विदर्भात सध्यांचा वऱ्हाड व मध्यप्रांताचे मराठी जिल्हे यांचा समावेश होत असे. वाकाटकांचे कांहीं ताम्रपट रामटेकच्याहि पूर्वेस बालाघाट व भंडारा जिल्ह्यांच्या पूर्व सीमेपर्यंत सांपडले आहेत."

बालाघाट व भंडारा जिल्ह्यांच्या पूर्व सीमेला लागूनच रामगड पर्वत उभा आहे. मग समीपतेचा फायदा कुणाला—रामटेकला कीं रामगडला? खुद्द मिराशींच्या म्हणण्याप्रमाणेंच रामगड वाकाटकांच्या राज्यांत, निदान अगदीं निकटवर्ती असावा असे निष्पन्न होऊं लागतें. मग वाकाटकांची राणी प्रभावती गुप्ता हिच्या वरील ताम्रपटात उल्लेखिलेला रामगिरि हा रामगड नसेल कशावरून?

याप्रमाणें रामटेकची वाकाटकसंबद्धता संशयास्पद आहे. तथापि ती खात्रीलायक प्रस्थापित होण्यापूर्वीं मिराशी त्याहि काळाच्या मागें जातात आणि म्हणतात कीं, "वाकाटकांच्या काळापूर्वीहि रामटेक प्रसिद्ध असावें." अजून मुलगा झाला नाहीं तोंच नातवाचें नांव ठेवण्याची घाई. शिवाय या वरील विधानाचें कारण म्हणून त्यांनीं दिलें आहे तें तर फारच मौजेचें आहे.

"वाकाटकांच्या काळापूर्वीहि रामटेक प्रसिद्ध असावें. कारण तेथून जवळच मनसर येथें एका विशाल स्तूपाचा अवशेष अद्यापि विद्यमान असून उत्खननाची वाट पहात आहे. कधींकाळीं त्याचें उत्खनन झाल्यास या स्थानाची प्रसिद्धि यापूर्वीहि जाईल, याविषयीं आम्हांस संशय वाटत नाहीं."

म्हणजे रामटेक पूर्वीं प्रसिद्ध होतें याचा पुरावा पुढें मिळणार आहे!

प्रोफेसरसाहेबांचें हें तर्कशास्त्र व हा युक्तिवाद थक्क करणारा आहे, यांत संशय नाहीं; पण त्याला संशोधनापेक्षा फलज्योतिषाचा वास अधिक येतो! उत्खननाची वाट पहाणाऱ्या त्या बिचाऱ्या मनसरच्या स्तूपाच्या पोटांत काय असेल तें असो. पण तें, खणण्याच्या आधींच इतकें निःसंशय रीतीनें प्रोफेसरसाहेबांना कसें काय कळलें कोणास ठाऊक! हा एखाद्याच्या आत्मविश्वासाचा प्रश्न नसून शास्त्रीय

प्रतिपादनाचा प्रश्न आहे. इंग्रजींत Wishful thinking म्हणतात त्यांतला हा प्रकार दिसतो. तथापि दीर्घकालीन संशोधकानें त्याला बळी पडून दिशाभुलीला कारण होऊं नये हें चांगलें.

सारांश, रामटेक म्हणजेच ताम्रपटांतील 'रामगिरि' असा कोणताहि आधार नाहीं. तथापि वादाकरितां क्षणभर तसें मानलें तरीदेखील मिराशींचा हेतु सिद्धीस जात नाहीं. नकटीच्या लग्नाला सतरा विघ्नें म्हणतात त्याप्रमाणें ही चुटकी व सपाट टेकडी इतक्या लटपटी करूनहि राम-संलग्न होण्याची पंचाईत आहे. प्रभावती गुप्तेनें तो ताम्रपट रामटेकवरील रामाच्या दगडी पादुकांजवळून दिला असें म्हटलें तरी तेवढ्यानें हा मेघदूतांतील रामगिरि होत नाहीं. कारण तेथें दैवत-स्वरूपी रामाच्या पादुका कालिदासाला अभिप्रेत नसून प्रत्यक्ष रामाचीं-देहधारी रामाचीं पावलें म्हणजे संचार अभिप्रेत आहे. येथें तेहतीस कोटि देवांपैकीं एक देव असा अर्थ नसून अवतार धारण केलेला, दशरथाच्या पोटीं मनुष्यरूपानें येऊन दंडकारण्यांत आलेला राम येथें हवा आहे. *कालिदासाचा रामगिरि तो कीं, जेथें हा* वनवासी राम व सीता प्रत्यक्ष रहात होते. रामटेक तसा नाहीं. प्रभावतीगुप्तेच्या ताम्रपटानें रामगिरीचें दान मिराशींच्या पदरांत पडणार नाहीं. त्या संशयास्पद ताम्रपटानें रामटेकचा 'रामगिरि' झाला तरी तो कालिदासाचा रामगिरि नव्हे, हें स्पष्ट आहे.

## शंबूक व शैवलगिरि यांचा बादरायण संबंध

(ब) आतां मिराशी याचें दुसरें म्हणणें असें कीं, रामटेक हाच रामायणांतला शैवलगिरि. त्याकरितां त्यांना बरीच ओढाताण करावी लागली आहे. त्यांनीं दिलेला पुरावा दुय्यम-तिय्यम दर्जाचासुद्धां म्हणतां येणार नाहीं. प्रथम त्यांचा युक्तिवाद त्यांच्याच शब्दांत पाहूं या :

"रामगिरीचें नांव रामायणांत आलें नाहीं हें खरें; पण तें येणेंहि शक्य नव्हतें, हें सहज ध्यानांत येईल. कारण हें नांव श्रीरामचंद्र तेथें राहिल्यामुळें कांहीं काळानें प्राप्त झालें असावें. या टेकडीचें प्राचीन नांव शैवलगिरि होतें, असें रामटेकमाहात्म्यावरून दिसतें. हा शैवलगिरि शंबूकाच्या तपश्चर्येचें स्थान म्हणून रामायणाच्या उत्तरकांडांत (सर्ग ७९) उल्लेखिला आहे. रामटेकास शंबूक तपश्चर्या करीत होता, अशी आख्यायिका आहे. ज्या ठिकाणीं त्याचा शिरच्छेद झाला, त्या ठिकाणीं शिवलिंग स्थापित करण्यांत आलें व तें अद्यापि धूम्रेश्वर या नांवानें रामटेकवर प्रसिद्ध आहे. त्या प्रसंगीं शंबूकानें प्रार्थना केल्यावरून श्रीरामचंद्रांनीं या गिरीवर वास केला व तेव्हांपासून या टेकडीस रामटेक म्हणूं लागले असें म्हणतात. रामायणांतील शंबूकाच्या तपश्चर्येच्या स्थानाचें वर्णन रामटेकास जुळेल

असेंच आहे. तेव्हां रामवनवासाच्या वर्णनांत रामगिरीचा उल्लेख नाहीं, या आक्षेपांत तथ्य रहात नाहीं.

[ ' संशोधनमुक्तावलि ', पान ६२।६३ ]

या उताऱ्यांतील शेवटच्या वाक्यांतील म्हणजे सिद्धान्तांतील हातचलाखी अत्यंत अनपेक्षित आहे! रामटेक हें शंबूक-वधाचें स्थान् असें क्षणभर मानलें तरी ही हकीगत रामवनवासाच्या वर्णनांत कशी जमा होणार? शंबूक-वध राम लंकेहून परत अयोध्येला आल्यावर कित्येक वर्षांनंतरचा आहे. खुद्द मिराशींनीं शंबूक-वृत्तान्त रामायणांतील उत्तरकांडांत (सर्ग ७५) वर्णिलेला आहे ही गोष्ट वरील उताऱ्याच्या ६ व्या ओळींत लिहिली असून, त्याच टाकानें शाई वाळण्यापूर्वी शेवटच्या १४ व्या ओळींत हा वृत्तान्त रामवनवासांतला आहे असा निर्णयात्मक शेरा ते ठोकून देतात, याला काय म्हणावें हेंच समजत नाहीं! रामटेक राम-वनवासाच्या वर्णनांत आलेलें नाहीं. येऊं शकत नाहीं. याची मिराशींना पूर्ण जाणीव असून हा अभाव त्यांना डांचतो आहे, हें यावरून स्पष्ट दिसतें. एवढेंच नव्हे तर शंबूक-वधार्थ राम नंतर त्या ठिकाणीं येऊनहि आपलें रामटेक-समर्थनाचें काम भागत नाहीं, ही गोष्टहि त्यांना मनांतून खटकत आहे! त्यासाठीं त्यांनीं ही वरील-प्रमाणें ओढाताण चालविली आहे. खरा रामगिरि शोधण्याच्या जिज्ञासेपेक्षां आपल्या रामटेकलाच मारून मुटकून रामगिरि म्हणून प्रस्थापित करण्याचा प्रो. मिराशी यांचा हट्ट यांत दिसतो. तथापि त्याकरितां असा उघड उघड विपर्यास व चापल्य कोणाहि संशोधकाला न शोभण्यासारखें आहे. नुसतें कुंकूं लावून सवाष्ण होत नाहीं!

असो. रामायण रामाला तसें सरळ रामटेकवर येऊं देत नाहीं तर मग आडरस्त्यानें रामटेकला शैवलगिरि 'बनवून' त्याच्यातर्फे बिचाऱ्या रामाला रामटेक-वर आणावयाचें, असा मिराशींचा व्यूह आहे. तथापि वनवासांत असतांनाहि त्याला रामटेकवर आणणें जसें मिराशींना साधलें नाहीं, तसेंच नंतरच्या काळातहि त्यांना तें जमेल, असें वाटत नाहीं.

रामटेक हाच शैवलगिरि व येथेंच शंबूक-वध झाला, हें दाखविण्याकरितां मिराशींनीं तीन आधार दिले आहेत. एक वर उल्लेखिलेला कोरीव शिलालेख. दुसरें[१] ' सिंदूरगिरिमाहात्म्य ' नांवाची पोथी (याला च मिराशींनीं कांहीं वेळेला रामटेकमाहात्म्य असें संबोधलें आहे.) या पोथींत रामटेकचें नांव प्रत्यक्ष आलें आहे कीं नाहीं याचेंहि स्पष्टीकरण मिराशी यांनीं केलेलें नाहीं. यारेरीज एक अप्रसिद्ध बिनछापलेली ४५ अध्यायाची पोथी मिराशी यांना पहावयास मिळाली. यालाच ते बृहत्सिंदूरगिरिमाहात्म्य असें म्हणतात. खरें नांव काय तें दिलेलें नाहीं.

१ (।) पोथी बाजारांत मिळत नाहीं.

या दोनहि माहात्म्यांची किंमत कितपत आहे, हें स्वतः मिराशींनींच पृष्ठ ११६ वरील तळटीपेंत दिलें आहे.

"लघु व बृहत् सिंदूरगिरिमाहात्म्यांत लक्ष्मणाच्या देवळाचा उल्लेख आहे. पण तीं माहात्म्यें फार प्राचीन दिसत नाहींत."

—सरदेसाई स्मा. ग्रंथ, रामटेक येथील शिलालेख.

आतां या जोडीपैकीं धाकट्या पोथीची विश्वसनीयता कितपत तें मिराशीं-च्याच शब्दांत पहा—

"सिंदूरगिरिमाहात्म्य नांवाची पोथी कांहीं वर्षोपूर्वी नागपूर येथें श्री. जोशी यांनीं छापून प्रसिद्ध केली, तींतहि रामटेकच्या व आजूबाजूच्या पंचकोशींतील तीर्थांचा उल्लेख व वर्णन आहे. हें माहात्म्य पद्मपुराणांतून घेतलें आहे असा शेवटीं उल्लेख आहे. तथापि सध्यां प्रसिद्ध असलेल्या आनंदाश्रमग्रंथावलींतील किंवा वेंकटेश्वर प्रेसच्या ग्रंथावलींतील पद्मपुराणांत तें आढळत नाहीं."

—'सरदेसाई स्मा. ग्रंथ', पान ११६–११७

तीच गत थोरल्या भावंडाची :

"वर उल्लेखिलेल्या सोळा अध्यायांच्या सिंदूरगिरिमाहात्म्याशिवाय आणखी एक ४५ अध्यायांची प्रत नागपूर येथील ॲडव्होकेट श्री. दा. तु. मंगलमूर्ति यांच्या वडिलांजवळ आम्हांस पहावयास मिळाली. तींत (अ २, श्लोक १०–११) तपोगिरि व सिंदूराद्रि या दोन नांवांशिवाय महाशैवल नांवाचाहि उल्लेख आहे व या गिरीवर श्रीशंकर शैवास आणतात (अस्मिन् गिरिवरे शम्भो शैवं लाति यतो भवान्) म्हणून यास शैवल म्हणतात अशी व्युत्पत्ति दिली आहे. हें बृहत् सिंदूरमाहात्म्य पद्मपुराणाच्या कौमारखंडांतून घेऊन रामानंदानें लिहिलें असें त्यांत म्हटलें आहे. पण यांतील शंबूकवधा-विषयींचा भाग वाल्मीकिरामायणांतून जशाचा तसा घेतलेला दिसतो. पद्मपुराणाच्या छापील प्रतींत कौमारखंड आढळत नाहीं. तथापि या माहा-त्म्यांतील वर्णनावरून रामटेकला शैवलगिरि म्हणत असावे, या आपल्या अनुमानाला पुष्टि मिळते." [स. स्मा. ग्रं.–१२३]

सारांश, या दोन पोथ्यांनीं वर्णन केलेल्या हकीगती कोठून घेतल्या याचा पत्ता नाहीं. हवाला दिला पद्मपुराणाचा तो खोटा. पहिल्या 'लघु' पोथींत शैवल-गिरि असें नांवच नाहीं! उलट या टेकडीला सिंदूरगिरि व तपगिरि किंवा तपो-गिरि अशीं नांवें दिलीं आहेत. शंबूक तपश्चर्या करीत होता म्हणून तपोगिरि म्हटलें आहे, तर मग मूळ ऐतिहासिक नांव शैवलगिरि कां दिलें नाहीं?

दुसऱ्या 'बृहत्' पोथींतहि सिंदूराद्रि व तपोगिरि अशींच नांवें आहेत. व शिवाय महाशैवल असेंहि नांव आहे म्हणे. एकात शैवल असा साधा उल्लेखहि नाहीं, तर दुसऱ्यांत शैवलाच्या मागें महा जोडलें आहे! मौज ही कीं, ही दुसरी पोथी केवळ हस्तलिखित व अप्रकाशित असूनहि दोन लेखांत व एका पुस्तकांत मिराशी यांनीं त्यांतील एक ओळ अगर शब्दहि उद्धृत केलेला नाहीं! सिंदूरगिरि या नांवाला प्राधान्य दिलेलें आहे, हें दोनहि पोथ्यांच्या नांवावरूनच स्पष्ट कळून येतें. शंका अशी येते कीं, इतर नांवांबरोबर या पोथ्यांमध्यें रामगिरि नांवाचा उल्लेख कां नाहीं?

या दोनहि पोथ्या अलीकडील काळांतील असून उघड उघड भाकडकथा आहेत. स्थानमाहात्म्य वाढविण्याचा त्यांचा हेतु स्पष्ट आहे. पहिल्या पोथीच्या कर्त्यांच्या नांवाचा पत्ता नाहीं! दुसरा कोणी रामानंद आहे, पण त्यानें त्यांतली हकीगत पद्मपुराणांतून घेतली अशी जी लोणकढी ठेवून दिली आहे, त्यावरून त्याचीहि विश्वसनीयता संशयास्पद झाली आहे. पहिलीच्या १६ अध्यायांत व दुसरीच्या ४५ अध्यायांत बाकी मजकूर काय आहे, याबद्दल मिराशी यांनीं चकारशब्दानें देखील वाच्यता केलेली नाहीं! त्यांच्या नांवावरून त्यांत नृसिंह-अवतार-चरित्राचें पाल्हाळिक वर्णन असावें असा तर्क वहातो. नृसिंहाच्या भव्य मूर्ति असलेलीं दोन देवळें रामटेकवर आहेत व 'येथें नरसिंहानें आपल्या तीक्ष्ण नखाग्रानीं हिरण्यकशिपूचें वक्षःस्थळ फाडलें. त्यांतून वहाणाऱ्या रक्तानें हा सर्व प्रदेश माखला गेला. तेव्हांपासून त्याला[1] सिंदूरगिरि म्हणूं लागले' ही कथा वरील शिलालेखाच्या पहिल्या भागांतहि वर्णिलेली आहे, यावरून हें स्थळ प्राधान्येंकरून नरसिंहाचें समजलें जात असावें, हें उघड आहे. खुद्द शिलालेखांतहि सिंदूरगिरि हें नांव ४।५ वेळां आलेलें आहे. नंतर शिलालेखांतील शंबूकाचा उल्लेख पाहून अगर अन्य कारणानें ही समजूत लोकांत पसरल्यावर अगर पसरविण्यासाठीं दुसऱ्या पोथीनें डोकें लढवून महाशैवल हें नांव दडपून दिलें आहे, हें स्पष्ट दिसतें. पहिल्या पोथींत हें नांव नाहींच!

आतां शिलालेख. रामटेकच्या टेकडीचीं सिंदूरगिरि व तपंगिरि अशीं नांवें प्रस्तुत लेखांत आलीं आहेत. सिंदूरगिरि पांच वेळा व तपंगिरि दोनदां. ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, **शैवलगिरि किंवा रामगिरि हें नांव याहि शिला-लेखांत अजिबात नाहीं!** हा लेख १२-१३ व्या शतकांतला आहे, असा कयास आहे. हा लेख संस्कृत कविताबद्ध असला तरी त्याची एकंदर रचना अगदींच

१ रायबहादूर डॉ. हिरालाल यांनीं अनुमान केल्याप्रमाणें सिंदूरगिरि हें नाव प्रारंभीं या टेकडीवरच्या तांबूस रंगाच्या दगडावरून पडलें असावें. या टेकडीवरचे दगड तांबूस रंगाचे असून ताजे फोडलेले असल्यास विशेषतः उन्हांत रक्तासारखे लालभडक दिसतात.

सामान्य, शिथिल, अशुद्ध व हरदासी थाटाची आहे. वरील नांवांपैकीं पहिल्याची म्हणजे नृसिंहासंबंधींची कथा आधीं म्हणजे २३ व्या ओळींत आली आहे. त्यानंतर आणखी कांहीं देवतांचें व तीर्थांचें वर्णन उरकून मग ४५ व्या ओळींत शंबूकाचा उल्लेख आला आहे. तो असाः--

श्रीरामचंद्रस्य करेण चंद्रहासात् हतः प्राप्य पदं मुरारेः ।
स शंबुकः शूद्रमुनिर्महीध्रराजेऽत्र धूम्राक्ष इति प्रसिद्धः ॥

—स. स्मा. ग्रंथ, पृ. १२६.

प्रस्तुत शिलालेखांतील सुमारें सवाशें श्लोकांपैकीं एकाच श्लोकांत शंबूकाचा उल्लेख आहे. परंतु त्याबाबत खालील तीन गोष्टी विशेष उल्लेखनीय आहेत—

१ यांत शंबूकानें **रामचंद्राला तुम्हीं या गिरीवर वास करावा, अशी प्रार्थना केलेली नाहीं.**

२ वधामुळें मुक्त झालेला शंबूक या डोंगरावर धूम्राक्ष म्हणून प्रसिद्ध असला तरी **येथें त्याला मारला असा उल्लेख नाहीं.**

३ या श्लोकांत **शंबूक तप करीत होता आणि तें येथें करीत होता असेंहि नाहीं.**

याहूनहि महत्त्वाची गोष्ट ही कीं, शंबूकानें येथें तप केलें म्हणून याला तपंगिरि असें नांव पडलें, अशी जी भाकडकथा सिंदूरमाहात्म्यानें रचली आहे त्याच्याशीं पूर्ण विसंगत असा हा शिलालेख आहे. बाविसावी ओळ पहा. खंडित झालेली आहे; पण त्यावरून कल्पना बरोबर येईल—

... वायुपुत्रयुक्तो वसत्युत्तमयोगिचिंत्यः ।
महीधरस्यास्य तपंगिरेस्तं प्रभावमग्र्यं किमुदाहरामि ॥

म्हणजे तपंगिरि (वास्तविक शुद्ध रूप तपोगिरि असें पाहिजे) हें या टेकडीचें नांव शंबूकाच्या तपाचरणावरून पडलें असें नसून जिथें वायुपुत्र हनुमानासह असलेला म्हणजे राम (वरच्याच २१ व्या ओळींत रामाचा उल्लेख आलेला आहे तोच येथें पुढें चालू आहे.) येथें वास करतो तो हा तपंगिरि किंवा म्हणून हा तपंगिरि, असें म्हटलें आहे.

एकंदरींत सदरच्या शिलालेखाचा मजकूर व मगदूर आणि विश्वसनीयता अगदींच सामान्य व यथातथा आहे. तो वर सांगितलेल्या 'माहात्म्यां'च्याच मासल्याचा आहे. तेथें असलेल्या देवतांचीं व तीर्थांचीं वर्णनें व उपासनेचें फल पाल्हाळिकपणानें स्थानमाहात्म्य वाढविण्याच्या हेतूनें सांगितलेलें आहे. त्यांत रामगिरीचें तर नाहींच, पण शैवलगिरि हें नांव मुद्दां आलेलें नाहीं, हें वर सांगितलेंच आहे. या शिलालेखावरून शंबूक येथें तपश्चर्या करीत होता अथवा त्याला रामानें

येथें ठार मारलें अगर त्यामुळें याचें नांव 'तपगिरि' पडलें, असें दिसत नाहीं व सिद्ध होत नाहीं. उलट असे उल्लेख नसल्यामुळें या गोष्टी तिथें घडल्या नाहींत, याचा मात्र तो पुरावा होऊं शकतो.

याप्रमाणें मिराशींचे तीन आधार परस्परविसंगत, विश्वसनीयतेच्या दृष्टीनें हीन दर्जाचे व म्हणून निर्बल व निराधार आहेत. शिवाय, त्यांनीं आपली भिस्त खुद्द रामायणाच्या उत्तर कांडावरच ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. "तेव्हां तेथील वर्णन रामटेकास कितपत जुळतें तें पाहूं." पहिली गोष्ट अशी कीं, उत्तरकांडांत शंबूक हा शैवल पर्वताच्या **उत्तरेस** एका विस्तीर्ण **तळ्यांत** (किंवा त्याच्या कांठीं म्हणा) तपश्चर्या करीत होता, असें वर्णन आहे. पर्वतावर नव्हे ! पहा—

दक्षिणां दिशमाक्रामत् ततो राजर्षिनंदनः
शैवलस्योत्तरे पार्श्वे ददर्श सुमहत्सरः
तस्मिन् सरसि तप्यन्तं तापसं सुमहत्तपः
ददर्श राघवः श्रीमाह्लम्बमानमधोमुखम्
(अध्याय ७५·१३-१४)

यावरून 'शैवलगिरि शंबूकाच्या तपश्चर्येचें स्थान म्हणून रामायणाच्या उत्तरकांडांत उल्लेखिला आहे' हें मिराशींचें वरील उताऱ्यांतलें विधान कसें अशास्त्रीय व विपर्यस्त आहे, हें दिसून येईल. दुसरा महत्त्वाचा मुद्दा दिशेसंबंधीं. वरील श्लोकांत राम दक्षिण दिशेला आला असा जो उल्लेख आहे, त्याचेच आधीं राम शोध करीत विमानांतून प्रथम पश्चिमेला, मग उत्तरेला व नंतर पूर्व दिशेकडे गेला होता, असें वर्णन आलें आहे (श्लोक १०।११). म्हणजे पूर्व दिशेकडून रामटेकला यावयाचें म्हटलें तर ती दक्षिण दिशा खासच होणार नाहीं. हा रामाचा प्रवास चक्र पूर्वेकडून **पश्चिमेला** असा होईल. म्हणजे रामायणांत उल्लेखिलेला शैवलगिरि रामटेकनजीक नसून हल्लींच्या ओरिसा व आंध्र यांच्यामध्यें गोदावरीच्या आसपास कोठेंतरी असला पाहिजे, असें निष्पन्न होतें. शंबूकाची हकीकत दंडकारण्यांत झाली असें सांगतांना रामायणकारांनीं दंडकारण्याचा स्थलनिश्चय विंध्यशैवलयोर्मध्ये (उत्तरकांड सर्ग ७९·१६) असा केला आहे. विस्तीर्ण दंडकारण्याची उत्तरसीमा जशी विंध्याची लांबलचक रांग सांगितली, त्याचप्रमाणें दक्षिणसीमा जी शैवल तीदेखील एक लांब पर्वतरांग किंवा निदान एखादा मोठा आडवा म्हणजे पूर्व-पश्चिम पसरलेला–थोडा तरी लांबट आकारमानाचा पर्वत असावा, अशी अपेक्षा करणें चुकीचें होणार नाहीं. रामटेक तर मोकळ्या मैदानांत मध्येंच वर आलेली एकच ठेंगणी टेकडी आहे ("an isolated small hill"). शिवाय दंडकारण्य, त्यांतलें जनस्थान व पंचवटी-नाशिकच्या आसपास म्हणजे पश्चिम किनाऱ्याकडचा प्रांत असें सर्वसाधारण-पणें समजण्याची आतांपर्यंतची वहिवाट पडली आहे. परंतु या ठिकाणांना दिलेली

ही जागा जुळत नाहीं. हीं स्थळें पूर्व गोदावरीच्या जवळपास असावींत, हें आम्हीं पुढें दाखविलें आहे. प्रसिद्ध दण्डकारण्य[*] उत्तरेला विन्ध्यापासून छोटा नागपूर प्रांत, छत्तीसगड, गोंडवन म्हणतात तो भाग व्यापून ठोकळ मानानें पूर्व-गोदावरी-पर्यंत किंवा जरा पुढें निम्म्या आंध्रभर पसरलेलें असावें, असें दिसतें. या दृष्टीनेंहि दण्डकारण्याची दक्षिण सीमा म्हणून रामटेक जमूं शकत नाहीं. विंध्यापासून रामटेक एवढेंच दंडकारण्य मानल्यास त्यावर अव्याप्तीची आपत्ति ओढवेल.

शंबूक दंडकारण्यांत पण विदर्भांतच तपश्चर्या करीत होता, असा आग्रह मिराशींनीं धरला आहे. विदर्भ या संपन्न देशाचें वर्णन रामायणांत व रघुवंशांतहि आलें आहे. असा हा विदर्भ दंडकारण्यांत कसा मोडेल, हें समजत नाहीं. शंबूक शैवलगिरीच्या उत्तरेस असलेल्या तळ्यांत तपश्चर्या करीत होता, तेथें येऊन रामानें त्याचा शिरच्छेद केला, असें रामायणांत म्हटलें आहे. तेथूनच श्रीरामचंद्र देवांसह आपापल्या विमानांत बसून लगेच अगस्त्याश्रमीं गेले. (उ. कांड ७६·१६-२०) म्हणजे रामचंद्र त्या तळ्यापासून तपश्चर्येच्या व शंबूकवधाच्या स्थानापासून दक्षिणे-कडे असलेल्या शैवलगिरीपर्यंत गेलेच नाहींत आणि त्याच्यावर चढलेहि नाहींत. तिथें लगोलग आलेल्या देवांच्या प्रार्थनेनुसार राम तडक व परस्पर विमानानें अगस्त्याश्रमांत गेले, असा स्पष्ट वृत्तान्त वर्णन केला आहे. म्हणजे इतकें करून शैवलगिरीला रामाचे पाय लागत नाहींतच!

शंबूकानें मी शैवलगिरीवर धूम्राक्ष या नांवानें शिवलिंगांत राहीन व तुम्हींहि या गिरीवर सदोदित वास करावा; अशी रामाला प्रार्थना केली व रामानें त्यास मान्यता दिली; इत्यादि भाकडकथांचा रामायणांत गंध सुद्धां नाहीं. शंबूकाचाच शैवलगिरीशी संबंध येत नाहीं, मग रामाचा कुठून येणार?

येणेंप्रमाणें कशाचा कशाला मेळ नाहीं, अशी परिस्थिति असतांहि लेखाच्या शेवटीं मिराशी निष्कर्ष काढतात—

"तथापि उत्तरकांड लिहिलें गेलें त्या काळीं विंध्य पर्वताच्या दक्षिणेस व गोदावरीच्या उत्तरेस विदर्भांत कोठें तरी शंबूकाच्या तपश्चर्येचें स्थान होतें यांत संशय नाहीं. रामायणांतील या स्थानाचें वर्णन रामटेकास जुळेल असें

[*] पंचवटी, जनस्थान व दंडकारण्य हीं स्थळें एकमेकांत किंवा निदान निकटवर्ती असलीं पाहिजेत यांत शंका नाहीं त्यांच्या व्याप्तीबद्दल व नक्की ठिकाणाबाबत विद्वानांच्यांत वाद आहेत. तथापि कालिदासाच्या समजुतीप्रमाणें जनस्थान स्थूलमानानें भारताच्या दक्षिण टोकापर्यंत पसर-लेलें असावें; पंचवटी पूर्व गोदावरीनजीक भद्राचलमच्या जवळपास; आणि दंडकारण्याची उत्तर सीमा विंध्य किंवा विंध्याच्या किंचित् उत्तरेला. हा विषय पुढील प्रकरणांत आला आहे. कालि-दासाचें स्थळवर्णन प्राचीन परंपरेला धरून असणार हें उघड आहे. त्या दृष्टीनें कालिदास स्थळ-निश्चय कोणता करतो, याला फार महत्त्व आहे. यावरून वरील स्थळें पश्चिम किनाऱ्याकडे नसून पूर्वेकडील किनाऱ्यालगत होतीं असें दिसतें.

आहे. कारण रामटेकास टेकडीच्या पायथ्याशीं अंबाळे नांवाचा तलाव अद्यापि विद्यमान आहे. ”

[ सरदेसाई स्मारक ग्रंथ, पान १२३ ]

मिराशींची इतर सर्व प्रमाणें तर घसरलींच पण शेवटीं अंबाला तलावानेंहि त्यांना दगा दिला आहे! कारण अद्यापिहि 'विद्यमान असणारा हा तलाव' रामटेकच्या पूर्वेकडून दक्षिणबाजूकडे पसरलेला आहे. उत्तरेस नाहीं!

( क ) आणि ( ड ) या मुद्द्यांचा विचार वरील विवेचनांत आलेलाच आहे.

आतांपर्यंत मिराशींच्या मुख्य मुद्द्यांचें निरसन झालें. आतां त्यांच्या रामटेक-प्रस्थापनेंत आणखी किती अडचणी आहेत, त्यांचा फक्त निर्देश करून पुढें जाऊं. मिराशींचें एक वाक्य पुन्हां पाहूं :

“ त्या प्रसंगीं शंबूकानें प्रार्थना केल्यावरून श्रीरामचंद्रांनीं या गिरीवर वास केला व तेव्हांपासून या टेकडीस रामटेक म्हणूं लागले, असें म्हणतात. ”

म्हणजे रामायणकालापासून आजपावेतों रामटेक नांवच चालत आलें ना? मग मधेंच याचें नांव रामगिरि होतें, असें कसें म्हणतां? रामगिरि नांव केव्हां पडलें? कोणत्या कारणामुळें पडलें? त्याला प्रमाणें काय? हें नांव केव्हां बंद झालें किंवा बदललें? तें बदलण्याला कारण काय झालें? तुमच्या या डोंगराचें प्राचीन नांव सिंदूरगिरि व 'तपंगिरी' होतें तर त्याचा उल्लेख किंवा त्याला दुजोरा कोणत्याच प्राचीन ग्रंथांत किंवा पुराणांत कां सांपडूं नये? वाकाटकांच्या काळांत ( ५ वें शतक ) हा रामगिरि नांवानें ओळखला जात होता, तर मग १३ व्या शतकांत याचा सिंदूरगिरि अगर तपगिरि कसा झाला? एकदां रामगिरी झाल्यावर पुन्हा तपंगिरि कसा होईल? दोन्ही रामटेक-माहात्म्यांत रामगिरीचा उल्लेख कां नाहीं? शैवलगिरि हें अगदीं जुनें पाळण्यातलें नांव मुद्दां आठवतें मग रामगिरि या अलीकडील नांवाची विस्मृति कशी काय? इतकीं नांवें बदलणाऱ्या या डोंगराचा नक्की भरंवसा कसा धरावा?

या टेकडीवर रामाचें देवालय आहे म्हणून पायथ्याशीं असलेल्या गांवाला रामटेक नांव पडलें, असें मिराशी लिहितात. पुढें प्रांताभिमानानें अथवा स्थानमाहात्म्य वाढविण्याकरितां या स्थळाशीं रामचंद्राचा प्रत्यक्ष संबंध जोडण्याची 'कल्पकता' मध्यंतरीं सुचलेली असावी. ती आतां संशोधनक्षेत्रांत दिसते. तोच प्रयोग मागील अंकावरून पुढें चालू आहे!

याप्रमाणें रामटेकची कुंडली एकादि बाबतींत शैवलगिरीशीं जमत नाहीं. छत्तीस गुण तर नव्हेतच पण त्यांचा छत्तीसाचा आंकडा मात्र आहे! असें असतां 'रामायणांतील वर्णन रामटेकास जुळेल असें आहे' अशी लगट कोणीं केली तरी ती सिद्धीस जाण्यासारखी नाहीं.

अस्माकं बदरीचक्रं युष्माकं बदरीतरुः।

असा अजब बादरायणसंबंध चिकटविणाऱ्या माणसाची गोष्ट या ठिकाणीं आठवल्याशिवाय रहात नाहीं. कसे तरी रामटेकला रामाचे पाय लागावे, अशी मिराशींची इच्छा आहे खरी. पण तशी रामाची अगर रामायणाची इच्छा नाहीं, त्याला काय करणार? इतर प्रमाणांनीं रामटेक हा रामगिरि ठरायचा असेल तर ठरो. पण त्याचा रामाशीं संबंध येऊं शकत नाहीं हें निश्चित. आणि त्याचें शैवलगिरीचेंहि सोंग साधत नाहीं हें निश्चित. म्हणून रामटेक रामगिरि होऊं शकत नाहीं.

एवढ्या एका प्रबळ कारणानुळेंहि रामटेकला रद्द ठरवितां येईल. तथापि अजून उरलेलीं लक्षणें (७ ते २४) रामटेकशीं जमत नाहींत हें पहावयाचें आहे. त्यानंतर पुढील प्रकरणांत हींच चोवीस वैशिष्ट्यें रामगड पर्वताला किती उत्कटपणें व औचित्यपूर्णतेनें जुळतात तें दाखवावयाचें आहे.

७ नियमानें दरवर्षी जलवृष्टि होणें हें लक्षण अर्थात् उभय ठिकाणांना लागूं शकेल. तथापि प्रस्तुतच्या १२ व्या श्लोकांतलें एकंदर वर्णन व सूर लक्षांत घेतां हें विंध्य पर्वतराजींतल्या डोंगराचें वर्णन असलें पाहिजे असा मनोमन प्रत्यय येतो. विंध्यांतले पर्वत, त्यांचे उंच माथे, त्यांना टक्करा देणारे किंवा मिलणारे मेघ आणि त्या पर्वतशिखरांवर पडणाऱ्या पर्जन्यधारा-हा देखावा कालिदासाच्या पूर्ण परिचयाचा व आवडीचा असून हें दृश्य त्याच्या मनांत पूर्ण भिंदलेलें आहे, हें लक्षांतः ठेवलें पाहिजे (कु. सं. २-८।१६।१९।२७ व रघु. १४-८ शिवाय पूर्वमेघ १७.) विशेषत मार्मिकांनीं ऋतुसंहारांतील पावसाळ्याच्या वर्णनाचा २-२७ हा श्लोक पहावा—त्यांतील वर्णन व कल्पना मेघदूतांतील आम्रकूटाला बिनचूक लागू पडते.तें पुढें १४ व्या लक्षणांत स्पष्ट केलें आहे. आम्रकूट म्हणजेच नर्मदेचें उगमस्थान असलेला प्रसिद्ध अमरकंटक, हें आम्हीं पुढें दाखविलें आहे. अमरकंटक विंध्यांतलाच. अमरकंटक नक्की ठरला कीं, तिथें पोंचायला मेघाला रामगड पर्वतावरूनच निघालें पाहिजे, हें आपोआप सिद्ध होतें. विंध्याच्याच नव्हे तर सातपुड्याच्याहि पलीकडे दक्षिणेला असलेलें रामटेकचें टेकाड प्रस्तुत श्लोकांत विवक्षित असणें शक्य नाहीं.

## चुकीचीं स्थळें व चुकीचे अर्थ

८ याची चर्चा पूर्वी केलेली आहे. त्यावरून पर्वताग्राला बिलगलेला मेघ पुढें झटकला कीं त्यालून पहाणाऱ्यांना (उन्मुखीभिः) सोसाट्याचा वारा पर्वतशिखरच उडवून टाकतो आहे कीं काय, असा भास होतो, हें दृश्य बिनशिखराच्या व बुटक्या रामटेकला लागू पडत नाहीं, हें सहज लक्षांत येईल. प्रस्तुत श्लोकाची (१४ वा) घडण व त्यांतील शब्दप्रयोगांची ठेवणच अशी कांहीं आहे कीं, कवि पाहिलेली—अनुभविलेली गोष्ट सांगतो आहे याचा प्रत्यय येतो. विंध्यांतील अनेक वेधक दृश्यांपैकीं

हें एक मनोहर दृश्य कवीनें अनेक वेळां पाहिलेलें असावें आणि त्यांतली निसर्गाची भव्यता व सौंदर्य यांचा अनुभव प्रत्यक्ष घेतलेला असला पाहिजे. इतकें हें रेखीव शब्दचित्र आहे. हें वर्णन अथवा लक्षण पुढें रामगड पर्वताला अत्यंत अद्वितीयत्वानें व खात्रीलायक रीतीनें जुळतें, हें येथें अगाऊच सुचवून ठेवतों.

९ हें ११ वें व १७ वें अशीं तीनहि लक्षणें एकदम घेऊं. कारण या सर्वांत जवळपास रहाणाऱ्या जंगली व शेतीवर जगणाऱ्या लोकांचा अथवा त्यांच्या स्त्रियांचा उल्लेख आहे. वर ८ मध्यें वर्णन केलेलें अद्भुत दृश्य येथील मुग्ध सिद्धांच्या अंगना पहातात, असें वर्णन आहे. येथें सिद्ध या शब्दाचा अर्थ मल्लिनाथ-प्रभृतींनीं 'सिद्धानाम् देवयोनिविशेषाणाम्' असा दिला आहे व अनेक भाषांतरकारांनीं आणि टिप्पणीकारांनीं तोच स्वीकारला आहे. पुष्कळांनीं कदकद नको म्हणून तोच शब्द जसाच्या तसा भाषांतरांत उतरविला आहे. तथापि हा अर्थ जुळण्यासारखा नाहीं. देव-यक्ष-गंधर्व यांच्या मालिकेंतले जे सिद्ध व त्यांच्या अंगना या जोडप्यांचा संचार अंतरिक्षांत असतो. वारा पर्वतशिखर उडवून देतो आहे कीं काय, असा भास त्यांना वरून देखील कदाचित् होण्याचा संभव आहे. तथापि उन्मुखीभिः या पदामुळें सिद्धांगना शिखरस्थ मेघाच्या पातळीच्या खालीं – पायथ्याशीं असणें जरूर आहे. शिवाय हें दृश्य पाहून विशेष चकित (चकितचकितम्) होण्याइतक्या या देवयोनींतल्या सिद्धांगना मुग्ध म्हणजे गांवढळ असत नाहींत. आणि एकत्र फिरणाऱ्या या जोडप्यांपैकीं अंगना तेवढ्या चकित होतील आणि सिद्ध मात्र होणार नाहींत, असें म्हणण्यांतहि कांहीं स्वारस्य नाहीं. सारांश, सिद्ध म्हणजे देवयोनींपैकीं अथवा ऋषिमुनि हे दोनहि अर्थ येथें संभवत नाहींत. [1]गांवढळ, असंस्कृत, रानांत-जंगलांत राहणाऱ्या स्त्रिया एवढाच अर्थ येथें अभिप्रेत आहे, हें उघड आहे. लगेच पुढच्या १६ व्या श्लोकातल्या जनपदवधू या शब्दावरूनहि हाच अर्थ दृढ होतो.

आता रामटेकजवळ जंगली किंवा रानवट लोकांची वस्ती हल्लीं नाहीं आणि पूर्वींहि असण्याचा संभव दिसत नाहीं. जंगली लोकांची वस्ती असण्याला अनुकूल अशी जंगलें गर्द रान अथवा डोंगराळ मुलूख रामटेकपाशीं नाहीं. उलट रामटेक हें संपन्न विदर्भांतलें एक महत्त्वाचें व रहदारीचें ठिकाण होतें, असें प्रो. मिराशी यांचें प्रतिपादन आहे. रामटेकजवळच असलेलें नंदर्धन किंवा नगरधन म्हणजेच पूर्वींचें नंदिवर्धन. ती पूर्वीं वाकाटकनृपतींची राजधानी असावी, असेंहि त्यांचें म्हणणें आहे. तेथून वाकाटकाचे ताम्रपट दिलेले आहेत. तात्पर्य, रामटेकची छोटेखानी टेकडी, भोंवतीं विदर्भांचा भरभराटलेला व सुपीक प्रदेश, शेजारीं राजधानी व रहदारी,

१. सिद्धः—सिद्ध म्हणजे मूळ स्वरूपांतले, अ–साधित किंवा संस्कार न झालेले. म्हणजे लक्षणेनें रानटी, गावढळ असा अर्थ आहे. या अर्थानें हा शब्द प्राचीन वाङ्मयातहि वापरलेला आढळतो. शबरीला सिद्धा म्हटलें आहे. (रामा. अरण्यकाड ७४.६।१०)

राजवंशीयांची ये-जा इत्यादि गोष्टी लक्षांत घेतां हा परिसर वनौकसांची वस्त होण्यालायक नाहीं असें दिसतें. तसेंच हा भूमाग तपोवन किंवा आश्रम-भूमि ( मे. श्लोक १ ) होण्यासहि योग्य नाहीं. कारण त्याला जो एकान्त, शांतता, कांहींशी दुर्गमता व निसर्गरम्यता लागते ती येथें नाहीं.

उलट रामगड पर्वताचा परिसर म्हणजे पूर्वीचा छोटा नागपूर किंवा छत्तीसगडचा प्रान्त डोंगराळ मुलूख आहे हें प्रसिद्ध आहे. तिथें अजून रानटी आदिवासी लोकांची वस्ती आहे एवढेंच नव्हे तर त्यांपैकीं एक जमात सिद्दम ( Siddam ) या नांवाची आहे. हा शब्द सिद्ध-सिद्धम् यावरून झालेला असावा. पण त्याची चर्चा पुढें.

आतां ११ वें लक्षण. तें ज्या १६ व्या [1]श्लोकांत आहे, त्याचा आशय असा शेतीचें किंवा पिकाचें भवितव्य तुझ्या हातांत म्हणून या गांवढळ स्त्रिया ( रामगिरि आणि मालक्षेत्र यांच्या दरम्यानच्या टापूंतल्या ) उत्कंठित होऊन तुझ्याकडे आशाळभूत नजरेनें व अपेक्षेनें पहात आहेत. त्यांनीं नुकत्याच मोठ्या कष्टानें व आशेनें त्यांच्या जमिनी नांगरून उखळून ठेवल्या आहेत पहा. तेव्हां तूं त्यांच्यावर आरोहण करून वृष्टि कर. म्हणजे त्या तृप्त भूमीचा सुगंधहि मजेदार सुटेल इ. मालक्षेत्र रामगिरीला लागूनच. त्यामुळें वर रानटी लोकांच्या वस्तीसंबंधीं मांडलेली विचार सरणीच या समीपवर्ती गांवढळ स्त्रियांनाहि ( जनपदवधू ) लागू पडेल.

लक्षण १६ वें आम्रकूट पर्वतासंबंधींचें आहे ( श्लोक १९ ) आम्रकूटावर जंगलांत रहाणाऱ्या लोकांच्या स्त्रियांनीं उपभोग घेतलेले लताकुंज आहेत असें वर्णन आहे. आम्रकूट म्हणजे अमरकंटक. त्या ठिकाणीं अजूनहि जंगली आदिवासी लोकांची वस्ती आहे.

मिराशींना नक्की आम्रकूट कोणता, हें सांगतां येत नाहीं. ते लिहितात : "आम्रकूट हेंहि अमरवाड्याजवळचें सातपुड्याचें त्या कालीं प्रसिद्ध असलेलें एक शिखर असावें, असें मानण्यास हरकत नाहीं." मिराशींचा आम्रकूट असा मोघम आहे. तो नाशा बीत कसा ठरवितां येणार ?

१० सरस-निचुलात् उत्पत ( श्लोक ):—या शब्दसमूहापैकीं उत्पत शब्दावरून मेघाला आहे त्यापेक्षांहि वर उड्डाण करावयाला सांगितलें आहे, असा ध्वनि

१. दुःखितालाच दुःखिताचें दुःख समजूं शकत किंवा समानशीले व्यसनेषु सख्यम् हें तत्त्व कवीनें या श्लोकात सहजपणें व कलात्मकतेनें सूचित केलें आहे. आपद्ग्रस्ताचे अंतःकरण हळवें व कोमल बनतें. त्याला इतरांबद्दल सहानुकंपा निर्माण होते. संदेश सांगून मेघ-दूताला अलकेकडे पाठविण्याच्या घाईतहि कालिदास मेघाकडे आतुरतेनें डोळे लावून बसलेल्या मुग्ध जनपद-वधूंना विसरत नाहीं ! लहरी पावसावर अवलंबून असलेल्या कृषिप्रधान जनतेच्या दुःखाची जाणीव कवीला होती, हें यावरून दिसतें.

निघतो. रामगिरीवरून निघाल्यानंतर प्रथम मालक्षेत्र व नंतर आम्रकूट लागतो. माल ही शेत-जमीन असल्यामुळें फारशी म्हणजे पर्वतप्राय उंच असणें संभवत नाहीं. अर्थात् उत्पत यांतील रोख पुढच्या आम्रकूटावर आहे. म्हणजे आम्रकूट रामगिरी-पेक्षां उंच मानावा लागतो. परंतु मिराशींचा आम्रकूट कोणता, हें नक्की नसल्यामुळें प्रस्तुतचे लक्षण लागू पडतें कीं न पडतें हें ठरवितां येत नाहीं!

उलटपक्षीं आमच्या आंखणीप्रमाणें आम्रकूट म्हणजे अमरकंटक. तो राम-गिरीपेक्षांहि उंच आहे. रामगड पर्वत ३२०० फूट तर अमरकंटक ३४६८ फूट उंच आहे. रामगड पर्वतावर उभें राहिलें असतां पश्चिमेकडचा भव्य व उंच अमरकंटक दिसतो असें म्हणतात. (बेगलर A. S. of India, Vol. XIII)

**निचुल**—सरस-निचुल म्हणजे या ठिकाणीं रसाळ वेत होते असा करतात. निचुल नामक स्थलवेतस होते. (मिराशी) निचुल म्हणजे वानीर किंवा वेतस असा अर्थ मल्लिनाथ शब्दार्णवाच्या आधारें देतो. निचुल याचा दुसरा एक अर्थ समुद्रफळ असाहि आहे. समुद्रफळालाच हिज्जल वृक्ष म्हणतात. पण तोहि अर्थ समाधानकारक नाहीं. तूर्त हा अर्थ घेतला तरी रामटेकवर वेत उगवतात, असें दिसत नाहीं. [ कारण रामगिरीचें हें एक लक्षण म्हणून मिराशींनीं नमूद केलें आहे. तथापि रामटेकवर वेत आहेत कीं नाहींत याचा कांहींच उल्लेख त्यांनीं केलेला नाहीं. ]

तथापि एकंदरींत निचुल म्हणजे वेत हा अर्थ पटण्यासारखा नाहीं. राम-गिरीचा निरोप घेतांना नव्हे, प्रत्यक्ष तेथून प्रयाण करतांना कवि त्या स्थळाचें जें एकच विशेषण घालीत आहे, त्यांत त्याचें नेमकें वैशिष्ट्य हेरूनच तें ग्रथित करणार हें स्पष्ट आहे. त्या स्थानीं सरस अशीं वेताचीं झाडें होतीं, असें म्हणण्यांत काव्या-मध्यें कोणती सरसता उत्पन्न होण्यासारखी होती? चांगल्या कवींच्या हातून सुद्धां कधीं कधीं सामान्य रचना होत नाहीं असें नाहीं. तथापि हें स्थळ त्यांतलें नव्हे. आणि औचित्याला जपणारा कालिदासहि अशा कवींपैकीं नाहीं. यावरून निचुल शब्दाचा कांहींतरी खास अर्थ अभिप्रेत असावा आणि त्यांत या स्थळाचें वैशिष्ट्य वर्णन केलेलें असावें असें वाटतें. पुढें रामगड पर्वताची माहिती द्यावयाची आहे, त्यांत त्या पर्वतावर असलेल्या भव्य व आरपार नैसर्गिक गुहेचें वर्णन येईल. त्या गुहेंत निर्मल पाण्याचा एक निर्झर अद्यापीहि वहात आहे. ही सुमारें ४५० फूट लांबीची व २० पासून ४० फूट उंचीची आरपार गुहा किंवा बोगदा हें या रामगड पर्वताचें अद्वितीय वैशिष्ट्य आहे, हें सांगणें नकोच. आणि याच वैशिष्ट्याचा कालिदासानें निचुल शब्दांत उल्लेख केला आहे, असा आमचा तर्क आहे. त्याचें विवेचन पुढें ओघानें येईलच.

११ याचें विवरण पूर्वीं ९ व १८ या मुद्यांशीं संलग्न म्हणून एकत्रित ^केलें आहे.

प्रस्तुत विषयाच्या दृष्टीनें विशेष महत्त्व नाहीं. मालक्षेत्र उत्तरेला असो की पश्चिमेला असो. त्यानंतर मेघाची दिशा व मार्ग कोणता, हा खरा महत्त्वाचा मुद्दा आहे. त्यावरून इतर संबंधित स्थळांचा शोध लागणार आहे. त्याकरितां माल पठार आक्रमून झाल्यानंतर ( मालमारुह्य )—

किंचित् पश्चात् व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण ।

असें सांगण्यांत यक्ष मेघाला कोणती दिशा दाखवीत आहे, याची मीमांसा करावी लागेल.

तूर्त आपल्याला मिराशींनीं सुचविलेलें मालाचें स्थान बरोबर जमतें कीं नाहीं एवढेंच पहावयाचें आहे. आतां मिराशींची स्थिति कशी झाली आहे पहा. नर्मदा नदी रामटेकच्या थेट डोक्यावर म्हणजे उत्तरेला आहे. नर्मदा तर गांठलीच पाहिजे. ( श्लोक १९ ) म्हणून मिराशींच्या मेघाला रामटेकहून निघालें कीं तडक व नीट बाणासारखें उत्तरेला जावें लागतें. पण त्यामुळें पश्चिमेकडे जा ( श्लोक १६ ), या स्पष्ट व अर्थपूर्ण आदेशाला जोराचा धक्का बसतो. या मिराशींच्या मार्गामुळें कालिदासाच्या पश्चिम दिशेचा चेंदामेंदा होतो आहे ! या अडचणींतून मुक्तता करून घेण्यासाठीं मिराशींनीं खालील युक्तिवाद लढविला आहे. रामटेकहून नर्मदेला ( नरसिंगपूर ते जबलपूरच्या दरम्यान ) म्हणजे दक्षिणेकडून थेट उत्तरेला जातांना वाटेंत अमरवाडा गांव जरा पश्चिमेला रहातें. तिकडे मेघ झुकला असें मानावे म्हणजे झालें ! इतकी अर्थाची ओढाताण कां करावयाची ? तर अमरवाडा या शब्दाचें आम्रकूटाशीं साम्य दिसलें आहे म्हणून ! पण दुर्दैवानें अमरवाडा पडलें गांवाचें नाव, तो पर्वत ( सानुमान् ) नाहीं ! मग आतां ? आता " आम्रकूट हेंहि अमरवाड्याजवळचे सातपुड्याचें एक शिखर असावें असें मानण्यास हरकत नाहीं. " ( सं. मु. सर १ ला पृष्ठ ६० ) प्रारंभ चुकला कीं, पुढली वाटहि कशी चुकते, याचें हें उदाहरण होय. इतकें करून पश्चिम दिशा गुंडाळून ठेवून घाईघाईनें थेट उत्तरेकडे आपलें घोडें दापटून मिराशींचा मेघ जबलपुराजवळ नर्मदेच्या तीरावर येऊन थडकला तरी त्याचा उपयोग काय ? तेथें नर्मदेचें जें हत्तीच्या पाठीवर काढलेल्या वेलबुट्टी-सारखें दृश्य ( श्लोक १९ ) त्याला दिसावयाला पाहिजे, तें तेथें त्याला दिसणारच नाहीं ! कारण जबलपूर-नरसिंगपुराजवळ नर्मदा नदीचा प्रवाह एकवेणीप्रमाणें एकेरीच आहे. त्याच्या आधीं म्हणजे उगमाच्या आसपास मात्र नर्मदा स्फुटित-प्रवाहा आहे. तेथें आसपासच्या डोंगरातून तिला शेंकडो ओहोळ, प्रवाह-उपप्रवाह येऊन मिळतात. नकाशात सुद्धां या प्रवाहांचें जाळें किती मजेदार व स्पष्ट दिसतें तें पहावें. म्हणजे वाचकाना कालिदासाच्या उपमेंतील सौंदर्य व समर्पकता यांची प्रचीति येईल. हें विशिष्ट, मनोवेधक व सुंदर उपमेनें स्पष्ट केलेलें दृश्य फक्त रामगड-हून निघून अमरकंटकावरून भिलशाकडे जाणाऱ्या मेघालाच दिसूं शकेल.

असो. मिराशींना माल पठार हें रामटेक आणि अमरवाडा गांव यांच्या दरम्यान कोठें तरी ठेवणें भाग आहे. म्हणून ते म्हणतात :

> " रामटेकच्या जवळच सातपुड्याचें पठार सुरु होतें. या पठाराला पूर्वी मालदेश म्हणत असावे. "

या विधानाला बळकटी येण्याकरितां त्यांनीं आधार शोधून काढला आहे तो असा–

> " किंबहुना या बाबतींत अनुमान करण्याचीहि जरुरी नाहीं, कारण उत्तर चालुक्यांच्या द्वितीय आचुगि नामक मांडलिकानें मालदेश जिंकून डाहलाधिपतीचा म्हणजे जबलपूरजवळच्या त्रिपुरीच्या हैहयांचा पराभव केला, असा एका कोरींव लेखांत उल्लेख आहे. तेव्हां या पठाराला माल हें नांव होतें हें उघड आहे. "
>
> [ प्रो. मिराशीकृत सं. मु. ' मेघदूतांतील रामगिरि ' हा लेख, पृष्ठ ५९ ]

पहिली गोष्ट अशी कीं, सदर कोरींव लेखांत ( एपिग्राफिका इंडिका, पु. १९ पृ. २२७ पहा. ) माल किंवा मालदेश असे शब्द नसून मालेयम् असा मोघम शब्द आलेला आहे. मालक्षेत्र व हें मालेय भिन्न असण्याचा संभव दिसतो. शिवाय हें ' मालेय ' नक्की कोठें होतें, याचाहि निर्देश नाहीं. मालेय हें जबलपुराजवळच होतें असें समजण्याला त्या कोरींव लेखांत आधार नाहीं. द्वितीय आचुगि नामक मांडलिकानें डाहलाधिपतीचा पराभव केला असेल. पण जबलपुराजवळचा कोण– डाहलाधिपति कीं मालेय ? तें संदिग्धच आहे. शिवाय जबलपूर कुठें आणि रामटेक कुठें ! मालक्षेत्र रामटेकला चिकटून तरी दूर्वे निदानपक्षीं तें आम्रकूटाच्या आधीं तरी पाहिजे. त्यामुळें मिराशींचा अमरवाडा ( = आम्रकूट ) अलीकडे अन् माल पठार पलीकडे ( जबलपुराजवळ ) असा विपरीत प्रकार होत आहे ! आपलींच नखें आपल्याला लागावीं, त्याप्रमाणें त्यांनींच प्रथम ठरविलेला आम्रकूट ( अमर-वाड्याजवळचा ) आतां त्यांना बाधक ठरतो. तेव्हां असा ओढून ताणून आणलेला ' माल ' वाचकांच्या पदरांत बांधून कोणाचेंच समाधान होणार नाहीं ! माल चोख हवा !

१४ मालक्षेत्रावर आरोहण व सिंचन केल्यानंतर मेघानें कोणीकडे म्हणजे कोणत्या दिशेनें वळावयाचें, हा महत्त्वाचा व मूलगामी प्रश्न आहे. कारण मालानंतर १ आम्रकूट २ रेवा म्हणजे नर्मदा नदीचें एक विशिष्ट दृश्य आणि ३ दशार्ण देश व ४ विदिशा राजधानी हीं स्थळें लागतात. यांपैकीं शेवटचें विदिशा म्हणजे भिलसा हें ठिकाण सर्वसंमत व सुनिश्चित आहे. म्हणजे विदिशेपासून पुढें अलके-पर्यन्तच्या रस्त्याबाबत दुमत नाहीं. वाद आहे तो रामगिरीपासून विदिशेपर्यंतच्या

मार्गाचा आहे. तेव्हां प्रथम हा मेघाचा मार्ग निश्चित केला पाहिजे. त्याकरितां खालील गोष्टी आवश्यक आहेत :

१ मेघदूतांतील दिशांचे म्हणजे मार्ग-निर्देशांचे उल्लेख घेऊन त्यांचा अर्थ व संगति लावणें,

२ रामगिरि व विदिशा यांच्या दरम्यान (मालक्षेत्राशेरीज) आम्रकूट पर्वत, नर्मदेचें स्फुटितप्रवाहाचें दृश्य, आणि दशार्ण देश हीं जीं तीन स्थळें लागतात, तीं कोणतीं हें ठरविणें.

या दोन गोष्टी पृथक् दिसल्या तरी त्या परस्परांशीं संलग्न व अवलंबून आहेत, हें वाचकांच्या ध्यानांत येईल. अर्थात् या दोन्ही गोष्टींचा एकमेकांशीं मेळ बसला पाहिजे. म्हणजेच मेघाची दिशा किंवा मार्ग असा हवा कीं, ज्याच्यावर तीं स्थळें बरोबर बसतील आणि स्थळें अशा रीतीनें निश्चित केलीं पाहिजेत कीं तीं दिशांच्या उल्लेखाशीं जमतील. दोन्हींशीं जुळेल असा उभयान्वयी अर्थच बरोबर ठरेल.

आधीं एकेकाचा स्वतंत्रपणें विचार करूं आणि मागाहून एकमेकांशीं ताडून पाहूं.

## मेघाचा मार्ग कोणता ?

रामगिरि तो कीं, जेथून (जवळचें मालक्षेत्र आक्रमिल्यानंतर) पश्चिमेला गेलें व नंतर उत्तरेला गेलें कीं कैलासावरची अलका लागली पाहिजे.

> सद्यः सीरोत्कषणसुरभि क्षेत्रमारुह्य मालम्
> किंचित्[१] पश्चात् व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण ॥

एवढा एकच दिशेसंबंधींचा पहिला व प्रमुख आदेश मेघदूतात आहे. याखेरीज दुसरा एक उल्लेख आहे (वक्रः पंथा यदपि भवतः प्रस्थितस्योत्तराशाम् । पण तो विदिशेपासून पुढच्या म्हणजे उज्जयिनीपर्यंतच्या रस्त्यासंबंधीं असल्यामुळें रामगिरि ठरविण्याला त्याचा प्रत्यक्ष उपयोग नाहीं. आतां मेघाला उज्जयिनीनंतर उत्तरेकडे वळूनच सरळ कैलासाकडे जावें लागतें म्हणजे उज्जयिनीपर्यंतचा मार्ग (रामगिरीपासून) पश्चिमेकडचा असला पाहिजे, हें ओघानेंच येतें. आधीं पश्चिम आणि मग उत्तर हा कालिदासाचा आदेश म्हणजे रामगिरीहून विदिशा व उज्जयिनीपर्यंत पश्चिम आणि उज्जयिनीहून अलकेपर्यंत उत्तर असा

---

१ येथें किंचित् पश्चात् म्हणजे काहींसे पश्चिमेकडे (somewhat towards the West) असा अर्थ आहे शिवाय पश्चात् हें पद जरा पश्चिमेला आणि मागें अशा द्वयर्थी अभिप्रायानें मोठ्या खुबीनें वापरलें आहे. पुढें दिलेल्या नकाशावरून व चर्चेवरून हा अर्थ स्पष्ट होईल.

सरळ स्पष्ट व संगतवार अर्थ होतो. आतां मिराशींनी मांडलेला मार्ग याच्याशीं जुळतो कीं नाहीं तें पाहूं. पृष्ठ ५६ व ५७ वरील दोन नकाशे पहावे.

## आकृति नं. १ : मिराशींचा मार्ग

पहिल्या आकृतींत पाहिलें म्हणजे दिसेल कीं, मेघाचा प्रवास उत्तर मग पश्चिम व पुन्हां उत्तर असा आहे. कालिदासानें सांगितलें कीं, प्रथम पश्चिमेकडे जा तर मिराशींचा मेघ प्रथम उत्तरेला जातो. पश्चिमेनंतर कालिदास सांगतो, उत्तरेकडे जा, तर मिराशींचा मेघ उत्तर संपवून पश्चिमेकडे वळतो आहे. अशी नेमकी उलटापालट मिराशींच्या मार्गांत होते. अशी दिशा चुकविणारा मेघ रामगिरीवरचा नव्हे! रामटेकवरचा मेघ कालिदासाला अभिप्रेत असलेला मेघ नाहीं आणि तो यक्षानें रामगिरीवर पाहिलेला नाहीं!

## आकृति नं. २ : यक्षाचा मार्ग

रामगड ते विदिशा ( भिलसा ) हा मार्ग मेघदूतांतील वर्णनाशीं सहजतेनेंच नव्हे तर समर्पकतेनें कसा जुळतो तें पहा. यक्षाचा मेघाला स्पष्ट आदेश असा कीं प्रारंभीं पश्चिमेला जा. किंचित् पश्चात् व्रज. येथें किंचित् याचा अर्थ थोडेसें पश्चिमेला असा नसून कांहींसें पश्चिमेला असा आहे. याचें कारण स्पष्ट आहे. तें हें कीं पुढें मार्गावर लागणारा अमरकंटक अगदीं सरळ पश्चिमेला नसून किंचित् खालीं आहे. म्हणजे अखेर उत्तर दिशेला जाण्याच्या दृष्टीनें पहातां किंचित् मागें यावें लागतें. म्हणून किंचित् म्हणजे कांहींसें व थोडेसें आणि पश्चात् म्हणजे पश्चिमेला व मागें अशा दुहेरी अर्थानें हे दोन शब्द कवीनें मोठ्या चातुर्यानें योजले आहेत. त्यांचा अर्थ यथासंभव घ्यावयाचा आहे. या ओळीचें इंग्रजी भाषांतर Travel somewhat towards the west, i. e. to say, a little backwards and then again to the North. असें करावें लागेल.

आतां याचा पडताळा पहा. रामगडहून 'कांहींसे पश्चिमेला' जाऊं लागलें म्हणजे त्याच वाटेवर अमरकंटक, नर्मदेचें नदीदार दृश्य व विदिशा हीं यशोक स्थळें लागतात. विदिशेनंतर उज्जयिनीपर्यंतचा छोटासा वांकडा वळसा घेऊन मेघाचा सरळ उत्तरेकडचा मार्ग सुरू होतो ( नूप प्रवोत्तरेण. ) उल्लेखलेलीं हीं स्थळें भेटण्याकरितां रामगडपासून निघून याच दिशेनें हाच मार्ग आक्रमावा लागतो!

हें चित्र पहा—




आकृति १ : चुंकीचा मेघमार्ग : रामटेक ते भिलसा

आणि हें चित्र पहा—




आकृति २ : खरा मेघमार्ग : रामगड ते भिलसा

रामगडहून भिलसा म्हणजे विदिशेला जातांनाच फक्त नर्मदाप्रवाहांचें नक्षीदार दृश्य (मे० १९) दिसूं शकतें हें वरील आकृतीवरून कळून येईल. शिवाय कवीनें आधीं पश्चिम मग उत्तर अशी वाट सांगितली आहे. (मे. १६)

रामगड हा अमरकंटक व नर्मदा यांच्या पूर्वेला-पण जरा वर १८ अंशांवर आहे. तेव्हां रामगडहून निघणाऱ्या मेघाला अमरकंटकवरून नर्मदेच्या स्फुटितप्रवाहांवरून जावयाचें म्हणजे **पश्चिमेलाच पण किंचित् मागें** यावें लागतें. येथें किंचित् पश्चात् व्रज हा शब्दप्रयोग वापरून कांहींसें पश्चिमेला व थोडेंसें मागें असे दोनहि अर्थ दाखविणारा खुबीदार व बहारीचा श्लेष कालिदासानें बुद्धिपुरःसर योजला आहे, तो लक्षात आणला पाहिजे. हा अर्थ प्रतीत झाल्यावरच मार्ग उलून आनंद होतो कवीच्या शब्दयोजनेंतली मार्मिकता ध्यानांत येते. किती थोड्या शब्दांत तो आपलें काम साधतो! हे अल्पाक्षररमणीयत्व (Economy of Words) तर त्याच्या महाकवित्वाच्या मुकुटांतील तुरा आहे. कालिदासाचा बारकाव । व सफाई त्याच्या काव्याच्या रोमारोमांत भरलेली पाहून आश्चर्य व कौतुकानें मन थक झाल्याशिवाय रहात नाहीं.

या बाबतींत एक गोष्ट विसरतां कामा नये. दिशांचे उल्लेख बिनचूक हवेत हें खरें; पण ते स्थूलमानानें घेतले पाहिजेत. मेघाच्या संकल्पित प्रवासाची लांबी सुमारें १२०० मैलाच्या वर भरेल! भारताच्या भव्य पटावरील मेघ-दूताचा भव्य प्रवास म्हणजे बारीकसारीक कंटाळवाणे तपशील देणारें भूगोलाचें पुस्तक नव्हे. तो काहीं लढाईचा आराखडा नाहीं. ही मेघ-राजाची स्वारी काव्यप्रांतांतली आहे. तथापि त्यांतहि कालिदासानें भूगोलाला धोका दिलेला नाहीं. तसेंच त्यानें भूगोलाचें स्तोमहि माजवलें नाहीं हें त्याचें वैशिष्ट्य. आपण भूगोल रचीत नसून काव्यगोल रचीत आहोत, याची त्याला जाणीव होती. कवीच्या दरबारांत भूगोलालाच काय इतिहासाला देखील मागच्या रांगेंत उभें रहावें लागतें. तिथें खाशांच्या पंगतीला बसणारे मानकरी वेगळे. सारांश, मेघदूत-काव्यांतील दिशेकडे स्थूल दृष्टीनें पहावयास हवें. एवढ्या प्रचंड लांबीरुंदीच्या प्रवासांत मैल, फूट, इंच आणण्याची आवश्यकता नाहीं. मिराशींप्रमाणें गाजरभर इकडे अथवा मुळाभर तिकडे होतांच त्यावरून प्रवासाची दिशा ठरविण्यांत हंशील नाहीं. कवीला, भूगोलाच्या जाळ्यात स्वतःला न अडकवून घेतां काव्य-भरारी मारण्याकरितां मोकळें रहावयाचें होतें. म्हणूनच कालिदासानें एकाच ओळींत 'दिग्दर्शन' केलें आहे. जिथें सामान्य कवि घोटाळला असता तिथें दोन शब्दांत दिशा दाखवून तो मोकळा झाला. तें दिग्दर्शन स्थूल असूनहि सूक्ष्म आहे। किती बिनचूक, स्पष्ट व समर्पक! तें वाचून जणुं मेघाची सबंध वाट डोळ्यांपुढें उभी रहाते. म्हणूनच रस्ता कळण्याकरितां मार्गदर्शक बाण काढलेली पाटी असावी तशी ती कालिदासाची ओळ काव्यदृष्ट्या साधी असूनहि पक्की लक्षांत रहाते—

किंचित् पश्चात् व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण

१५. येथें १५, १६ व १७ हीं लक्षणें आम्रकूट पर्वताशीं संलग्न आहेत परंतु त्यांचा फारसा विचार करण्याचें कारण नाहीं. कारण त्यात आपला आम्रकूट

नक्की कोणता, हें मिराशींना निश्चितपणें सांगतां येत नाहीं याचा निर्देश पूर्वी केलाच आहे. त्यामुळें या तीन कसोट्या लावून पडताळ्याचा प्रश्नच उरत नाहीं ! अर्थात् हा न्यूनाचा दोष त्यांच्या माथीं जातो.

तथापि या बाबतींत आपल्याला कांहीं अधिक प्रकाश पाडतां येतो कीं काय तें पाहूं. आम्रकूट पर्वत हा उंच व सानुमान् (शिखर असलेला) आहे. (श्लोक १७) बहुधा उत्पत या शब्दावरून हा रामगिरीपेक्षांहि उंच असावा असें दिसतें. आम्ही ज्याला आम्रकूट म्हणतों तो अमरकंटक ३४६८ फूट उंचीचा आणि विस्तीर्ण व भव्य आहे. इतका उंच पर्वत मिराशी म्हणतात त्या रामटेक–जबलपूर वाटेवर जे सातपुड्यापैकीं डोंगर आहेत त्यांत नाहीं. म्हणजे उंचीला अमरकंटक जमतो. शिवाय १६ व्या लक्षणांत आम्रकूटावर रान-वणवे लागतात असें वर्णन आहे. अमरकंटकाच्या दाट जंगलांत नेहमीं मोठमोठे वणवे लागतात हें प्रसिद्ध आहे. पण त्याहीपेक्षां हे रान-वणवे किंवा दावाग्नि विझविणारी जलवृष्टि येथें हमखास होते, असें कालिदासानें याच १७ व्या श्लोकांत वर्णिलें आहे. त्याबाबत एक फार मनोरंजक व सूक्ष्म प्रमाण आम्हांस सांपडलें आहे. हुबेहूब याच सृष्टिचमत्काराचें वर्णन कालिदासानें आपल्या प्रथमरचित ऋतुसंहारनामक काव्यांत (सर्ग २.२७) केलें आहे. या दोन काव्यांच्या एककर्तृत्वाचा हा आणखी एक पुरावा होय. पर्वतानें श्रान्त मेघाला टेकण्याकरितां जागा देणें किंवा आश्रय देणें आणि उलट मेघानें त्या तापून निघणाऱ्या सन्तप्त पर्वताला आपल्या जलवृष्टीनें शांत करणें ही परस्परोपकारित्वाची अथवा पूर्वोपकारस्मरणाची ऋतुसंहारांतील कल्पना[1] कवीनें मेघदूतांत आम्रकूटाला उद्देशून किंचित् अधिक खुलवून मांडली आहे. स्थलप्रमाणें कवीच्याहि कांहीं न बुजणाऱ्या खुणा असतात त्या अशा. शिवाय मौज ही कीं, ऋतुसंहारांतील तें वर्णन पावसाळ्यांतलें व विंध्याचेंच आहे !

जलधरविनतानामाश्रयोऽस्माकमुच्चैः
अयमिति जलसेकैस्तोयदास्तोयनम्राः
अतिशयपरुषाभिर्ग्रीष्मवन्हेः शिखाभिः
समुपजनिततापं ह्लादयन्तीव विन्ध्यम्

(ऋतु. २:२७)

या ऋतुसंहारांतील २७ व्या श्लोकांतूनच मेघदूताचा १७ वा श्लोक बाहेर आला आहे, हें सहज समजण्यासारखें आहे. कवि तोच, वर्णन तसेंच, कल्पना तीच, मग त्यांतील वर्ण्य-विषय पर्वतहि तोच नसेल काय ! होय, आम्रकूट सातपुड्यांतला

१. कालिदासानें दोन स्थळीं दाखविलेल्या या कल्पनेचें मूळ रामायणांतील सांपडतें श्लोक असा : कृते च प्रतिकर्तव्यं एष धर्मः सनातनः (सुं. १.१०६)

नसून कालिदासाच्या आवडत्या विंध्याचलांतलाच असला पाहिजे. आम्रकूट म्हणजे अमरकंटकच होय.

आतां १७ वें लक्षण म्हणजे असें. रान-आंब्यांनीं व त्यांच्या पिकलेल्या फळांनीं हा आम्रकूट पिवळा रसरशीत व फुगीर दिसतो. त्यांत त्याच्या शिखराग्रावर कृष्णमेघ आरूढ झाला म्हणजे तो पर्वत वरून भूदेवीच्या स्तनासारखा शोभतो. या बहारीच्या कविकल्पनेला सुळेल असा भव्य, उंच व घाटदार पर्वत रामटेक-जबलपूर या रस्त्यावर आहे कीं नाहीं कोणास ठाऊक. अमरकंटक मात्र तसा आहे.

१८ याचा विचार पूर्वी केला आहे.

१९ यांतील नर्मदा-दृश्याचें वर्णन व वैशिष्ट्य मागें सांगितलें आहे. हें दृश्य-स्फुटितप्रवाहांचें दृश्य केवळ अमरकंटकावरून पश्चिमेकडे जातांनाच दिसूं शकेल. (पुस्तकातील नकाशा पहावा.) हत्तीच्या अंगावर काढलेल्या चित्रविचित्र पट्ट्यां-प्रमाणें दिसणारें नर्मदा-प्रवाहांचें जाळें मिराशींच्या नरसिंगपूर-जबलपूर या दरम्यानच्या मार्गांत खासच दिसणार नाहीं. कारण तिथला नर्मदेचा प्रवाह अगदीं एकेरी आहे. कालिदासाच्या या सुंदर उपमेमुळें नर्मदेचें एक विशिष्ट ठिकाण निश्चित करण्याची सोय झालेली आहे. त्यामुळें दक्षिणेकडून जबलपुराजवळ नर्मदेशीं भिडणारा मेघ या मोहक दृश्याला व त्याबरोबरच रामगिरित्वालाहि मुकतो! हें नर्मदेचें दृश्य वैशिष्ट्यपूर्ण व अद्वितीय असल्यामुळें मिराशींची वाट-म्हणजेच रामटेक ठिकाण चुकलें आहे, याबद्दल शंका रहात नाहीं.

२० हें विसावें लक्षण २० व्या श्लोकांतलेंच आहे. त्यात नर्मदेचें पाणी शोषून किंवा पिऊन पुढें जा (*तोयमादाय गच्छेः*) असें कवि मेघाला सांगत आहे. यांतला गच्छेः शब्द महत्त्वाचा आहे. कारण कवि या ठिकाणीं नर्मदा ओलांड किंवा उल्लंघून जा अशा अर्थाचा शब्दप्रयोग करीत नाहीं. चर्मण्वती किंवा चंबळा नदी वाटेंत लागली असतांना ज्याप्रमाणें ती ओलांडून जा (ताम् उत्तीर्य १-४७) असे शब्द कवीनें वापरले आहेत तसे या ठिकाणीं नाहींत. म्हणूनच नर्मदेच्या प्रवाहा-प्रमाणें पूर्वेकडून पश्चिमेला मेघाचा प्रवास आहे, असा तर्क करण्यास जागा आहे. (The journey of the Cloud-Messenger is meant to be along the course of Narmada and along the Vindhya range and not across them.) नर्मदा किंवा विंध्यपर्वतराजी ही भारताचे दक्षिण व उत्तर हिंदुस्थान असे मोठाले तुकडे करणारी महत्त्वाची मध्यरेषा होय. भास-काळांत तर विंध्य हीच भारताची दक्षिणसीमा सामान्यतः समजली जात असावी. (हिमवद्-विंध्यकुंडलां महीं) असा हा विंध्य (त्यांतून कालिदासाचा प्रिय व परिचित) अथवा नर्मदा ओलांडायची झाली असती तर कालिदास त्याचा उल्लेख केल्या

शिवाय राहिला नसता असें वाटतें, नर्मदा ओलांडावयाची आवश्यकता नसलेला प्रस्तुत पुस्तकांतील मार्गच या लक्षणाशीं जुळणारा आहे.

शिवाय या श्लोकांत 'जांभळीच्या वृक्षांच्या राईनें ज्याचा वेग अडविला आहे' असा नर्मदेचा प्रवाह कवीला अभिप्रेत आहे. जबलपुरापाशीं नर्मदेचें पात्र विस्तृत झालें असून प्रवाह रुंद व मोठा झाला आहे. यावरून वरील वर्णन नर्मदेच्या पुढील मोठा होत गेलेल्या प्रवाहाचें नसून उगमाजवळच्या लहान अरुंद प्रवाहालाच अधिक लागू पडणारें आहे. यावरूनहि अमरकंटकाच्या जरा पुढें–म्हणजे उगमापासून फारसें दूर नाहीं असें ठिकाण व तियला नर्मदेचा प्रवाहच कवीला अभिप्रेत आहे, हें उघड आहे. म्हणजेच हें वर्णनही रामगड–विदिशा मार्गाला उपोद्बलक असें आहे.

२१ नर्मदेचें पाणी शोषून पुढें गेल्यानंतर मेघाला वरेचसे पर्वत (पर्वते पर्वते) मग दशार्णदेश, त्याची राजधानी विदिशा व वेत्रवती नदी (हल्लींची बेटवा) हीं स्थळें लागतील, असें वर्णन २१ ते २४ या चार श्लोकांत आहे. आतां नर्मदेकडे पूर्वेकडून आलें किंवा खालून दक्षिणेकडून आलें तरी वरील स्थळें लागणारच. तथापि मेघ पूर्वेकडून रामगड–अमरकंटकाकडून नर्मदेकडे येत आहे, हें पूर्वीं दाखविलेंच आहे. त्याला वास्तविक अधिक पुराव्याची गरज नाहीं. तरीदेखील त्याच्या दृढीकरणार्थ अधिक आधार मिळतो कीं काय पाहूं प्रत्यक्ष नसली तरी अप्रत्यक्ष व सूक्ष्म एकदोन प्रमाणें मिळतात श्लोक २१ मध्यें अनुकच्छम् असा शब्द आहे. कच्छ म्हणजे नदीकांठची पाणथळ जमीन असा अर्थ देतात. श्री. रा. ग. बोरवणकर आपल्या मेघदूताच्या आवृत्तींत (पृष्ठ ३६) या श्लोकावरील टीपेंत लिहितात–

> "अनुकच्छम् या शब्दाचा मार्गम् शब्दाशीं संबंध जोडून त्याचा अर्थ 'तूं नर्मदेच्या कांठाकांठानें या मार्गानें गेलास' असा केलेला एके ठिकाणीं पहाण्यांत आला. अनुकच्छम् मार्गम् म्हणजे 'कांठाकांठानें गेलेला मार्ग' हा अर्थ चांगलाच दिसेल ह्यांत संशय नाहीं."

हा अर्थ नुसताच चांगला नव्हे तर दिशेच्या दृष्टीनेंहि योग्य ठरतो. कुणाच्या कांठाकांठानें जावयाचें? अर्थात् नर्मदेच्या. कोणत्या कांठानें? अर्थात् पलीकडच्या म्हणजे उत्तरेच्या. पण पलीकडचा कांठ गांठायचा तर दक्षिणेकडून (=रामटेककडून) येणाऱ्या मेघाला नर्मदा ओलांडावी लागते, त्याचा तर उल्लेख नाहीं. बरें तें एक सोडलें तरी आतांपर्यंतची दक्षिणोत्तर दिशा संपून मेघाला पश्चिमेकडे वळावयास हवें. तशा दिशा बदलण्याचाहि मेघाला आदेश नाहीं! म्हणजे मेघाला अगदींच वाऱ्यावर सोडल्यासारखें झालें! उत्सुक यक्ष आणि त्याच्या मार्गें असलेला सूक्ष्मबुद्धीचा कालिदास तसें करणार नाहींं. शिवाय 'पश्चिम' गुंडाळून ठेवून उत्तरदिशा पकडलेल्या मिराशींच्या मेघाला आतां मधेंच नर्मदेच्या कांठाकांठानें

पश्चिमेकडे वळण्याचा काय अधिकार ? पण विदिशेकडे म्हणजे मिलशाला यों वायचें तर पश्चिमेला गेलेंच पाहिजे. अशी मिराशींच्या मेघाची धरसोड होऊं लागते !

रामगडहून म्हणजे पूर्वेकडून येणारा मेघ मात्र कालिदासाच्या शब्दाबाहेर जात नाहीं. तो रामगड–अमरकंटक–नर्मदाप्रवाहांचें नक्षीवजा दृश्य इत्यादि कालिदासाच्या टाईम-टेबलांतील सर्व स्टेशनें यथास्थित घेऊन नर्मदेवरून (along the river) तिच्या पलीकडच्या कांठाकांठानें (कारण त्याला नर्मदा ओलांडण्याची जरूरच नाहीं) दशार्ण देशाला प्रफुल्लित व हंसांकित करीत आणि वेत्रवतीचें मधुर जल भ्रुकुटिवक्र मुखाप्रमाणें चुंबीत विदिशेला मजेंत पोंचणार, यांत शंकाच नाहीं. कवीचें ऐकणारा मर्यादाशील मेघच आपल्याला हवा आहे !

याखेरीज २२ व्या श्लोकांतल्या 'पर्वते पर्वते' या प्रयोगावरून मेघाला पुष्कळ पर्वत वाटेंत लागणार असें दिसतें, परंतु मिराशींच्या अर्थानुसार म्हटलें म्हणजे विंध्य पर्वताची आडवी रांग भेदून अथवा ओलांडून पुढें जावयाचें. तसें केलें असतां पुष्कळ पर्वत लागण्याचा संभव नाहीं. उलट नर्मदेच्या कांठाकांठानें गेलें म्हणजे विंध्याचलाची पर्वतरांग भेदून असें न होतां रांगेवरून अर्थात् पूर्वेकडून पश्चिमेकडे–नर्मदेशीं समांतर दिशेनें असा अर्थ बसतो. तोच समर्पक.

एकंदरींत या दोन-तीन श्लोकांतील सूर 'पूर्व-पश्चिम' वहातो आहे, हें मार्मिकांना प्रतीत होईल.

**२२** हरिणी व मोर (उत्तर मेघ ४१) असावयाला गर्द रान किंवा जंगल लागतें. रामटेकवर तसें अरण्य नाहीं किंवा पूर्वीहि असण्याची शक्यता नाहीं. त्याप्रमाणें नदी किंवा जलप्रवाह (नदीवीचिषु) हेहि रामटेकावर नाहींत. शिवाय जलसान्निध्याशिवाय हरिणी कुठल्या ?

हें सर्व वर्णन रामगडला मात्र पूर्णतया लागू पडतें. आजहि तेथें हरिण-हरिणींचे विविध जातींचे मोठाले कळप व मोर एवढेच नव्हे तर रानहत्तींचे कळप, रान-बैल इत्यादि अनेक जातींचे पशु व पक्षीहि आहेत, जलप्रवाह तर भरपूर आहेत.

२३ येथें हिमालयावरून म्हणजे उत्तरेकडून दक्षिणेकडे वारे (उ. मे ४४) वाहत असतात. (अर्थात् पावसाळी म्हणजे मॉन्सून वारे सोडून. कारण वर्षाऋतूच्या चार महिन्यांत ही वाऱ्याची गति नेमकी उलट असते.) वर्षांतून आठ महिने सामान्यतः वाऱ्यांची दिशा उत्तरेकडून दक्षिणेकडे किंवा कांटेकोरपणानें बोलावयाचें झाल्यास वायव्येकडून नैर्ऋत्येकडे असते म्हणून हें लक्षण उभय ठिकाणांना लागू पडण्यासारखें आहे. तथापि हिमालयावरून खालीं तिरकस रामगडच्या दिशेनें वहात येणाऱ्या वाऱ्यांना मधें आडकाठी नाहीं. उलट हिमालय आणि रामटेक यांच्या दरम्यान विंध्य आणि सातपुडा याची दुहेरी उंच तटबंदी आहे. रामटेकची टेकडी ठेंगणी

असल्यामुळें हिमालयावरच्या देवदारुद्रुमांच्या संयोगामुळें सुगंधित झालेले वारे तिथें कितपत पोचूं शकतील याची शंकाच आहे.

## धातुराग म्हणजे रंगीत दगड नव्हे !

२४ हें शेवटलें लक्षण मौजेचें व स्थलनिश्चयाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे. उत्तर मेघ ४४ व्या श्लोकांत यक्ष शिलाखंडावर धातुरागांनीं आपल्या प्रियेचें चित्र काढतो, असें शब्दचित्र कालिदासानें रंगविलें आहे. हें लक्षण आपल्या रामटेकला लागू करून दाखववें या हेतूनें मिराशी लिहितात—

> "या पर्वतावर (रामटेकवर) सर्वत्र तांबूस रंगाचे दगड दिसत असल्यानें यक्षाला आपल्या प्रियेचें चित्र शिळेवर काढण्याकरितां धातुराग मिळविण्यास मुळींच प्रयास पडले नसतील."–सं. मु. ६२

कधीतरी ओढाताण करून येन केन प्रकारेण आभास उत्पन्न करण्यानें चुकीचा सिद्धान्त फार काळ टिकणार नाहीं. धातुराग म्हणजे दगड नव्हे. धातु[1] म्हणजे खनिज पदार्थ, गैरिक किंवा डोंगराच्या पोटांत सांपडणाऱ्या खनिज वस्तु ( *minerals* ) आणि राग म्हणजे रंजकद्रव्यें अर्थात् ज्यानें रंगवितां येईल असे पदार्थ. दगड कितीही तांबडे–अगदीं लालभडक असले तरी त्यांनीं काढलेल्या रेघा तांबड्या उठायच्या नाहींत ! मग तें चित्र वठायचें कसें आणि दिसायचें कसें ?

सारांश, या ठिकाणीं खनिज नैसर्गिक द्रवीभूत किंवा पातळ करतां येण्यासारखे नैसर्गिक रंग कालिदासाला हवे आहेत. चित्रें काढण्याला रंग हवा, तिथें दगडाचें काम नाहीं. म्हणून मिराशींचें विधान भ्रमोत्पादक आहे. अशा उटपटांग्या

---

१. धातुराग :—धातवः गैरिकादयः । त एव रागाः रंजकद्रव्याणि । –मल्लिनाथ. कालिदासानें असाच धातुरागांचा निर्देश कुमारसंभवांत ( सर्ग १-४ ) केला आहे. हिमालयावर अप्सरा या धातुरागांचा उपयोग आपल्या सौन्दर्य-प्रसाधनाकरितां-हस्तपादादि अवयव रंगविण्याकरितां करतात. या ठिकाणीं विशेषतः तांबडा रंग अभिप्रेत आहे.

धातुमत्ता–धातुमत्त्व् i. e. plenty of minerals used for decoration purposes. The celestial nymphs used the minerals for decorating their hands, feet etc. The Himalayas thus provided materials for the toilet of the Apsarases. (Notes by Prof. R. D. Karmarkar p.6) यावरून अंग रंगवितां येईल किंवा चित्र वठवितां येईल असे खनिज पदार्थ अथवा नैसर्गिक द्रवीभूत रंग कालिदासाला येथें अभिप्रेत आहेत, हें उघड आहे.

धातुराग म्हणजे तांबडा मोलसर रंग याचें आणखी एक मधुर प्रमाण कुमारसंभवात सांपडतें. कालिदासानें तेथें घन धातुरस असा शब्द वापरला आहे. ( सर्ग १–७ ) विद्याधरसुंदरी भूर्जपत्रांवर लाल रंगाच्या धातुरसानें आपली प्रेमपत्रें लिहित असें तेथें वर्णन आहे.

संशोधनी प्रवृत्तीनें इतरांचा कसा गैरसमज निर्माण होतो तें पहा. बहुधा मिराशींच्या या 'शोधा'वर विसंबून बनारसचे प्रो. भगवत्शरण उपाध्याय यांना रामटेकची खात्री पटली! India in Kalidasa या ग्रंथांत (पृष्ठ ७२) ते विश्वासानें लिहितात—

> There is another name Sinduragiri i e. the 'Vermilion Point' given to Ramtek ... because of the red stone, which *when newly broken, looks blood-red, especially when the* Sun shines on it. It is significant that while staying here the Yaksha portrays the figure of his wife on the stone with red-stone, which is geru.)

असो. रामकेटवर आढळणारा तांबडा दगड गेरु किंवा 'रंजकद्रव्य' नव्हे. या दगडाचा लाल रंग शोभेचा असून उपयोगाचा नाहीं. त्यानें यक्षाला किंवा कोणालाहि शिलेवर चित्र काढतां किंवा रंगवितां येणें शक्य नाहीं. या रुक्ष तांबड्या दगडाखेरीज दुसरें कोणतेंहि नैसर्गिक खनिज रंजकद्रव्य रामकेटवर सांपडत नसल्यामुळें मिराशींचें लक्षण लटकें पडतें.

याच्या उलट रामगड पर्वत पहा. तेथें पांढरा व तांबडा नैसर्गिक **ओला** रंग (मलमासारखा) सांपडतो. आजहि आसपास राहणारे लोक या रंगांनीं आपल्या झोपड्या व अंगणें रंगवितात. एवढेंच नव्हे तर तेथील गुहेत जीं प्राचीन चित्रें दिसतात तीं याच रंगांनीं रंगविलेलीं आहेत. असें तज्ज्ञांचें मत आहे. यासंबंधींची अधिक माहिती पुढच्या प्रकरणांत.

## रामटेकमध्यें राम नाहीं

आतांपर्यंत केलेल्या चोवीस लक्षणांच्या विवेचनावरून नागपूरजवळचें रामटेक हें मेघदूतातील 'रामगिरि' होण्याला योग्य नाहीं, असें दिसून येईल. प्रस्तुत प्रकरणाचे शेवटीं परिशिष्टांत सदर वैशिष्ट्यें रामटेकला जुळत नाहींत त्याचें एक तौलनिक कोष्टक तयार करून दिलें आहे. त्यांत हीं वैशिष्ट्यें रामगड पर्वताला कशीं लागू पडतात हेंहि नमूद केलें आहे. म्हणून पहिलीं दोन प्रकरणें वाचल्यानंतर या कोष्टकावरून दोहोंचा तुलनात्मक बोध होईल. एकाच दृष्टिपातांत त्याचा एकुण निष्कर्ष असा : चोवीसापैकीं एक[1] लक्षण जुळणारें आहे. दोन कांहींशीं जुळणारीं आहेत. सात जुळतात कीं नाहींत हें नक्की सांगतां येत नाहीं कारण त्यांचा आम्रकूटच मुळीं पक्का नाहीं! अर्थात् हा दोष त्यांच्या माथीं. तीन लक्षणें

१ हें जुळणारें एकुलतें एक लक्षण (=कुड्याचीं फुलें) इतकें सामान्य आहे कीं, तें रामटेकलाच काय पण भारतांतील शेंकडों डोंगरांना लागू पडेल. त्यामुळें त्यांत वैशिष्ट्य किंवा निर्णायकत्व नाहीं.

न जुळणारीं, पांच मुळींच न जुळण्यासारखीं आणि उरलेलीं सहा जुळणें सर्वथैव अशक्य. त्यांतहि मौज अशी कीं, नेमकीं महत्त्वाचीं व अवश्य जुळावयाला पाहिजेत अशीं जी वैशिष्ट्यें तीं तर रामटेकचीं हमखास जमत नाहींत. संख्यावलानें हा प्रश्न सोडवावयाचा म्हटला तर रामटेकविरुद्ध सहजच निकाल लागेल. तथापि हा यक्ष-प्रश्न गणितशास्त्रांतील नसून काव्यशास्त्रांतील आहे. लक्षणांच्या संख्येला महत्त्व असलें तरी त्यांच्या स्वरूपालाहि किंमत आहे. पण त्याहि दृष्टीनें रामटेक लटका पडतो. चोविसांपैकीं एकहि विश्वास पटविणारें वैशिष्ट्य रामटेकजवळ नाहीं!

व्यक्तीच्या, वस्तूच्या अगर स्थळाच्या तत्पणाचा वाद (Question of Identity) उपस्थित झाला म्हणजे शाबितीकरितां सर्वच्या सर्व लक्षणें जमावीं लागतात असें शास्त्र आहे. न्यायालयीन कामकाजांत हीच कसोटी[1] पाळली जाते. बहुतेक खुणा जमूनहि एक खूण विरुद्ध गेली तरी ती तत्पणाला बाधक ठरते. प्रस्तुत विषय काव्यांतील वर्णनाचा व प्राचीन इतिहासाशीं संबद्ध असल्यामुळें ही कडक कसोटी सौम्य करून रामटेकच्या सिद्धान्तकारांना थोडीशी सवलत देण्यास हरकत नाहीं. तथापि काव्यदृष्ट्या व ऐतिहासिक दृष्ट्या ज्या असामान्य, वैशिष्ट्यपूर्ण व व्यवच्छेदक खुणा (Distinguishing features) आहेत, त्या न जमून धकावयाचें नाहीं. रामगिरीच्या म्हणून वर्णिलेल्या अशा मोठाल्या खुणांपैकीं एकहि रामटेकशीं जुळत नाहीं! एवढेंच नव्हे तर त्या खुणांचा अभाव प्रत्ययाला येतो. कुंडलींतील एकहि गुण न जमतां दोषांचें लग्न लागायचें कसें? शब्दार्थांची ओढाताण व बादरायण संबंध लावण्याला मुद्दां सीमा आहे. उदाहरणार्थ, उत्तुंग, भव्य, उंच शिखर असलेला, राम-संबंधित, धातुराग-समन्वित, सीतेनें स्नान केलेल्या, जलप्रवाहयुक्त, गर्द झाडींनें आच्छादित हीं महत्त्वाचीं लक्षणें मनपसंत व विश्वासोत्पादक रीतीनें जुळल्याशिवाय रसिकांचें समाधान होणार नाहीं. अगदींच मारून मुटकून शेंदुबुवा किंवा कुंकूं लावा आणि पाटलीण म्हणा असा प्रकार कसा चालेल! कांहीं काळ संभ्रम झाला तरी परीक्षेच्या वेळीं काच ती काच आणि मणि तो मणि!

यारेरीज आणखी एक भौगोलिक प्रमाण रामटेकच्या विरुद्ध आहे. मेघ आणि वारे कसे वहातात, त्यांची दिशा ठरलेली आहे. कवींप्रमाणेंच वारे देखील स्वैर व निरंकुश मासले तरी दोघांनाहि निसर्गाच्या दिशेच्या उलट जाण्याचें स्वातंत्र्य नाहीं. मेघदूतांत ही गोष्ट प्रत्ययाला येते. मिराशींचा मेघ विन्ध्यपर्वत भेदून अथवा उल्लंघून जाऊं पहातो. परंतु वाऱ्यांची ती दिशा नाहीं. त्यावरून मिराशींचा मार्ग निसर्गविरोधी अतएव असंभवनीय आणि म्हणून कालिदासाला अभिप्रेत असणें शक्य नाहीं, हें दिसून येईल.

---

1. Full text of the Judgment in Bhowal Sanyasi Case p. 112-3.

मेघदूताच्या श्लोक ८ मधील 'त्वामारूढं पवनपदवीम्' यांतील पवनपदवी या शब्दप्रयोगातील मर्म टीकाकारांच्या नजरेंतून सुटलें आहे असें दिसतें. पदवी याचा अर्थ अमरकोशांत

अयनं वर्त्म मार्गाध्वपंथानः पदवी सृतिः ।

असा दिला आहे. पावसाळी वाऱ्याची वहाण्याची एक ठराविक दिशा, चाकोरी अथवा 'मार्ग' असतो, हें कालिदासाला माहीत होतें, हे यावरून उघड दिसते. वारे विन्ध्यराजीची दुहेरी रांग भेदून जात नाहींत—जाऊं शकत नाहींत. अडतात. मग रामटेकचा मेघ नर्मदा ओलांडून सरळ उत्तरेकडे जाणार कसा? जड मेघांचा सूत्रधार जो वारा, त्याची वहाण्याची दिशा ती नव्हेच मुळीं. निसर्ग रामटेकच्या विरुद्ध आहे! अर्थातच ज्या दिशेनें वारे वहात नाहींत व मेघ जात नाहींत:तिकडून कालिदास आपला मेघ नेण्याचा अनावश्यक अट्टाहास करणार नाहीं, हें सांगणें नकोच.

मेघदूतांतील वर्णनाशीं रामटेक जुळत नाही. रामगिरि म्हणजे नागपूरजवळचें रामटेक नव्हे. आतां मध्यप्रदेशांतील रामगड पाहूं. तो पुढच्या प्रकरणांत दिसेल.

* * *

## परिशिष्ट : १

# रामगिरीच्या लक्षणांचें तौलनिक कोष्टक

हें तौलनिक कोष्टक मुद्दाम पहिल्या व दुसऱ्या प्रकरणांच्या दरम्यान दिलें आहे. रामगिरीचीं चोवीस लक्षणें रामटेकला कशीं लागू पडत नाहींत आणि रामगडशीं कशीं जुळतात, हें तुलनेनें एकाच दृष्टिपातांत समजून येईल. रामटेकच्या बाबतींत लक्षण जुळत नसेल तेथें नकारार्थी एक फुली दिली आहे. जें लक्षण मुळींच जुळत नाहीं, तेथें दोन फुल्या व जें लक्षण जमणें सर्वथैव अशक्य, तेथें तीन फुल्या मांडल्या आहेत. रामटेक पक्षाचा आम्रकूटच निश्चित नाहीं ! म्हणून त्या त्या जागीं प्रश्नचिन्हें घालावीं लागलीं !

| | रामगिरीचीं चोवीस लक्षणें | रामगड | रामटेक |
|---|---|---|---|
| १ | सीतास्नान | पूर्ण जुळतें | ××× |
| २ | ऋषींचे आश्रम | ,, | ×× |
| ३ | उंच, शिखर असलेला | ,, | ××× |
| ४ | येथें कुड्याचीं फुलें आहेत | जुळतें | जुळतें |
| ५ | उंच व भव्य | पूर्ण जुळतें | ××× |
| ६ | रामपदचिन्हांकित ; येथें राम सीतेसह वनवासांत राहिले | ,, | ××× |
| ७ | येथें प्रतिवर्षी नियमानें जलवृष्टि | ,, | ? |
| ८ | उंच शिखर व सोसाट्याचा वारा | ,, | ×× |
| ९ | पायथ्याशीं गांवढळ स्त्रिया ( मुग्धसिद्धांगना ) | ,, | ? |
| १० | निचुल नामक स्थळ किंवा सरस अशीं वेताचीं झाडें | ,, | ×× |
| ११ | आसपास खेडवळ असंस्कृत स्त्रिया | ,, | ? |
| १२ | घनदाट छायेच्या वृक्षांची गर्द झाडी | ,, | × |
| १३ | याच्यालगत नांगरण्यालायक ' माल ' क्षेत्र | ,, | × |
| १४ | येथून पश्चिमेला जाऊन पुढें उत्तरेला गेलें कीं अलका लागते. | ,, | ×× |
| १५ | याच्या कांहींसा पश्चिमेला आम्रकूट पर्वत | ,, | ? |
| १६ | आम्रकूट तो कीं ज्याच्यावरील रानवणवे प्रतिवार्षिक मेघवृष्टीनें विझतात. | ,, | ? |
| १७ | आम्रकूटाची स्तनसदृशता | ,, | ? |
| १८ | आम्रकूटाच्या आसपास जंगली लोकांची वस्ती | ,, | ? |
| १९ | पाटेंत नर्मदा हत्तीच्या अंगावरील वेलबुट्टी-सारखी दिसेल. | पूर्ण जुळतें | ××× |
| २० | नर्मदेचें पाणी शोषून पुढें जा-ओलांड असें नाहीं. | जुळतें | × |
| २१ | नंतर दशार्ण, विदिशा व वेत्रवती नदी | पूर्ण जुळतें | कांहींसें जु. |
| २२ | येथें हरिणी, मोर, नदी किंवा जलप्रवाह | ,, | ×× |
| २३ | येथें वारे उत्तरेकडून दक्षिणेकडे | जुळतें | कांहींसें जु. |
| २४ | धातुराग अथवा रंजक-द्रव्यें. | पूर्ण जुळतें | ××× |

## परिशिष्ट : २

# मेघदूतांतील क्रमवार स्थळें

येथें मेघदूतात प्रथमपासून अखेरपर्यंत लागणाऱ्या स्थळांची क्रमवार यादी दिली आहे. रामगिरि ते विदिशा या स्थळांबद्दल व मार्गाबद्दल अनिश्चितता असून पुढचीं स्थळें बहुतांशीं निश्चित आहेत.

| स्थळें | श्लोक | स्थळें | श्लोक |
|---|---|---|---|
| १ रामगिरि | १ | १७ गंभीरा | ४३ |
| २ माल | १६ | १८ देवगिरि | ४५ |
| ३ आम्रकूट | १७ | १९ चर्मण्वती | ४८ |
| ४ विंध्य | १९ | २० दशपूर | ५० |
| ५ रेवा | १९ | २१ ब्रह्मावर्त | ५१ |
| ६ दशार्ण | २४ | २२ कुरुक्षेत्र | ५१ |
| ७ विदिशा | २५ | २३ सरस्वती | ५२ |
| ८ वेत्रवती | २५ | २४ कनखल | ५३ |
| ९ नीचैर्गिरि | २६ | २५ गंगानदी | ५३ |
| १० वननदी | २७ | २६ हिमालय | ५५ |
| ११ उज्जयिनी | २८ | २७ श्रीचरणन्यास | ५८ |
| १२ निर्विन्ध्या | २९ | २८ क्रौंचरंध्र | ६० |
| १३ सिंधु | ३० | २९ कैलास | ६१ |
| १४ अवंती | ३१ | ३० मानससरोवर | ६५ |
| १५ सिप्रा | ३२ | ३१ अलका | ६६ |
| १६ गंधवती | ३६ | | |

## परिशिष्ट : ३

# मेघाच्या प्रवासाची दिशा

रामगड ते विदिशा : पश्चिम
विदिशा ते उजयिनी : आणखी पश्चिम ( वक्रः पंथाः )
उजयिनी ते अलका : उत्तर

## झोत २ रा

# रामगड हाच रामगिरि

आपृच्छस्व प्रियसखममुं तुंगमालिंग्य शैलम्।
वंद्यैः पुंसां रघुपतिपदैः अंकितं मेखलासु ॥

— मेघदूत, श्लोक १२ वा.

मध्यप्रदेशाच्या ईशान्य टोकाला उंच शिखरांनीं मंडित असा एक भव्य व उत्तुंग पर्वत आहे. तो घनदाट वृक्षांनीं आच्छादिलेला तसाच वन्य पशूंनीं गजबजलेला आहे. त्याच्या कडेपठारांवरून आणि गर्द रानांतून हत्तींचे व हरणांचे कळप हिंडत असतात. गवा, रानरेडे आणि वाघांच्या डरकाळ्यांनीं हा पर्वत निनादित होतो. नानाविध पक्षी आणि त्यांचे आवाज यांचा किलबिलाट येथें चाललेला असतो. हल्लीं येथील उदात्ततेचा, एकांताचा व निसर्गरम्यतेचा उपभोग फक्त पशुपक्षीच घेतात. याच्या गगनचुंबी शिखर-माथ्यावर राम-लक्ष्मण-सीता यांच्या प्राचीन मूर्ति आहेत. पण त्यांचें दर्शन कोणी घेत नाहीं. जणूं अजूनहि ते पुराणपुरुष वनवासांतच आहेत! तेथील शिळेवर रामचंद्राचीं कोरलेलीं पावलें आहेत. पण तिकडे कोणाचें पाऊल वळत नाहीं. हा पर्वत उपेक्षित आहे. बिचाऱ्याचें नांव फार थोड्या स्मरणशील नकाशांखेरीज कोणाला माहीत नाहीं. त्याच्याकडे जाण्याला रस्ता नाहीं. हत्तीवरून जावें लागतें. हा पर्वत दाट अरण्यानें वेढलेला आहे. इतका कीं, कांहीं ठिकाणीं उन्हाचा कवडसाहि पडत नाहीं. सूर्यकिरणांनाहि दाद न देणाऱ्या आसमंतातच्या जंगलांतून हत्ती सोंडेनें वाटेंतील वृक्षांच्या फांद्या मोडीत मार्ग काढीत पुढें जातो. याची एकूण उंची ३२०२ फूट आहे. जमिनीपासूनची त्याची तळची बैठक ऐरणीच्या आकाराची असून ती अंदाजें २५०० फुटांपर्यंत आहे. त्यावर पठार असून त्याच्या उत्तर मार्गी उंच शिखर किंवा डोळे फिरविणारा सुळका आकाशांत घुसला आहे. पर्वतशिखरावरील या गिरिशृंगाची उंची सातआठशें फूट असेल. माथ्यावर या पर्वताच्या पोटांत एक विस्तीर्ण आणि लांबच लांब (अदमासें ४५० फूट) [1]आरपार गुहा किंवा

१ ही हाथिपोळ नावाची नैसर्गिक आरपार गुहा, त्यांतील निर्झर आणि त्याचा पर्वत दणाणून सोडणारा निनाद हीं तीन वैशिष्ट्यें फार महत्त्वाचीं आहेत. त्यांचा एकत्रित संयोग अन्यत्र कोठेंहि आढळत नाहीं. या तिहेरी वैशिष्ट्यांमुळेच आपल्याला खरा रामगिरि व चित्रकूट ओळखून काढतां येणार आहे. रामगड = रामगिरि = चित्रकूट या सिद्धान्ताचा तो कणा आहे म्हटलें तरी चालेल.

बोगदा आहे. त्याला विवर किंवा विल (मराठी बीळ) म्हटले तर अधिक बरोबर होईल. किंबहुना याच शब्दांनीं त्याचें वर्णन प्राचीन वाङ्मयांत आलेलें आहे. ही गुहा एखाद्या अजस्र प्राण्याच्या उघडलेल्या तोंडासारखी दिसते. त्याच्या आंत स्वच्छ व सुंदर पाण्याचा एक झरा डोंगरांतून पाझरून वहात आहे. त्याच्या पडणाऱ्या पाण्याच्या ध्वनि-प्रतिध्वनीनें हा पर्वत सदैव निनादित होत असतो. या विवराच्या मागील बाजूस डोंगरांत राम, लक्ष्मण व सीता यांच्या नांवाच्या नैसर्गिक गुहा आहेत. त्यांच्याभोंवतीं रामचरित्राच्या अनेक दंतकथा चिकटलेल्या असून त्या अजूनहि तेथें घुमत आहेत. तिथें गेले म्हणजे त्या ऐकूं येतात. रामाचे वृत्तान्त आणि त्याच्या जागा तिथले लोक आजहि दाखवितात. आसमंतातच्या अनेक स्थळेंहि रामलक्ष्मणाच्या नांवांशीं निगडित अशीं आहेत. त्यांनींहि अद्यापि राम-नाम सोडलेलें नाहीं ! प्राचीन परंपरेनें जपलेला हा डोंगर फार प्राचीन काळापासून—सुमारें ४९०० वर्षांपासून प्रसिद्ध आहे. हाच हल्लींचा [1]रामगड पर्वत.

वाचकहो, पुन्हा एकदा 'चित्रकूट' म्हणून याच पर्वताची भेट फिरून आपल्याला घ्यावयाची आहे. यास्तव त्या दृष्टीनें आतांपासूनच त्याला नीट निरखून ठेवला पाहिजे. तूर्त रामगड हाच कालिदासाच्या मेघदूतातील रामगिरि हें या प्रकरणांत पाहूं. कालिदासानें रामसंचारित चित्रकूटाचाच आपल्या काव्यमय भाषेंत रामगिरि केला. आणि त्यानंतर बदलत्या काळानें राम कायम ठेवून गिरीचा गड केला. नांवें बदललीं पण वस्तु तीच आहे; तिघांशींहि रामाचा घरोब्याचा संबंध आहे. रामाशीं एकरूप झाल्यामुळेंच त्याचेंही 'एकरूपत्व' सिद्ध होण्याला मदत होणार आहे. हा रामगड रामाच्या केवळ कोरलेल्याच नव्हे तर खऱ्या पावलांनीं कसा अंकित झालेला आहे, हें उत्तरोत्तर स्पष्ट होत जाईल.

वस्तुतः कालिदासानें वर्णन केलेला रामगिरि म्हणजेच प्रसिद्ध चित्रकूट असावा, ही कल्पना मेघदूताच्या प्राचीन संस्कृत टीकाकारांना होती. म्हणून त्यांनीं 'रामगिरिः अत्र ·चित्रकूटः' असें भाष्य केलें आहे. पण मध्यंतरीं म्हणजे अलीकडे अव्वल इंग्रजीपासूनच्या संशोधक विद्वानांनीं कामतानाथजवळचा बुंदेलखंडांतील एक डोंगर चित्रकूट म्हणून कायम केला. सदरचा हल्लींचा 'चित्रकूट' रामटेकप्रमाणेंच ठेंगू आणि सामान्य आहे. नांव 'सोनूबाई आणि हातीं कथलाचा वाळा' या म्हणीप्रमाणें त्या चित्रकूटांत चित्रविचित्रपणा नाहीं आणि कूट म्हणजे शिखरहि नाहीं। याच्या आधारें मिराशींनीं चित्रकूट हा खरा रामगिरि होऊं शकत नाहीं असें सिद्ध केलें ! आणि शेरा मारला, कीं "या टीकाकारांच्या ठिकाणीं चोकसबुद्धि नसल्यानें त्यांनीं या प्रभाचा खोल विचार

[1] रामगड पर्वत व त्याच्या माथ्यावरील अद्भुत हाथिपोळ गुहा यांचें डिस्ट्रिक्ट गॅझेटियर-मधील मि. कॉब्डेन रॅम्से I. C S. यांनी केलेलें वर्णन (१९०५) पुढें पाचव्या व सहाव्या फोटोंत विस्तृत दिलें आहे तें पहावें.

केला नसावा." चुकीचा रामगिरि चुकीच्या चित्रकूटाशीं ताडून पाहतांना बिचाऱ्या मल्लिनाथप्रभृतींच्या चौकसबुद्धीची चूक निघाली! असो. हे प्राचीन टीकाकार विदग्ध, बहुश्रुत आणि मार्मिक होते. विशेषतः मल्लिनाथ आणि पूर्णसरस्वती यांची टीका तर फारच मूलगामी व रसोद्ग्राही आहे. वस्तुतः या पंडितांनीं प्राचीन काव्यादिकांवर स्वतःची बुद्धि घासून ज्या 'दीपिका' प्रज्वलित करून ठेवल्या आहेत, त्यांच्याच उजेडामुळें आपण अधिक शोधाशोध करूं शकतों. शिवाय परंपरेनें ते प्राचीन काळाच्या अधिक जवळ होते. त्यांच्या काळीं, [1]रामायणावरून कल्पना सुचून कालिदासानें आपलें मेघदूत रचलें अशी पितापुत्रपरंपरेनें चालत आलेली समजूत प्रचलित होती. लोक तसें बोलत होते. आमची तर खात्री आहे कीं, आपले प्राचीन ग्रंथकार अधिक चौकस व अधिक सूक्ष्मबुद्धीचे होते. पूर्वींच्या परंपरेनें आणि मेघदूतांतील वर्णनावरून मल्लिनाथप्रभृति चौकस टीकाकारांनीं रामगिरि बरोबर हेरला होता. रामगिरि म्हणजेच चित्रकूट हें समीकरण आपल्याला इतर प्रमाणांनींहि उद्भासित होणार आहे. पण मध्यंतरीं संशोधनाच्या धाल्मेलींत रामगिरि गेला नागपूरजवळ, आणि चित्रकूट नेला बुंदेलखंडांत. रामगड राहिला जागच्या जाग्यावर–अंधारांत! एका वस्तूची अशी त्रिस्थळी यात्रा झाली. रामगिरि चित्रकूटाशीं जमेना आणि रामटेक रामगिरीशीं जुळेना! 'वस्तुनि अवस्त्वाऽरोपः' हें या घोटाळ्याचें कारण होतें. त्यामुळें या बाबतींत संशोधनाच्या क्षेत्रांत गोंधळाची परिस्थिति उत्पन्न झाली आहे. 'तुझें आहे तुजपाशीं परि तूं जागा चुकलाशी' या तुकारामाच्या उक्तीप्रमाणें या प्रसिद्ध पर्वताच्या बाबतींत स्थिति होत होती. परंतु ह्याशीं वाळगलेला चुकीचा रामगिरि आणि चुकीचा चित्रकूट सोडून दिले आणि नजरेआड झालेल्या रामगडला त्या जागेवर बसविलें, म्हणजे या चित्रकूटाच्या एकत्वाचे दुवे एकमेकींत घट्ट बसून ती सांखळी किती सुसंगत व अभेद्य होते हें दिसून येईल. पण त्यासाठीं पायरीपायरीनें गेलें पाहिजे. प्रथम रामगडचा परिचय.

रामगड पर्वत प्राचीन–अतिप्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे यांत शंका नाहीं. हा पर्वत[2] विंध्याच्या रांगेंतलाच एक भाग. याचें नक्की स्थान म्हणजे छत्तीसगड प्रांतांत सिरगुजा संस्थानांत (२२·५३ उत्तर × ८२·५५ पूर्व) या अक्षांश-

---

१ रामगिरेः चित्रकूटस्य आश्रमेषु वसतिम् चक्रे कृतवान्...

मल्लिनाथ, मे. पहिल्या श्लोकावरील टीका.

२. नर्मदेच्या दोन्ही बाजूंनीं पसरलेल्या पर्वतरांगेला पूर्वी विंध्य हें नांव होतें. आरंभीं बलुचिस्तानकडून अफगाणिस्तानातून येणाऱ्या आर्यांच्या वसाहतींची व राज्यांची विंध्यपर्वतमाला ही दक्षिणसीमा होती. इकडे अगस्त्य, रामप्रभृति आर्य-पुरुषांनीं ही सीमा ओलांडून आर्य संस्कृति व वर्चस्व खालीं दक्षिण टोकापर्यंत रेटीत नेलें. विंध्य हा भरतभूमीचा विभाग, दक्षिणापथ व

[पुढील पानावर चालू

रेखांशांवर आहे. यालाच पूर्वी ऋक्ष किंवा ऋक्षवान् असें नांव होतें. ऋक्षवान् पर्वताच्या एका बाजूला नर्मदा व दुसऱ्या बाजूला महानदी असा उल्लेख महाभारतांत (शांतिपर्व अ० ५२·३२) आढळतो. टॉलेमी या पर्वताला Ouxenton आणि विंध्याला Quindon अशीं नांवें देतो. यावरून टॉलेमी नर्मदेच्या उत्तरेला असलेल्या विंध्यरांगेच्या मध्यभागाला ऋक्षवान् समजत होता, असें दिसतें. रामायणांत[2] व कालिदासाला हा नर्मदेजवळचा ऋक्षवान् म्हणून अभिप्रेत होता. सर्व संशोधक हाच प्राचीन ऋक्षवान् पर्वत असें मानतात.

हा रामगड पर्वत प्रयागच्या खालीं म्हणजे आग्नेयेस सुमारें दीडशें मैलांवर आहे. (अक्षांश रेखांश २२·५३ उत्तर × ८२·५५ पूर्व) हाच प्राचीन ऋक्ष पर्वत किंवा त्याचा भाग. रामायणांत (किष्किंधा कांड अ. ५० ते ५३) या ऋक्षपर्वताचें विस्तृत व सूक्ष्म वर्णन आहे त्यांत असलेल्या नैसर्गिक आरपार गुहेला[3] ऋक्षबिल म्हणजे ऋक्ष पर्वतांतलें बीळ अथवा विवर असें संबोधलें आहे.

---

मागील पानावरून चालू]

उत्तरापथ असे दोन विभाग पाडणारा होता. गुजराथपासून बिहारपर्यंत पसरलेल्या या विस्तीर्ण पर्वताच्या दुहेरी सांखळीला प्रथम विंध्य हीच सामान्य स्थूल व समावेशक संज्ञा होती. मागाहून सोयीप्रमाणें व व्यवहारानुसार त्याच्या निरनिराळ्या भागांना निराळीं नांवें देण्यांत आलीं असें दिसते पारियात्र, वैदूर्य, प्रस्रवण, ऋक्षवान्, मेखल इ. इ. मेखल पर्वत म्हणजे मध्यप्रदेशांतल्या गोंडवनांतलि मैकल डोंगराची रांग होय. या रांगेचें पूर्व टोक म्हणजेच प्रसिद्ध अमरकटक— नर्मदेचें उगमस्थान. म्हणूनच नर्मदानदीला मेखल-सुता असें प्राचीन नांव आहे. पारियात्र पर्वताचा जुन्यांत जुना उल्लेख बौधायनाच्या धर्मसूत्रात सांपडतो.

२ ऋक्षवन्तं गिरिश्रेष्ठं अध्यास्ते नर्मदां पिबन् (रामायण).

वप्रक्रियां ऋक्षवतस्तटेषु (रघु. ५·४४)

शिवाय 'भारतभूमि और उसके निवासी' पृ. ६२ पहा.

३. हें ऋक्षबिल असलेलें विंध्यातलें उच्च शिखर म्हणजेच चित्रकूट पर्वत होय. हे पुढें खुद्द कालिदासाच्या वर्णनावरून स्पष्ट होईल. ही आरपार गुहा म्हणजे रामगडला चित्रकूटाशीं 'जोडणारा' भक्कम बोगदाच आहे. दोघांचें हें अद्वितीय वैशिष्ट्य लक्षात आणल्यावर रामगड हाच चित्रकूट याबद्दल शंका रहाण्याचें कारण नाहीं इतर प्रमाणे पुष्टीदाखल आहेतच. तथापि ही भक्कम साखळी आर्धाच कळवून घेण्याची ज्यांना जिज्ञासा असेल त्यानीं चित्रकूट-वर्णनाचा कालिदासाचा हा श्लोक (रघु १३.४७) काढून पहावा.

धारास्वनोद्गारि दरीमुखोऽसौ ।
शृंगाग्रलग्नांबुदवप्रपंकः ॥

कालिदासानें आपल्या शैलीनुसार चित्रकूटाच्या नेमक्या वैशिष्ट्यावर बोट ठेवलें आहे वर्णन-कौशल्य तें हें. कालिदास हा शब्दानें चित्र काढणारा व रंग भरणारा कुशल चितारी होता रामायणानें चित्रकूटाच्या वर्णनांत शंभर श्लोक रचीं घातले आहेत. कालिदासाच्या एका श्लोकावरून चित्रकूट ओळखून काढावा! असो. या श्लोकावरून कालिदास रामगडालाच चित्रकूट समजत होता, हें उघड आहे आणि चित्रकूटालाच त्यानें मेघदूतांतील 'रामगिरि' म्हटलें यांत काय संशय?

दुर्गं ऋक्षबिलं नाम दानवेनाऽभिरक्षितम्
अवकीर्णं लताबृक्षैः ददृशुस्ते महाविलम्
तत्र क्रौंचाश्च हंसाश्च सारसाश्चापि निष्क्रमन्
(कि. ५०. ८/९ इ.)

याच गुहेंत हनुमान् वगैरे वानरवीर सीताशोधार्थ आले होते, असें वर्णन आहे. यावरून या स्थळीं किंवा याचे आसपास राम व सीता पूर्वी रहात असावेत. पूर्वीच्या वास्तव्यस्थळीं शोध करणें ही गोष्ट स्वाभाविक व अनुभवसिद्ध आहे.

रामगड[1] हें नांवच मुळीं रामगिरीपासून झालेलें आहे. राम कायम राहून 'गिरि'चा गड झाला. शब्दाच्या अपभ्रंशाचें अगदीं हुबेहूब असेंच दुसरें उदाहरण खुद्द मेघदूतांतच सांपडतें. कालिदासानें उल्लेखिलेल्या उज्जयिनीजवळच्या देवगिरीलाच (मे. श्लोक ४५) हल्लीं देवगड म्हणतात. मराठींत रायगिरी–रायरी–रायगड असें रूप झालें आहे. रामगड डोंगरावर एकच प्राचीन देवालय आहे आणि तें रामाचें असून सर्वोच्च शिखरावर वसलेलें आहे. त्याच्या अतिप्राचीनत्वाची एक खूण म्हणजे त्या देवळाच्या बांधकामांत घडीव दगड किंवा चुना वापरलेला नाहीं. दगडावर दगड ठेवून देऊळ उभारलें आहे. हे चौकोनी दगड एवढे मोठे आहेत कीं, ते पर्वत माथ्यावर कसे चढविले, याचें संशोधकांना कोडें आहे. त्यांत राम, लक्ष्मण, सीता यांच्या मूर्ति असून शिवाय हनुमान्, भरत, विष्णु यांच्याहि प्रतिमा आहेत. इतक्या उंचावर रामादिकांच्या मूर्ति तेथील रामवास्तव्याच्या स्मरणार्थ स्थापिल्या आहेत, हें उघड आहे. रामगड हें जसें रामाचें नामरूपानें स्मारक आहे तसें हें मूर्तिरूपानें स्मारक. सीतेच्या दोन्ही हातांत कमंडलू आहेत.[2] (फोटो पहा) यावरून या प्रतिमा वनवासकाळांतील आहेत, हें स्पष्ट आहे. रामगडावर दरवर्षी चैत्रांत फार मोठी यात्रा भरते, ही गोष्ट सूचक व महत्त्वाची आहे.

रामगड डोंगर, त्यांतील गुहा, तेथील कोरींव शिलालेख व अजिंठ्याप्रमाणें रंगविलेलीं चित्रें यांचें प्राचीनत्व–अतिप्राचीनत्व सिद्ध करणाऱ्या खालील गोष्टी महत्त्वाच्या आहेत. पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे येथें अशोकाच्या काळचा प्राचीन कोरलेला शिलालेख आहे. सन १९१४ मध्यें भारतीय पुराणवस्तुसंशोधन खात्यानें बोलाविल्यावरून कलकत्त्याचे सुप्रसिद्ध चित्रकार श्री. असित हल्दार रामगड-संशोधन सफरींत तेथें गेले होते. त्यांनीं मॉडर्न रिव्ह्यूच्या १९१५ सालच्या ऑक्टोबर-

---

१ गर्त या संस्कृत शब्दाचा अर्थ विवर किंवा आरपार गुहा, पोकळी असा आहे. (A hollow, hole, Cave आपट्यांचा कोश) गर्त या शब्दाचा अपभ्रंश प्राकृतात गड असा होतो असें वररुचीनें म्हटलें आहे. रामानें येथें अगर आसपास वास्तव्य केलें त्या रामगडच्या नैसर्गिक आरपार गुहेला रामगर्त असें नाव प्राचीन काळीं पडलें असल्यास त्याचा अपभ्रंश रामगड असाच होईल.

२ रामगडवरील मूर्तींचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे सीता, रामाच्या डाव्या हाताला नसून उजव्या हाताला आहे!

अंकांत त्यासंबंधी एक विस्तृत लेख स्वतः काढलेल्या चित्रांसह दिला आहे. त्यांतील महत्त्वाचे भाग आम्ही विषयानुसंधानानें खालीं नमूद करीत आहों. रामगडवरील गुहांतील चित्रें ४९०० वर्षांपूर्वीचीं आहेत असें मानतात.

श्री. हलदार लिहितात—

We were Commissioned to copy out the ancient fresco paintings *on the ceilings of certain caves* (on the Ramgarh Hills) supposed to be 4900 years old. (p. 379)

जोगिमारा नांवानें प्रसिद्ध असलेल्या गुहेच्या छतावर रंगीत चित्रें आहेत. त्या चित्रांच्या प्रतिकृति काढून घेण्याकरितां तीं न्याहाळीत असतांना एक नवी मौजेची गोष्ट श्री. हलदार यांच्या निदर्शनास आली. या दर्शनी चित्रांच्या खालीं *त्याहीपेक्षां पूर्वीच्या काळांत काढलेल्या चित्रांच्या रेषा त्यांना उमगल्या!*

While engaged in copying these paintings we came across *some clever lines of earlier drawings* which had been evidently covered up by the later paintings. Thus we found that the cave very probaby possessed drawings of a superior class at some uunknown period in the past. On later times ( undoubtedly far remote from the present day ) some people appear to have covered up the former paintings with a thick coating of white colouring matter and left behind these clumsy daubs of their own. ( p. 385 ).

सदरील चित्र-रेखनांत तांबडा, पांढरा व काळा असे तीन रंग वापरलेले आहेत. चित्रें व त्यांतील प्रसंग ह्यांचे वर्णन श्री. हलदार यांनीं केलें आहे. चित्रांचा विषय, प्रसंग व पार्श्वभूमि लक्षांत येत नाहीत इतकीं तीं प्राचीन आहेत. पण त्याचा अधिक विस्तार नको. हा चित्र-समूह सदैव एक न उकललेलें गूढ म्हणून राहील असे कांहीसे निराशेचे उद्गार हलदार यांनीं काढले आहेत. त्याचप्रमाणें जोगिमारा आणि सीताबेंगरा या गुहांच्या दगडी भिंतीवर कोरलेले लेख आहेत. त्यांतील लिपि अशोकाच्याहि पूर्वीच्या काळांतील आहे, असें तज्ज्ञांचें मत आहे.

There are incriptions deeply engraved on the stone-walls of the Jogimara and the Sita-Bengra Caves. They record a love affair between a dancing girl and a sculptor. Dr. Bloch and others have attempted to prove that the characters are older even than those of Ashok's time.

असाच अभिप्राय बेगलर व डि. रॅंझेटियर यांनीं व्यक्त केला आहे.

रामगडभोंवतीं दंतकथांनीं आपलें दाट जाळें विणलें आहे. त्यांचा सगळा ओढा रामाकडे आहे.

अर्थात् दंतकथांचें महत्त्व तुम्हांस दर्शवितें. दंतकथा अर्धवट झोंपेंतून उठविलेल्या माणसाप्रमाणें बिनचूक बोलत असते. धड ना खरें ना खोटें- दंतकथा म्हणजे सत्य व असत्य यांची एक संमिश्र कन्या आहे—गोष्टी आहे. या दंतकथांचा अर्धवोवटा वृत्तान्त संपूर्ण भरंवसा ठेवण्यालायक नसला तरी उद्बोधक पुरावा म्हणून त्यांचा फार उपयोग आहे. दंतकथेची वेडी वेल्हुद्धां मुळापर्यंत किंवा आधाराशिवाय वाढत नाहीं. स्वतंत्र विश्वसनीय प्रमाणें आणि त्यांच्या जोडीला पुष्टि देणाऱ्या प्राचीन दंतकथा असा सजोड दुहेरी पुरावा मात्र अधिक खंबीर ठरतो. किंबहुना स्वतंत्र पुराव्याचा वजा इतिहासाच्या पानावर दंतकथांच्या 'मुक्कां'नीं पक्का ठोकला जातो, असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं, म्हणून दोन्ही वाहून पहात पुढें जाऊं.

## मेघदूतांतील वर्णन रामगडचें आहे

आतां रामगिरीची कालिदासोक्त, चोवीस लक्षणें रामगडशीं ताडून पाहूं या. तीं कशीं जुळतात हें पूर्वीच्याच प्रकरणांत थोडथोडें दिग्दर्शित केलेलें आहे. त्यानंतरीज त्यांची अधिक माहिती व चिकित्सा येथें क्रमवार दाखल करतो. अर्थात् त्यांतील महत्त्वपूर्ण वैशिष्ट्यांचें विवेचन विस्तारानें व बाकीच्यांचें संक्षेपानें—असें थोडेंसें द्वत-विलंबित होईल. पण त्याला इलाज नाहीं. हल्लींचा रामगड म्हणजेच प्राचीन चित्रकूट या म्हणण्याच्या प्रतिपादनाकरितां जागा आतांपासून राखून ठेवली पाहिजे. रामगड तोच चित्रकूट हा सिद्धान्त एकदां प्रस्थापित झाल्यावर ओघानें रामगडच मेघदूतांतील रामगिरि याचाहि तो सक्कम पुरावा होऊं शकतो हें सुज्ञ वाचकांच्या लक्षांत येईलच.

१ सीतास्नान:—'जनकतनयास्नानपुण्योदकेषु' या उल्लेखावरून व 'आश्रमेषु' या अनेकवचनी प्रयोगामुळें हें राम-वनवासांतील वर्णन आहे, हें स्पष्ट आहे. जनकतनयेनें तेथें एकदां स्नान केलें असा अर्थ नसून राम व सीता दीर्घकालपर्यंत तेथेंच पण आळीपाळीनें जागा म्हणजे आश्रम बदलीत रहात होते असा अर्थ अभिप्रेत आहे. आतां याविषयींची रामगड-परंपरा पहा.

रामगडच्या उंच माथ्यावर तीन मोठाल्या राहण्याजोगत्या गुहा राम, लक्ष्मण व सीता यांच्या नांवाच्या आहेत. यांच्या वास्तव्याच्या कथा अजून तेथील लोक सांगतात. उंच शिखरावर चढण्यापूर्वी डोंगरमाथ्यावर एक रमणीय पठार आहे. त्यांतून एक झरा वहात आहे. तोच पुढें वहात असलेल्या नदीचा उगम. या झऱ्यात राम, लक्ष्मण व सीता यांनीं वनवासांत असतांना स्नान केलें, अशी आख्यायिका आहे. हिंदु यात्रेकरू प्रत्यक्ष गंगेइतकाहि या झऱ्याला पवित्र व पुण्यप्रद मानतात.

At last we reached an elevated table land which we had to cross in order to get to the top of the peak. We saw on the table land a spring which runs down a steep incline and forms the source of a river. Tradition has it that in the past age Sita, Ram and Lakshman once bathed at this very spot during the period of their banishment. Hindu pilgrims regard this spring as even more sacred than the Ganges itself.

सीतार्बेंगरा हें गुहेचें नांव तेथील प्रादेशिक बोलींतलें आहे. बेंगरा म्हणजे बंगला किंवा निवासस्थान असा अर्थ आहे श्री. हलदार यांनीं लिहिलें आहे कीं, प्रथमदर्शनीं सीता-गुहा नैसर्गिक असावी असें वाटतें. परंतु आंत जाऊन निरीक्षिल्यानंतर नीट कल्पना येते. प्राचीन काळीं तिच्यांत रहाणाऱ्यांकरितां सोयीस्कर व्हावी अशा रीतीनें ही गुहा मोठ्या योजकतेनें कोरलेली आहे या गुहेंत एक कोरलेली खोबण (drain) असून ती भिंतींतून पलीकडे म्हणजे लक्ष्मणबेंगरा या गुहेंत जाते. वनवासाच्या काळांत लक्ष्मण उपोषित असतांना त्याची तहान भागविण्याकरतां बेलफळापासून तयार केलेलें पेय सीतादेवी आपल्या गुहेंतून या कोरलेल्या दगडी खोबणीच्या द्वारा लक्ष्मणाकडे पोचतें करीत असे, अशी कथा येथें प्रचलित आहे. (हलदार पृष्ठ ३८५). लक्ष्मणाच्या गुहेंत रामलक्ष्मणांच्या धनुर्धारी भग्नावस्थेंत असलेल्या प्रतिमा दृष्टीस पडतात.

२ 'रामगिर्याश्रमेषु' या अनेकवचनी प्रयोगाचा अर्थ यक्ष विरहोन्मादामुळें आपलीं निवासस्थानें सारखीं बदलत होता असा मल्लिनाथानें केला आहे. परंतु कवीनें हा अर्थ मनांत वागवून अनेकवचनी प्रयोग केला असेल असें वाटत नाहीं. ही 'मल्लिनाथी' मागाहूनची आहे. यांतली खरी मख्खी अशी आहे कीं, रामचंद्र वनवासाला निघून चित्रकूट वनांत आले तेव्हां तळंच्या खालीं अनेक ठिकाणीं आश्रमांत रहात रहात अखेर चित्रकूटाच्या म्हणजे रामगिरीच्या माथ्यावर येऊन पोंचले. अर्थात् सीता बरोबर होतीच. त्यामुळें त्या त्या स्थळींचे उदकप्रवाह तिच्या स्नानामुळें पावन झाले, असा ह्यातील गर्भितार्थ आहे. नुसत्या, 'आश्रमेषु' या पदाच्या बहुवचनावर मल्लिनाथी करून भागणार नाहीं. त्याच्याशीं जनकतनयास्नानपुण्योदकेषु या विशेषणाचें लग्न लागलेलें आहे, हें लक्षांत आणलें पाहिजे. यास्तव सीतेसह रामाचा संचार या ठिकाणीं अभिप्रेत आहे. चित्रकूट व त्यावरील राम-सीतेचे अनेक स्थळीं मुक्काम हा रामायणांतील वृत्तान्त कालिदासाच्या डोक्यात असल्यामुळें त्यानें हें बहुवचन वापरलें, असें स्पष्ट दिसतें. कालिदास रामगडावर निःसंशय आला असला पाहिजे, हें मागें एकदा सूचित केलें आहे. त्या काळीं राम कुठे कुठे राहिले याबद्दलच्या कथा व आख्यायिका परंपरेनें खासच प्रचलित असतील. तीं ठिकाणेंहि लोक एकमेकांना श्रद्धेनें व कौतुकानें दाखवीत असतील.

मेघ आला असतांना होणें शक्य आहे हे सांगणें नकोच. तथापि सुदैवानें या बाबतींत वाचकांना आपल्या कल्पनेला इतका ताण देण्याचीहि जरूरी नाहीं. श्री० असिल हलदार यांना या श्लोकांत वर्णिलेल्या दृश्याचा **प्रत्यक्ष अनुभव** आला व ते सिद्धांगनांप्रमाणेंच मुग्ध व चकित झाले! रामगडच्या पायथ्याशीं असलेल्या उदीपूर गांवांत त्यांचा तळ असतांना--

> While we were in camp at Udipur we had a pleasant view one day of a fleecy cloud overhanging two peaks and the scene reminded us of the following lines in the 'Cloud Messenger' of Kalidas:—
>
> अद्रेः शृङ्गं हरति पवनः किंस्विदित्युन्मुखीभि-
> र्दृष्टोत्साहश्चकितचकितं मुग्धसिद्धांगनाभिः
> स्थानादस्मात्सरसनिचुलादुत्पतोदङ्मुखः खं
> दिङ्नागानां पथि परिहरन्स्थूलहस्तावलेपान् ॥ १४ ॥
>
> The sight of thee will drive to plainsurprise,
> The Siddha wives in wonder, face up turned,
> They will ask, if winds are tearing off the peak,
> As leavest thou this Asram cool and wet,
> With Nichula woods, do thou avoid
> The moving Ding-Naga's trunks and shoot up high
>
> *The picture drawn by the poet seemed to stand before our eyes in all its reality.*

ज्या ठिकाणीं हुबेहूब तसेंच दृश्य दृष्टीला पडून तोच कालिदासाचा श्लोक आठवतो व डोळ्यासमोर उभा रहातो, त्या स्थळाची वेगळी तरफदारी करण्याचें कारण नाहीं. कवीला त्याच्या वर्णनचातुर्याची पावती आणि लेखकाला आपल्या सिद्धातसत्यतेचा पडताळा याहून अधिक तो काय मिळावयाचा?

४. **कुटज कुसुमें**:--कुड्याचीं फुलें येथें मुबलक आढळतात. परंतु सामान्यतः तीं कोणत्याहि डोंगरावर मिळत असल्यामुळें हें गमक निर्णायक म्हणतां येणार नाहीं. तथापि या ठिकाणीं कुटज या शब्दानें कुड्याचीं फुलें अभिप्रेत नसावींत. यासंबंधीं मागील प्रकरणांत चर्चा केली आहे ती पहावी.

५. लक्षण ३ मध्यें याचा उल्लेख केलेला आहे.

## रामाचीं पावलें

६. **रघुपतिपदैः अंकितं**--हें सर्वांत महत्वाचें व व्यवच्छेदक (distinguishing) लक्षण आहे. तथापि याची चर्चा पुरेशी झाली आहे. हाच चित्रकूट हें दाखविल्यावर हा डोंगर रामपदचिन्हांकित आहे हें सिद्ध करण्याची

## रामाच्वीं पावलें, रामगड



" रघुपतिपदैः अंकितं मेखलासु "

गरज नाहीं. त्यांतून पदैः या बहुवचनानें पादुकांपेक्षां रामचंद्राचा प्रत्यक्ष वास निःसंदिग्धपणें सूचित होतो. म्हणूनच रामगिरि हाच चित्रकूट याचें हें बळकट प्रमाण होय. शिवाय रामगड पर्वतावर लक्ष्मणगुहेच्या बाहेरच्या बाजूस उजव्या शिलेवर पादुका कोरलेल्या आहेत. ओल्या मातीवर पावलें पडल्याप्रमाणें हा ठसा मोठा विस्मयजनक दिसतो. प्रभु रामचंद्रांचीं पवित्र पदचिन्हें येथें उमटलेलीं आहेत, असें येथील लोक मानतात (चित्र पहा—पृष्ठ ७९)

On the outside on the right wall looking towards the cave there is a strong impression of a footprint with the portrait of a warrior chiselled on it. We could not understand what it was but it looked very much like the impression of a man's foot on clay. The people here regard it as an impression of the sacred foot of the great Rama.

तथापि कालिदासाच्या सहजरमणीय शैलीप्रमाणें 'रघुपतिपदैः' या अर्थपूर्ण शब्दप्रयोगात दुहेरी किंवा तिहेरी श्लेष असावा, हें पूर्वीं सूचित केलेलेंच आहे. हीं कोरलेलीं पदचिन्हें, या पर्वताला रामाचे प्रत्यक्ष लागलेले पाय, याखेरीज भरताला रामचंद्रानें दिलेल्या पादुका हा तिसरा अर्थहि या खोल कवीच्या मनांत नसेल असें म्हणवत नाहीं.

७ येथें प्रतिवर्षी नियमानें जलवृष्टि होते, असें मे० १२ व्या श्लोकावरून दिसतें. वर्षाऋतूच्या आरंभीं मॉन्सून म्हणजे पाऊस आणणाऱ्या वाऱ्याची व मेघाची दिशा हीच आहे. हे वारे नैर्ऋत्येकडून खालून वहात येऊन विंध्याला वळसा घालून पश्चिम-उत्तरेकडे वहात जातात. ही गोष्ट सह्याद्या प्रकरणांतील भौगोलिक विवेचनावरून व वात-दर्शक नकाशांवरून लक्षांत येईल. शिवाय रामगड हा विंध्याचलाचाच भाग. कालिदासानें ऋतुसंहाराच्या दुसऱ्या सर्गांत पावसाळ्याच्या वर्णनाच्या निमित्तानें आपल्या आवडत्या विंध्यपर्वतावरच्या पर्जन्यवृष्टीचेंच वर्णन करून घेतलें आहे. तोच देखावा-तेच पर्वत मेघदूतांतहि त्याच्या नजरेसमोर असले पाहिजेत. विशेषतः आम्रकूटाच्या बाबतींत तर हें कल्पनासाम्य व वर्णनसादृश्य तंतोतंत जुळणारें आहे. तें पुढें पाहू. म्हणूनच रामगड व अमरकंटक हे विंध्यराजींतले पर्वतच कालिदासाचे रामगिरि व आम्रकूट असावेत, याचें हें आणखी एक बलवत्तर प्रमाण होय.

८ या लक्षणाचें विवेचन पूर्वीं झालें आहे.

९ **मुग्ध सिद्धांगना** (मे० श्लोक १४).—येथें सिद्ध या शब्दाचा अर्थ देवयोनि असा नसून असंस्कृत, रानटी, मागासलेले लोक असा होतो, हें आम्हीं मागें दाखविलें आहे. रामगड व त्याच्या भोंवतालच्या अरण्यांत अद्यापिहि आदिवासी लोकांची वस्ती आहे. एवढेंच नव्हे तर हे लोक हल्लीं एक वेगळा प्रांत करून मागत आहेत, ही गोष्टहि प्रसिद्ध आहे. त्यांच्यांत को' आणि खोराकू

अशा दोन जाती आहेत. पैकीं खोराकु लोकांमध्यें Saddam नांवाची एक जमात आहे. (इंपीरियल गॅझेटीयर पृष्ठ २३४ व पुढें) हा शब्द मूळ सिद्ध शब्दाचा अपभ्रंश असावा. हे रानटी लोक मेघदूताच्या कालाइतकेच हल्लींहि मागासलेले आहेत. त्याची कल्पना येण्याकरितां हल्दारांचा एक छोटासा कारणापुरता उतारा देतों.

Generally speaking the villagers were so timid that our arrival at the outskirts of a village was the signal for a general stampede and it was most amusing to find men, women and children attepting to hide themselves from our view in all sorts of odd nooks and corners. Most of the people are aborigines. They look very much like the Mundas and Oraons of Chota Nagapur. They go by the name of Korwa.

रामगड व भोंवतालच्या प्रदेश गोंडवनांत मोडतो. तेथें आजहि गोंड लोकांची पुष्कळ वस्ती आहे. तथापि त्यांच्याहि आधीं प्राचीन काळीं तेथें कोल लोकांचें राज्य होतें. तेथें आर्य लोकांनीं येऊन जेव्हां आपल्या वसाहती स्थापल्या त्या वेळीं त्यांच्या संस्कृतीचा तद्देशीयांवर बराच परिणाम झाला. त्यांचा धर्म, रहाणी व भाषा यांवर आर्यांची छाप पडली. त्यामुळें तेव्हांपासून बरेच लोक हिंदुधर्मांत आले व हिंदीचीच एक पोटबोली (*dialect*) बोलूं लागले. यानंतरच्या काळांत गोंड या प्रदेशांत आले व त्यांनीं तेथील रहिवासी कोल लोकांना जिंकलें व कांहींना हांकून दिलें. (Hunter: Statistical Account of Bengal Vol. XVII p. 231).

सुप्रसिद्ध रामायणसंशोधक श्री. आबा चांदोरकर यांनीं गोंडवन भागांत जाऊन हिंडून बरीच माहिती गोळा केली आहे. ते सांगतात कीं, गोंड लोक स्वतःला रावणाचे वंशज म्हणवितात आणि रामचंद्रानें आम्हांला आर्य किंवा हिंदुधर्मांत आपलें असें सांगतात. आपल्याकडे ज्याप्रमाणें हनुमानाचें देऊळ असतें त्याप्रमाणें त्या भागांत प्रत्येक गांवांत दशमुखी रावणाची मूर्ति असते. या मूर्ति दोन फुटांपासून २५ फुटांपर्यंतच्या असतात. या रावणमूर्तींची दसऱ्याला पूजा करतात. यावरून या भागांत राम व रावणाच्याहि आख्यायिका किती प्राचीन काळापासून चालत आल्या आहेत, हें कळून येतें.

१०. सरसनिचुलात् (मे. श्लोक १४):—

निचुल याचा अर्थ सर्व टीकाकारांनीं वेतस किंवा वेत असा दिला आहे. समुद्रफळ असाहि एक अर्थ आहे, पण तोहि तितकासा जमत नाहीं. सरस म्हणजे फार तर हीं वेताचीं झाडें एखाद्या तळ्याच्या किंवा ओढ्याच्या कांठीं असतील.

तथापि एकंदरींत हा अर्थ समाधानकारक नाहीं. वेताच्या झाडांखेरीज रामगिरीचीं पुष्कळ वैशिष्ट्यें असल्यामुळें एखादा प्रख्यात व जातिवंत कवि महत्त्वाच्या ठिकाणीं-रामगिरीचा निरोप घेण्याच्या प्रसंगीं-वेतांचें वर्णन करीत बसेल असें वाटत नाहीं. सरस व निचुल या दोन्ही शब्दांचा अधिक सरस, समर्पक व खास अर्थ असला पाहिजे. आमचें एक अनुमान आहे. पण *चित्रकूटावरचें प्रकरण झाल्याशिवाय त्याचें* औचित्य लक्षांत येण्यासारखें नाहीं. म्हणून तें नंतर सादर करूं.

११ लक्षण ९ संबंधींचें जंगली वस्तीसंबंधींचें विवेचन याहि मुद्याला लागू पडतें.

१२. रामगडवर घनदाट वृक्षांची गर्द झाडी आहे. हें लक्षण वर्णन करणाऱ्या पहिल्याच श्लोकांतले स्निग्ध व छायातरु हे दोन शब्द कालिदासानें कांहीं खास अर्थानें व कारणानें योजले आहेत. त्यांचा उलगडा पुढें होईल. *तूर्त रामगडभोंवतीं* अरण्य किती घनदाट आहे याची कल्पना देण्याकरितां श्री. हलदार यांचे दोन उतारे नमूद करतों. रामगड व त्याच्याभोंवतालचा भाग हा रानहत्तींचें वसतिस्थान आहे. अरण्य इतकें दाट आहे कीं, कांहीं ठिकाणीं सूर्यकिरणांनासुद्धां प्रवेश मिळत नाहीं! मधून मधून कमलांनीं फुललेलीं सुंदर सरोवरें असून हें जंगल विविध *पक्षिगणांच्या संमिश्र आवाजांनीं गजबजलेलें असतें.*

> The forest was so thick that in some places the sun's rays could hardly penetrate through the foliage. .....the journey was enlivened by the sight of beautiful lakes full of lilies and by the sweet blended notes of various kinds of birds as we marched through the jungles. (*p. 380-2.*)

प्रचंड रामगड पर्वतावर दोनदोनशें फूट उंचीचे प्रचंड सालवृक्ष आहेत. साल वृक्षालाच **यक्षधूप** असें दुसरें नांव आहे. यांत राळ असते. रामगडवर व या भागांत प्रचंड साल वृक्षाचें वैपुल्य आहे. यावरून या परिसरांत यक्षांची वस्ती होती असें दिसतें. यक्षधूप हें नांव त्याचें गमक होय.

१३. **मालक्षेत्र** (मे० श्लोक १६)—रामगिरीच्या नजीक असलेलें व कालिदासानें उल्लेख केलेलें मालक्षेत्र कोणतें, हें अजूनपर्यंत संशोधकांना समाधानकारकपणें सांपडलेलें नाहीं. त्याचा शोध 'उदङ्मुख' या १४ व्या श्लोकांतील शब्दावरून रामगिरीच्या उत्तरेला करतात. पण तें योग्य नसून मालक्षेत्र पश्चिमेच्या बाजूलाच असलें पाहिजे हें पुढें दाखविलें आहे.

रामगड डोंगर म्हणजे भोंवतालच्या मैदानातून मध्येंच वर निघालेला सुळका आहे. या प्रदेशालादेखील 'रामपूर टप्पा' म्हणतात, हें ध्यानात घेण्याजोगें आहे. रामगड पर्वताशीं विंध्य पर्वतराजीची सांखळी मध्येंच तुटलेली असून त्याच्या

पश्चिमेला विस्तीर्ण पठार आहे. त्यालाच नकाशांतून छोटा नागपूरचें पठार असें नांव आहे. हें पठार संपतांच अमरकंटक पर्वत म्हणजे नर्मदेचें उगमस्थान लागतें व तेथपासून पुन्हा विंध्याची रांग थेट पश्चिमकिनाऱ्यापर्यंत जाऊन भिडते. म्हणजे रामगडहून पश्चिमेला अमरकंटकाकडे (आम्रकूट) जातांना मध्येंच जें मोठें पठार लागतें तेंच किंवा त्यांत हें मालक्षेत्र असलें पाहिजे. या पठाराचा रामगडलगतचा प्रदेश पूर्वीच्या सिरगुजा संस्थानाचा पश्चिमभाग होय. हा भाग शेती करण्यालायक आहे व तेथें शेती करतातहि. त्यामुळें 'सद्यःसीरोत्कषणसुरभि' हें वर्णन या भागाला जुळण्यासारखें आहे.

"The other table-land trends to the west and, opening out as it goes, forms the main area of cultivated land in the State. (Singuja).

—इंपीरियल गॅझेटियर व्हॉ. १७, पृ. १७०.

शिवाय, रामगडावर उभें राहिलें आणि नजर फिरविली कीं सहजच पश्चिमेकडे पसरलेल्या या मोकळ्या मैदानाचा रमणीय देखावा दृष्टीस पडतो. एवढेंच नव्हे तर हवा स्वच्छ असली तर तेथून भव्य अमरकंटक (आम्रकूट पर्वत) सुद्धां स्पष्ट दिसतो असें म्हणतात.

"Ramgarh temple on the top of the hill—a magnificient place, whence may be seen the interminable hills of Chhuri-Mahtin teprora, and on a clear day, it is said, even the famous Amarkantak.

—Archaelogical Survey of India. vol. XIII p. 31 onwards.

मेघाच्या प्रवासांतील रामगड हें पहिलें स्टेशन आणि अमरकंटक हें नंतरचें स्टेशन ठरलें म्हणजे मधलें मालक्षेत्र हें या दोहोंच्या दरम्यान कुठेंतरी असलें पाहिजे हें उघड आहे. विल्सनसाहेब आम्रकूटलाच अमरकंटक मानीत असल्यामुळें मालक्षेत्र येथेंच म्हणजे छत्तीसगड प्रांताच्या उत्तर भागांत रतनपूरच्या उत्तरेस असावें असें मत त्यांनीं व्यक्त केलें आहे.

"The place here mentioned ('Mal') must be somewhere in the vicinity of रतनपूर, the chief town of the northern half of the province of छत्तीसगड ...... The only modern traces that can be found of it are in a place called माल्दा, a little to the north of रतनपूर.

हल्लीं रतनपूरच्या उत्तरेला म्हणजे रामगडच्या पश्चिमेला जें माल्दा नांवाचें ठिकाण आहे त्यालाच पूर्वी माल नांव असावें. माल्दा हें नांव 'माल'चें अपभ्रष्ट रूप दिसतें. पण या बाबतींत तर्क करण्याचीहि जरूर नाहीं. कारण या भागांत पूर्वींच्या

सिरगुजा संस्थानांत राहणारे खोराकु हे आदिवासी लोक माल-धनी व महादेव यांना दैवत मानून त्यांची पूजा करतात. (डिस्ट्रिक्ट गॅझेट, छत्तीसगड पृ. २३४।५) यावरून या भागाला पूर्वी माल हें नांव असावें, याबद्दल संशय रहात नाहीं.

## शकुन म्हणून उत्तरेला तोंड

उदङ्मुखः याचा अर्थ कित्येक टीकाकार 'उत्तरेच्या दिशेनें जा' असा करतात, पण तो बरोबर बसत नाहीं. येथपासूनच उत्तर दिशेनें प्रत्यक्ष गमन करावयाचें असा अर्थ नाहीं–असणें शक्य नाहीं. कारण पुढच्याच १५ व्या श्लोकांत 'कांहींसा पश्चिमेला जा आणि मग पुन्हा उत्तरेला जा' असा स्पष्ट दिशा-निर्देश केलेला आहे. ( = किंचित् पश्चात् मज १०) कांहींसा पश्चिमेला जर जावयाचें आहे, तर त्याच्याच आधीं उत्तरेला जायला कोण सांगेल? तेव्हां या दिशेच्या प्रश्नाचें हें 'उत्तर' चूक आहे. येऊन-जाऊन उदङ्मुख आणि पश्चात् मज यांच्या दरम्यान फक्त एक मालक्षेत्र लागतें. पण या मालक्षेत्रांत (माळरान किंवा पठारी प्रदेश) असें काय विशेष आहे कीं, ज्याकरितां पश्चिमेला जावयाचें असून कालिदास उत्तरेला जायला मेघाला सांगेल? आधीं उत्तर, लगेच बदलून पुन्हा पश्चिम आणि नंतर पुन्हा उत्तर–इतका द्राविडी प्राणायाम आणि आडवळणाचा मार्ग कशाकरितां? कालिदास कांहीं कारणावांचून वाकड्या वाटेला जाणारा मंद बुद्धीचा किंवा गबाळा कवि नाहीं. सारांश, मालक्षेत्राचा शोध रामगिरीच्या उत्तरेला न करतां पश्चिमेला केला पाहिजे. उदङ्मुख या शब्दप्रयोगानें फसून जातां कामा नये. उदङ्मुख म्हणजे उत्तरेकडे तोंड वळवून म्हणजे रोख ठेवून म्हणजे अखेर उत्तरेला जावयाचें आहे हें ध्यानीं धरून उड्डाण कर, एवढाच अर्थ आहे. उदङ् म्हणजे उत्तर या शब्दाची व्याप्ति अखेरच्या मुक्कामाची दिशा स्पष्ट करण्यापुरतीच मर्यादित आहे. शिवाय उदङ्मुख हा शब्द उत्पत या क्रियापदाकडे जोडावयाचा आहे येथें मज १० गमनार्थी क्रियापद घातलेलें नसून रामगिरीहून उड्डाण करण्याचीच फक्त क्रिया निर्दिष्ट केली आहे. म्हणजे निघतांना अखेर उत्तर दिशा गांठावयाची आहे एवढीच पूर्वसूचना मेघाला करावयाची आहे, हें स्पष्ट आहे. म्हणून मालक्षेत्राचा शोध व स्थापना रामगिरीच्या उत्तरेला करतात, तें युक्त नव्हे.

वस्तुतः माल पठार हें एक अप्रसिद्ध व मामुली ठिकाण आहे. मेघाच्या प्रवासांतलें तें कांहीं अपरिहार्य 'स्टेशन' नव्हे. पादपूरणार्थक अल्पवासमानानें, मेघमार्गाच्या स्थळनकाशांत मध्येंच बरीचशी जागा कोरी राहूं नये एवढ्याकरितां कालिदासानें या माल पठाराचा उपयोग करून घेतला आहे, हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. मेघदूताच्या काव्यकोठारांत कांहीं भर पडेल असें या माळरानांत कांहींच उपलब्ध नाहीं! या मालक्षेत्राविषयी मेघदूत काव्यांत आवश्यक माहिती अशी

एवढीच मिळते कीं, नुकतेंच नांगरलें असल्यामुळें हें क्षेत्र म्हणजे शेतजमीन सुगंधित झालेली होती. नांगरण्याची क्रिया आणि सुगंधाची निर्मिति हा कार्यकारण-भाव स्पष्ट आणि प्रतीत होण्याजोगा नसल्यामुळें वाचकाला या दोहोंच्या दरम्यान पर्जन्यवृष्टि झाली असली पाहिजे, अशी एक मनची कल्पना करून ती गृहीत धरावी लागते. तेव्हां कांहीं सुसंगत अर्थ या मालक्षेत्राच्या वर्णनांतून निघूं शकतो. याखेरीज मालक्षेत्राचें दुसरें वैशिष्ट्य किंवा उपयोग काव्याला नाहीं. त्यांत विशेष काव्योपकारकता अशी दिसत नाहीं शिवाय पावसाच्या पहिल्या सरीनें तत भूमि तृप्त व शांत होणें आणि त्यापासून विशिष्ट प्रकारचा आल्हाददायक सुगंध दरवळणें हा जो अनुभवसिद्ध सृष्टिचमत्कार आहे त्याचा उल्लेख व वर्णन कालिदासानें खुद्द मेघदूतांतच अन्यत्र केलेलें आहे. मग जवळजवळ अजागलस्तनवत् असलेला हा माल प्रदेश काव्यांत कसा घुसला? वाचकांच्या हें लक्षांत येईल कीं, मधली मोकळी जागा भरण्याकरितां ही कवीची योजना आहे. रामगिरि आणि आम्रकूट या दोन स्थळांच्या दरम्यान जी मोठी तूट, पोकळी किंवा खड्डा पडत होता, तो भरून काढण्याकरितां घातलेली ही भर होय. मालक्षेत्र म्हणजे या दोहोंच्यामधील दुवा. चांगले कवि क्षुद्र व सामान्य गोष्टींचाहि आपल्या कामाकरितां आणि कामापुरता कसा उपयोग करून घेतात, याचें हें मालरान म्हणजे उत्कृष्ट उदाहरण होय. हा माल-प्रदेश जर उत्तरेला असता तर उत्तर-पश्चिम-पुन्हा उत्तर असा वाकडा वळसा कालिदासानें खास घेतला नसता. त्याला जर मेघाला पश्चिमेकडे न्यावयाचें आहे (नर्मदा, विदिशा व उज्जयिनी यांच्या रोखानें) तर कवि या मामुली मालक्षेत्राकरितां दिशांची इतकी घालमेल कशाला करील? म्हणून मालक्षेत्र रामगिरीच्या पश्चिमेकडेच असणें अधिक संभवनीय आहे. तसें पाहूं गेलें तर मेघाला पश्चिमेकडे नेणें हीच मुळीं वाकडी वाट आहे! पण वाकडी वाट होते याची कालिदासाला पूर्ण जाणीव आहे.

वक्रः पंथा यदपि भवतः प्रस्थितस्योत्तराशां (श्लोक २७)

धडधडीत वाकडी वाट होत चालली आहे, हें लक्षांत येऊन आणि खटकत असूनहि कालिदास तरीहि त्या मेघाला पश्चिमेकडे कां ओढून नेत आहे? कै. शिवरामपंत परांजपे आपल्या सरस लेखांत (साहित्य-संग्रह भाग १) त्याचें कारण देतात :

"या प्रश्नाचें असें उत्तर दिसतें कीं, कांहीं तरी कारणामुळें ही विदिशेच्या बाजूची वाट कालिदासाच्या विशेष परिचयाची आणि प्रेमाची असली पाहिजे. आपल्या मेघाला उत्तरेकडे जावयाचें आहे ही जाणीव कालिदासाच्या मनामध्यें जागृत असतांनाहि 'परि परिचिता त्या त्या वस्तू न राहविती धिरा' या उत्तररामचरितांतील रामाच्या वचनाप्रमाणें कालिदासाच्या त्या त्या चिरपरिचित स्थळांविषयींचा ओढा मेघाला उत्तर दिशेच्या ऐवजीं

पश्चिम दिशेकडेच-विदिशा नगरीकडे आणि वेत्रवती नदीकडेच-ओढून नेत आहे! 'सद्यः सीरोत्कषणसुरभिक्षेत्रमारुह्य मालं। किंचित् पश्चाद् मज लघुगतिर्भूय एवोत्तरेण' या ठिकाणीं 'थोडासा पश्चिमेकडे चल, मग फिरून उत्तरेकडे जाशील,' असें कालिदास पूर्वमेघाच्या सोळाव्या श्लोकांत यक्षाच्या तोंडून मेघाला म्हणतो; आणि नंतर आम्रकूट म्हणजे अमरकंटकपर्वत, रेवा म्हणजे नर्मदा नदी, विदिशा नगरी, वेत्रवती नदी इत्यादि ठिकाणांची एकामागून एक रांग सुरु होते. इतका या विदिशा नगरीच्या प्रदेशाकडे कालिदासाचा ओढा कां? तूं आपली उत्तरेकडची वाट जराशी सोडून दे आणि पश्चिमेच्या दिशेला चल, असें कालिदासानें मेघाला कां म्हणावें?

"असल्या बारीकसारीक नद्यांचें कालिदास ह्या ठिकाणीं मेघाला उत्तरेकडे पाठविण्याचें थांबवून वर्णन करीत बसला आहे, याचा अर्थ काय? या प्रश्नाचें एकच समाधान आहे आणि तें उत्तररामचरितांत म्हटल्याप्रमाणें 'तत् तस्य किमपि द्रव्यं यो हि यस्य प्रियो जनः' हेंच होय. निर्विंध्या आणि सिन्धु, गंधवती आणि गंभीरा, या नद्या निर्मनोविकारबुद्धीच्या तुम्हां आम्हां लोकांना कितीहि बारीकसारीक असोत; परंतु कालिदासाला त्या फार महत्त्वाच्या वाटत असल्या पाहिजेत, असें दिसतें. एरवीं त्यांचें तो वर्णन करीत बसला नसता. "उत्पतोदङ्मुखः खं" असें १४ व्या श्लोकामध्यें म्हणून झालें नाहीं, तोंच लगेच "किंचित्पश्चाद् (पश्चिमभागेन) मज लघुगतिर्भूय एवोत्तरेण" या १६ व्या श्लोकामध्यें उत्तरदिशा सोडून मेघाला कालिदास पश्चिमेकडे नेत आहे आणि "वक्रः पंथा यदपि भवतः प्रस्थितस्योत्तराशां" या २७ व्या श्लोकांत उत्तरेकडे जाणाऱ्या मेघाची ही जरी वाकडी वाट होत आहे, तरीहि उज्जयिनी नगरीकडे जाण्याचा कालिदास मेघाला आग्रह करीतच आहे, यांत कालिदासाचें या प्रदेशावरील प्रेम स्पष्टपणें व्यक्त होत आहे.

"हें प्रेम जन्मभूमीच्या वात्सल्यामुळें असो, किंवा चिरसहवासाच्या बंधनानें असो, परंतु मुद्दाम वाकडी वाट काढून त्या वाटेंतील बारीकसारीक नद्या वगैरेंचें वर्णन करीत बसणाऱ्या कालिदासाचें त्या प्रांतावर प्रेम होतें, असें अनुमान काढण्याला येथें निर्विवाद जागा आहे."

*या विचारसरणींत* बरेंच तथ्य आहे यांत शंका नाहीं. कालिदासाचें प्रथमकाव्य ऋतुसंहार विंध्याभोंवतींच विणलेलें आहे, हें आम्हीं मागें दाखविलेंच आहे. त्याला आपल्या लाडक्या विंध्य-परिसरातली आवडतीं ठिकाणें व दृश्यें यांचें स्थलक्रमानुसार वर्णन करून घेण्याची हौस व संधि साधावयाची होती, असें दिसतें. ही त्यानें साधली म्हणूनच मेघाचा मार्ग त्यानें रामगिरीहून युक्तीनें प्रथमारंभींच

पश्चिमेकडे वळविला व अमरकंटक, नर्मदादस्थ उतरून विदिशेला (हल्लींची भिलसा) भेट देऊन त्याला उज्जयिनीपर्यंत ओढलें आणि अशा रीतीनें आपला अंतःस्थ हेतु पूर्ण झाल्यावर मग त्याला उत्तरेकडे वळवून रीतसर इच्छित स्थळापर्यंत त्याची तजवीज लावली आहे. वर उल्लेखिलेल्या कारणासाठीं व विदिशा, उज्जयिनी यांच्यासारखीं उल्लेखनीय व काव्याला रंग चढविणारीं स्थळें असल्यामुळें कालिदासानें पश्चिमेकडची वाट काढली हें ठीक आहे. परंतु पश्चिमेकडे जावयाला निघण्यापूर्वी मालक्षेत्राला भेट देण्याकरितां उत्तरेला उगीच एक वाकडी वेलांटी घेण्याला कांहीं सबळ कारण नाहीं. यावरूनहि माल रामगिरीच्या पश्चिमेलाच असावें, या म्हणण्याला पुष्टि मिळते.

वर चर्चिलेल्या कारणांसाठीं कालिदासानें हा पश्चिमेकडचा वाकडा रस्ता पत्करला असेल. परतु त्याबरोबरच हा त्यानें वर्णन केलेला मार्गच मेघाच्या नैसर्गिक मार्गाशीं व मान्सून वाऱ्यांच्या दिशेशीं भौगोलिक दृष्टया बराचसा जुळता आहे, ही गोष्टहि लक्षांत ठेवली पाहिजे. त्यावरूनहि रामटेकवरून निघालेल्या मेघानें मिराशी म्हणतात त्याप्रमाणें थेट सरळ उत्तरेला विंध्य व नर्मदा ओलांडून जाण्याची अशक्यता लक्षांत येईल. रामगडवरून निघणाऱ्या मेघाचा वरीलप्रमाणें मार्ग भौगोलिक नियमांना धरून आहे.

उदङ्मुख हाच शब्द कालिदासानें अन्यत्र अनेक ठिकाणीं वापरला आहे (रघु. ४:५९) तेथेंहि त्याचा अर्थ फक्त उत्तरेला तोंड करून एवढाच विवक्षित आहे. शिवाय ज्या रामायणांतून कालिदासानें बऱ्याच कल्पना आणि शब्दप्रयोगहि जशाच्या तशा उचलून घेतले आहेत, त्या रामायणांतहि उदङ्मुख शब्द फक्त वरील अर्थानेंच वापरलेला आहे (रामा० अयोध्या. ९६·१२) यावरून उदङ्मुख शब्दाचा 'उत्तरेकडे जा' असा अर्थ नसून उत्तरेकडे नजर ठेवून, उत्तरेच्या रोखानें, अखेर उत्तरेला जावयाचें आहे हें ध्यानांत धरून, एवढाच मर्यादित अर्थ कालिदासाला अभिप्रेत आहे, हें स्पष्ट दिसतें. प्राचीन काळीं आर्य लोक उत्तर दिशा शुभ समजत असत आणि दक्षिण अशुभ समजत. दक्षिण दिशा ही राक्षसांच्या राहण्याची आणि म्हणूनच कदाचित् यमाची दिशा ठरलेली असावी. राक्षसांना 'नैर्ऋत' म्हणतात यासाठींच. रामायणांत देखील रामचंद्र वनवासार्थ अयोध्येहून बाहेर पडले त्या वेळीं जरी त्यांना दक्षिणेकडे गमन करावयाचें होतें तरी रामानें शुभसूचक म्हणून रथाचें तोंड प्रथम उत्तरेकडे केलें होतें.

उदङ्मुखं तं तु रथं चकार।
प्रयाणमांगल्यनिमित्तदर्शनात् ॥

—अयोध्याकांड सर्ग ४६·३४

म्हणूनच मेघाच्या प्रस्थानसमयीं—अगदीं ऐन निघण्याच्या वेळीं-प्रयाणमांगल्याकरितां यक्षानें 'उदङ्मुखः उत्पत' असें मेघाला सांगितलें असलें पाहिजे.

याचेंच आणखी एक उदाहरण पहा. खुद्द कालिदासानें हा उदङ्मुख शब्द रघुवंशाच्या पांचव्या सर्गांत वापरला आहे. नर्मदेच्या दक्षिण तीरावर तळ असतांना अज राजानें एका गजरूपधारी गंधर्वाला शापमुक्त केलें. त्यानें संतुष्ट होऊन राजाला प्रभावी अस्त्रमंत्र दिला. तेव्हां अजानें उत्तरेकडे तोंड करून त्याचा स्वीकार केला, हा कवीचा उल्लेख सूचक आहे.

उदङ्मुखः सोऽस्त्रविदस्त्रमंत्रं। जग्राह तस्मान्निगृहीतशापात्॥

यावरुन शुभ व महत्त्वाची गोष्ट करतांना उदङ्मुख होऊन करावयाची, हा संकेत व प्रघात स्पष्टपणें दिसून येतो. घराबाहेर पडतांना अजूनहि उत्तरेकडे तोंड करण्याची चाल दिसते. प्रयाणमांगल्यानिमित्तदर्शन हेंच उदङ्मुख होण्यांतील रहस्य होय.

## आधीं पश्चिम, मागाहून उत्तर

१४. येथून पश्चिमेकडे वळ आणि मग फिरून उत्तरेला जा म्हणजे अलका लागेल. (श्लोक १६), असें यक्ष मेघाला सांगतो. सबंध मेघदूत काव्यांत दिशेचा आदेश असा हा एकच आहे म्हणून त्याला फार महत्त्व. या प्रश्नाची चर्चा आतांपर्यंत जागजागीं विषयानुरोधानें आधींच येऊन गेली आहे. ग्रंथरचनेच्या सोयीकरितां लेखक विषयाचे अलग अलग भाग पाडून घेतो खरे, पण ते राजकीय हेतूनें पाडलेल्या प्रांतांप्रमाणेंच कृत्रिम ठरतात. लेखनाच्या ओघांत लेखणी शेजारच्या संलग्न विषयांत हिंडून आल्याशिवाय रहात नाहीं. आतां पूर्वी येऊन गेलेल्या विवेचनाखेरीज उपोद्बलक असे नवीन मुद्दे येथें मांडतों. मूळ श्लोक असा:—

सद्यः सीरोत्कषणसुरभि क्षेत्रमारुह्य मालं।
किंचित् पश्चात् व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण॥

यांतील 'एव' हें पद फार सूचक आहे. याचा स्पष्ट अर्थ असा कीं, पुढें अखेरीस उत्तरेलाच जावयाचें असलें तरी तूर्त पश्चिमेकडेच वळ. म्हणजे पश्चिमेकडे वळण्यानें किंचित् वाकडी वाट होत आहे याची जाणीव 'एव' शब्दांत स्पष्टपणें व्यक्त झालेली आहे. पुढें 'वक्रः पंथा यदपि भवतः' या २७ व्या श्लोकांत स्पष्ट शब्दांत व्यक्त झालेली वाकड्या वाटेची जाणीव या १६ व्या श्लोकांत[1]

---

१. या १६ व्या श्लोकात किंचित् पश्चात् असे शब्द आहेत. तेथें किंचित् म्हणजे थोडेंसें असा अर्थ नसून काहींसें पश्चिमेला (somewhat to the west) असा अर्थ आहे. तथापि याखेरीज आणखीहि एक अर्थ कवीच्या मनांत असणें संभवनीय आहे. किंचित् हें क्रियाविशेषण वरच्या ओळींतील आरुह्य पदाकडे जाऊं शकतें. म्हणजे मालक्षेत्र विस्तृत असल्यास तें सबंध व्यापणें मेघाला शक्य नाही, म्हणून त्याचा काहीं भाग वाटेंत लागेल तेवढाच आक्रमून व सिंचन करून (मालं किंचित् आरुह्य) असा अर्थ निष्पन्न होतो. तो स्वाभाविक व सुसंगत आहे. हा अर्थ घेतला, तर किंचित् शब्दानें पश्चिमेकडील दिशेचा व प्रवासाचा जो संकोच, तो होणार नाही.

अस्पष्टपणें सूचित झालेली स्पष्ट दिसते. यावरून वस्तुतः उत्तर दिशा गांठावयाची असलेल्या मेघाची वाकडी वाट थेट रामगिरीपासूनच सुरू होत आहे हें दिसून येईल आणि याची कल्पना कालिदासाला नाहीं असेंहि नाहीं. म्हणून या दिशा-दर्शक उल्लेखाचा अर्थ 'आधीं पश्चिमेला वळ आणि मग मात्र उत्तरेलाच जा' असाच केला पाहिजे. पश्चात् व्रज म्हणजे मेघाला बराचसा पश्चिमेला न्यावयाचा आहे हें उघड आहे. नाहीं तर *भूयः* म्हणजे *पुन्हा* आणि *एव* म्हणजे *उत्तरेलाच* हे शब्द योजण्याचें कारण नव्हतें. ही दिशा व मार्ग निश्चित झाल्यानंतर त्याला रामगडशिवाय दुसरें ठिकाण जुळत नाहीं, हें उघड आहे.

आतां रामटेकहून अलकेला जावयाचें आहे, अशी कल्पना करूं या. तर मग यक्षानें मेघाला प्रस्तुतसारखा आदेश दिला नसता. आधीं उत्तरेला जा–मग पुन्हा पश्चिमेला–आणि मग पुन्हा उत्तरेला जा. *अशी द्राविडी प्राणायामाची वाट मेघाला सांगावी लागली असती* (मागील प्रकरणांतला नकाशा पहा). उलटपक्षीं रामगडहून **कैलासाकडे** (अर्थात् नर्मदा-विदिशा-उज्जयिनी या मार्गानें) जावयाचें म्हटल्यास मात्र या श्लोकांत सांगितलेली वाटच कोणीहि सांगेल. यक्षानेंहि तीच वाट सांगितली आहे. यावरून रामगड हाच रामगिरि हें सिद्ध होतें.

'*माल*' याचा आणखीहि एक अर्थ संभवतो. आणि तो अतिशय समर्पक रीतीनें जुळतो. तो असा: रामगडपर्वताचें उत्तुंग शिखर चढून गेलें म्हणजे अगदीं थेट माथ्यावर सुमारें दोनशें फूट लांबीरुंदीचें छोटेंसें पठार किंवा क्षेत्र आहे. त्याला Mehal म्हणजे मेहल अथवा महल असें नांव आहे. (A S. I. vol. XIII p. 36) तिथें बेगलरसाहेब गेले असतांना केळीची बाग केलेली होती व एका हत्तीनें नुकत्याच त्यांतील केळी मोडून त्यांची नासधूस केल्याचें दिसत होतें. बेगलरसाहेबांना हत्तीचीं पावलें दिसलीं. त्यांवरून बऱ्याच अंतरापर्यंत त्याचा माग काढला. तथापि हत्तीचा शोध लागणें शक्य झालें नाहीं. सारांश, या पर्वत-माथ्यावरच्या छोट्या पठाराला पूर्वीं माल हें नांव असावें. असें असल्यास मेघ त्या उंच शिखराच्या मध्यें कोठेंतरी किंवा मेखलाभागावर विलगलेला असतांना यक्षानें त्याला वर म्हणजे माथ्यावरच्या माळापर्यंत चढावयाला सांगणें स्वाभाविक आहे. त्याशिवाय शिखराला अडलेल्या किंवा टकरा मारणाऱ्या मेघाची पुढली वाट मोकळी कशी होणार? शिवाय मग '*आरुह्य मालं*' यांतील आरुह्य म्हणजे 'वर अथवा उंच चढून' हा जो सरळ व स्वाभाविक अर्थ आहे तो किती चपखल व हृदयंगम रीतीनें जुळतो, हें वाचकांच्या लक्षांत येईल. वर दिलेल्या दोन अर्थांपैकीं कोणताहि स्वीकारला तरी चालेल. कारण आमचा प्रस्तुत सिद्धान्त मालक्षेत्राच्या निश्चितीवर अधिष्ठित नाहीं. सुचलेले संभाव्य अर्थ सादर केले आहेत एवढेंच.

## आम्रकूट म्हणजे अमरकंटकच

१५. क्र. १५ ते १८ हीं चार लक्षणें आम्रकूटाशीं संलग्न आहेत. आधींच्या १४ व्या लक्षणांत किंचित् पश्चात् या दिशा-उल्लेखाच्या स्पष्ट केलेल्या अर्थाप्रमाणें पाहिलें तर आम्रकूट हा आपोआपच अमरकंटक ठरतो! पण तें सोडून देऊन स्वतंत्रपणें आम्रकूट कोणता हें पाहूं. येथें एक गोष्ट अवश्य सांगितली पाहिजे. रामगड, किंचित् पश्चात् चा ७० ओळीचा अर्थ, मालक्षेत्र, अमरकंटक आणि नर्मदेचें 'नक्षीदार' दृश्य या पांच गोष्टींपैकीं कोणतीहि एक निश्चित झाली, कीं बाकीचीं स्थळें आपोआपच नक्की ठरतात. अशी त्यांची सांखळी आहे. तथापि यांपैकीं एकमेकांची मदत न घेतां आम्हीं प्रत्येक स्थळाचा स्वतंत्र विचार करून तें निश्चित केलें आहे. परंतु शिवाय या संबंधित स्थळांच्या निश्चयानें अप्रत्यक्षपणें मिळणारी पुष्टि त्यांत मिळविली म्हणजे हीं सर्व स्थळें (विशेषत: रामगड) 'द्विर्बद्धं सुबद्धं भवति' या न्यायानें किती दृढ व निर्विवादपणानें सिद्ध होतात, हे वाचकांच्या लक्षांत येईल.

अमरकटक पर्वताचें स्थानमाहात्म्य मोठें आहे. अमरकंटक म्हणजे छोटा नागपूर प्रदेशांत गोंडवनांतील मैकल पर्वतराजींचा एक भाग होय. येथें नर्मदा, महानदी व शोण या तीन मोठाल्या नद्यांचा उगम आहे. मैकल पर्वतरांगेचें तें अगदीं पूर्वेकडील टोंकाचें शिखर होय (असें कांहीं लोक समजतात). याची उंची ३४६८ फूट म्हणजे रामगडपेक्षांहि अधिक आहे. हा पर्वत हिंदूंचें एक पवित्र क्षेत्र समजला जातो. (B. C. Law : Holy Places of India p. 34) पद्मपुराणांत त्यावरील चंडिका-तीर्थाचें वर्णन आहे. मत्स्यपुराणाच्या हिशोबीं अमरकंटकचें पावित्र्य कुरुक्षेत्रापेक्षांहि अधिक आहे. नर्मदा, शोण व महानदी या तीन पवित्र व महत्त्वपूर्ण नद्यांचा उगम याच पर्वतांतून होतो. असा हा प्रचंड, पवित्र व प्राचीन पर्वत आहे.

अमरकंटक भव्य व उंच आहे. त्यावर अनेक उत्तुंग शिखरें आहेत. (सानुमान् आम्रकूटः) त्यावर रान-आंब्यांचीं विपुल झाडें आहेत. त्यावर रान-वणवे लागतात. रान-आंब्यांच्या पिकलेल्या पिवळ्या आम्रफलांनीं डंवरलेल्या व फुगीर दिसणाऱ्या या डोंगराच्या शिखरावर काळा मेघ ओथंबला म्हणजे खूप उंचीवरून पहाणाऱ्याला तो भूदेवतेच्या स्तनासारखा दिसेल, हें रसिकांना न सांगतांहि समजण्यासारखें आहे. शिवाय ही कल्पना कामुक व विरहोन्मत्त यक्षाच्या तोंडीं किती खुलून दिसते, याचें औचित्य वेगळें सांगावयास नको. या डोंगराच्या पश्चिमेस गेलें कीं, विंध्याच्या पायथ्याजवळची स्फुटितप्रवाहा नर्मदाहि लागते. यावरून अमरकंटक मेघदूताच्या सर्व अटी पुऱ्या करतो हें दिसून येईल.

पण हा इतका लायक उमेदवार मिराशींना मंजूर नाहीं:

"कारण अमरकंटक पर्वत ईशान्येस दूरवर राहतो; शिवाय अमरकंटकाचें प्राचीन नांव आम्रकूट नसून मेकल असें होतें. नर्मदा नदीचा उगम अमरकंटकला होतो व तिला मेकलसुता म्हणतात हें प्रसिद्ध आहे. तेव्हां अमरकंटक प्राचीन आम्रकूट असणें शक्य नाहीं."

अमरकंटक ईशान्येस रहातो? कुणाच्या ईशान्येस? रामटेकच्या असेल, **रामगडच्या** ईशान्येस नव्हे! म्हणजे मौज अशी कीं, जी गोष्ट सिद्ध करावयाची आहे तीच गृहीत धरली आहे! रामटेक सिद्ध करावयाचा आहे, असें असतांना रामटेक गृहीत धरून अमरकंटक त्याच्या ईशान्येला म्हणून रद्द ठरवावयाचा, ही युक्तिवादाची तऱ्हा काय आहे हें समजत नाहीं! त्याचप्रमाणें मेकल हें प्राचीन नांव आहे हें मान्य. पण एका स्थळाला अनेक नांवें असूं शकत नाहीत काय? अमरकोश किंवा इतर शब्दकोश सारे निष्कारण रचले गेले काय? शिवाय हिमालय, विंध्य किंवा खुद्द मिराशींच्या सातपुड्याप्रमाणेंच मेकल हें एका पर्वतराजीचें सामुदायिक किंवा समावेशक असें नांव आहे, हें स्पष्ट आहे. त्यांतल्या पर्वतांना अथवा शिखरांना स्थलकालभेदानें स्वतंत्र नावें असूं शकणार नाहींत काय? त्यांतीलच एखाद्या आम्राच्छादित उंच डोंगराला पूर्वी आम्रकूट (कूट = शिखर) आणि अलीकडे अमरकंटक असें वर्णनात्मक किंवा अपभ्रंशात्मक नांव पडलेलें असणें असंभवनीय आहे काय? प्राचीन व प्रारंभींचीं नामाभिधानें गुण-दर्शक किंवा वर्णनात्मकच असतात. किंबहुना तीं विशेषणेंच असतात, नामें नसतातच. उदाहरणार्थ कृष्ण, परशुराम, भीम, दशरथ, जानकी, ऊर्मिला, शकुंतला, विंध्य, चित्रकूट, भागीरथी, यमुना, दशार्ण, कुरुक्षेत्र इ० इ०. प्रथम काळा म्हणून कृष्ण किंवा दांडगा म्हणून भीम होता. पुढें गोऱ्या किंवा कृश माणसालाहि कृष्णाजीपंत व भीमराव अशीं नांवें मिळूं लागलीं! पहिलीं पहिलीं नांवें हीं विशेषनामें नसून सामान्यनामें होतीं, हा सामान्य नियम विशेष लक्षांत ठेवला पाहिजे. तात्पर्य, मेकल रांगेंतल्या एखाद्या शिखराला आम्रकूट हें वैशिष्ट्य-दर्शक वर्णनपर नाव मिळालेलें असणें अगदीं स्वाभाविक व संभवनीय आहे. सातपुड्यांतलें एखादें शिखर आम्रकूट होऊं शकतें आणि मेकलांतलें शिखर आम्रकूट असणें शक्य नाहीं हा न्याय कुठला?

यांतली खरी गोम अशी आहे कीं, मिराशींना अमरकंटकचा कांटा दूर करावयाचा आहे. कारण तो त्यांच्या रामटेकला सलतो आहे म्हणून. अमरकंटक प्रस्थापित झाला, कीं रामटेकचें माहात्म्य संपलेंच! उलट आम्रकूट अमरकंटक ठरला, कीं आपोआपच रामगड हा रामगिरि ठरूं लागतो. याची जाणीव असल्यामुळें मिराशींनीं अमरकंटकवर आक्षेप काढले आहेत. पण ते फोल आहेत. दिशा, अर्थवर्णन व शब्दसादृश्य या सर्व दृष्टींनीं चपखल जमणारा अमरकंटक केवळ त्यांच्या रामटेकला जुळत नाहीं एवढ्या सबबीवर बाजूला सारतां येणार नाहीं.

आम्रकूटाचा उल्लेख अन्यत्र कोठेंहि आढळत नाहीं. त्यामुळें त्याला ओळखणें जड जातें. तथापि कालिदास मेघदूतांत त्याच्या खाणाखुणा देऊन चुकला आहे. त्यांवरून त्याला उघडकीस आणणें शक्य आहे.

आम्रकूट म्हणजेच अमरकंटक असे बहुतेक संशोधक मानतात. याबाबत पाहिली लक्ष वेधणारी गोष्ट या दोहोंमधील शब्दसाम्य व ध्वनिसादृश्य. पदव्युत्पत्तिदृष्ट्याहि *अमरकंटक पद भ्रष्ट होऊं शकत नाहीं. अमरकंटकला किंवा नर्मदेच्या* उगमस्थानाच्या प्रदेशाला पूर्वीं वंशगुल्म असेंहि नांव होतें. त्यावरून येथें बांबूंच्या बेटांची दाटी असावी असे दिसतें. आजहि अमरकंटकवर बांबू किंवा वंश मुबलक आहेत. शिवाय कंटक या शब्दाचा बांबू असाहि अर्थ आहे. तेव्हां आम्र आणि कंटक या तेथील वृक्ष-दर्शक नांवाचा संधि होऊन कालांतरानें आम्र याचा अमर असा अपभ्रंश होऊन अमरकंटक हें नांव सिद्ध झालें असण्याचीहि शक्यता आहे. *आणखी एक गोष्ट अशी कीं, गोंडवनाच्या पूर्वभागाला पूर्वीं महाकांतार असें* म्हणत. या देशाच्या राजाला महाकांतारक व्याघ्रराज असें नांव होतें (अलाहाबाद येथील कोरीव शिलालेखः-समुद्रगुप्त-प्रशस्ति) कांतार किंवा कांतारक म्हणजे अरण्य. गोंडवन हा अरण्याचा भाग असल्यामुळें त्यावरूनच त्याच्या पूर्वभागाला महाकांतार हें नांव पडलें असावें. त्याचप्रमाणें या प्रदेशाच्या लगत पश्चिमेकडे असलेल्या मेकल-पर्वताच्या परिसरांतल्या अरण्यांत आम्रवृक्ष विशेषत्वानें असल्यामुळें त्याला आम्र-*कांतार किंवा आम्रकांतारक आणि नंतर अपभ्रंशाच्या घसरगुंडीनें हल्लींचें अमर-*कंटक नांव पडलें असावें, असाहि संभव आहे.

आतां एक मनोरंजक प्रमाण सादर करतों. प्रथम आम्रकूटाच्या वर्णनाचा श्लोक पहा.

> त्वामासारप्रशमितवनोपप्लवं साधु मूर्ध्ना
> वक्ष्यत्यध्वश्रमपरिगतं सानुमानाम्रकूटः ।
> न क्षुद्रोऽपि प्रथमसुकृतापेक्षया संश्रयाय
> प्राप्ते मित्रे भवति विमुखः किं पुनर्यस्तथोच्चैः ॥

आणि आतां त्याच कवीच्या ऋतुसंहारातील विंध्य पर्वताचें पावसाळ्यांतलें वर्णन पहा—

> जलधरविनतानामाश्रयोऽस्माकमुच्चै-
> रयमिति जलसेकैस्तोयदास्तोयनम्राः ।
> अतिशयपरुषाभिर्ग्रीष्मवह्नेः शिखाभिः
> समुपजनिततापं ह्लादयन्तीव विन्ध्यम् ॥ २७ ॥

—ऋतु० सर्ग २·२७

एकाच कवीचे दोन ठिकाणचे हे दोन् श्लोक किती एककर्तृत्वप्रतिपादनोपयोगी आहेत, हें वेगळें सांगावयास नको. या दोन श्लोकांतील कल्पना-सादृश्य विस्मयजनक आहे. किंबहुना सादृश्य नसून एकच कल्पना दोन ठिकाणीं अवतरली आहे, असेंहि म्हणतां येईल.

एकाच प्रतिमेंतून, एकाच अनुभूतींतून हे दोन श्लोक निघालेले आहेत. किंबहुना त्याच अनुभूतींतून एकच श्लोक दोनदां स्फुरला, असेंहि म्हणतां येईल. ऋतुसंहारांत कालिदासानें विंध्यावरची वृष्टि वर्णन केली. रघुवंशांत रामचंद्रावर राज्याभिषेक होत असतांना त्याला विंध्यमस्तकावरचा जलाभिषेक आठवला (सर्ग १४·८). मग मेघदूतांतहि त्यानें त्याच प्रियपरिचित विंध्यावरचा तोच वणवा त्याच पर्जन्यवृष्टीनें शांत केलेला असणें शक्य नाहीं काय? आम्रकूट हें विंध्यांतलेंच शिखर असलें पाहिजे. आणि तेंहि नर्मदेच्या स्फुटितप्रवाह दृश्याच्या अलीकडचें. कारण पुढेंच विंध्याचा पायथा लागतो आणि नर्मदाप्रवाहांचें दृश्य दिसतें. कालिदासाच्या डोक्यांत आणि डोळ्यांपुढें विंध्य आहे, रामटेक किंवा सातपुडा नव्हे!

अशा रीतीनें ऐतिहासिक व भौगोलिक प्रमाणांनीं अमरकंटक किंवा त्याचें पूर्वेटोंकाकडील शिखर हाच प्राचीन् आम्रकूट ठरतो, यांत शंका नाहीं. तथापि आतां निरपेक्षपणें आणि तटस्थतेनें या प्रश्नाकडे उंचावरून एक विहंगमदृष्टि टाकूं या. अखेरीस, याचकरहो, कालिदास भव्यतेचा भोक्ता आहे हें विसरतां कामा नये. उत्तुंग, अफाट, मोठाले पर्वत व त्यांच्यावरील दृश्यें, आकाश व समुद्र यांच्यासंबंधींचे देखावे आणि भव्य सृष्टिचमत्कार वर्णन करण्याची या कविश्रेष्ठाची हातोटी व आवड आहे.-आपल्याला असें दिसेल कीं, तो भव्य मोठाल्या गोष्टींचें वर्णन करून राहिला आहे. मेघदूताचें कथानक जर काल्पनिक तर त्यांतील स्थल-मालिका निवडण्याला तो पूर्णपणें स्वतंत्र होता. तर मग तो आपल्या प्रारंभबिंदूकरितां अनोळखी, ठेंगणा व अप्रसिद्ध डोंगर वेंचून काढील कीं पूर्वपरिचित, उंच, वैशिष्ट्यपूर्ण व राम-संबंधानें सर्वतोमुखीं झालेला रामायण-प्रसिद्ध चित्रकूट (=रामगड) पसंत करील? आणि प्रवासांत विश्रांतीसाठीं सातपुड्यांतलें एखादें अज्ञात कोंपऱ्यांतलें शिखर निवडील कीं रामगडापेक्षांहि उंच, भव्य व तीन महान् नद्यांचें उगमस्थान म्हणून पवित्र व प्रसिद्ध असलेला विस्तीर्ण गिरिराज पसंत करील? Little things please little minds ही म्हण कविवर्गासमुद्धां लागू पडेल. कालिदासाची बुद्धि व स्फूर्ति दांडगी आणि महत्त्वाकांक्षी होती. 'वचने किं दरिद्रता' हा न्याय निदान काव्याच्या प्रांतांत लागू करण्याइतकी योजकता व धडाडी त्याच्या अंगांत खासच होती. वर्णन करून करायचें मग तें भिकार गोष्टींचें कशाला? सकारण केलेले किरकोळ अपवाद सोडले तर असें प्रत्ययाला येईल कीं. कालिदासाच्या कवितेनें क्षुद्र वस्तूंना जवळ केलेलें नाहीं, त्याच्या प्रतिभेचा उंच मेघ

ठेंगण्या रामटेकच्या पातळीइतका खालीं येणार नाहीं. तो रामगडसारख्या गगनचुंबी व महनीय पर्वतालाच इत्तीसारखी टक्कर देणार !

## नर्मदेचें नक्षीदार दृश्य

१९. आम्रकूटानंतर थोडा रस्ता चालून गेल्यानंतर (तत्परं वर्त्म तीर्णः) विंध्याच्या पायथ्याशीं तुला नर्मदा दिसेल असें वर्णन आहे (श्लोक १९). येथें नर्मदेच्या एका विशिष्ट दृश्याचें रेखाचित्र कवीनें फार सूक्ष्म व रमणीय काढलें आहे. त्यावरून या नर्मदा-दृश्याचें ठिकाण जबलपुरापाशीं (मिराशी म्हणतात त्याप्रमाणें) खात्रीनें नसून तें बरेंच अलीकडे म्हणजे अमरकंटकच्या नजीक पश्चिमेला आहे हें आम्हीं पूर्वीच विस्तारानें दाखविलें आहे (नर्मदाप्रवाहाचा मुद्दाम पुस्तकांत दिलेला नकाशा पहा.) या बहारीच्या नर्मदावर्णनातलें काव्यकौशल्य अत्यंत उच्च दर्जाचें असून शिवाय त्याचा उपयोग स्थळ-निश्चयाला फार आहे. याखेरीज हें नर्मदादृश्याचें ठिकाण नक्की व निःसंदिग्धपणें ठरविण्यांत एक फार मोठें महत्त्व व लाभ आहे. कारण हें कोडें उकलण्यानें रामगिरीचें रहस्य उकलणार आहे. या श्लोकांत वर्णिलेल्या नर्मदा-स्थानाची जागा पक्की झाली, कीं स्वाभाविकपणेंच आम्रकूट हा अमरकंटक व रामगिरि हाच रामगड ठरतो. म्हणून आम्ही या स्थळाची छाननी विशेष बारकाईनें व विस्तारानें करणार आहोंत. खोलांत जाऊन या ठिकाणाचा पाया पक्का केला पाहिजे. प्रथम मूळ श्लोक व त्याचें मराठी भाषांतर पहा—

रेवां द्रक्ष्यस्युपलविषमे विंध्यपादे[1] विशीर्णां
भक्तिच्छेदैरिव विरचितां भूतिमंगे गजस्य ॥

*आम्रकूटाची हद्द ओलांडून गेल्यावर पाषाणांच्या योगानें उंच-सखल* झालेल्या विंध्यपर्वताच्या पायथ्याशीं, अनेक फाट्यांत-प्रवाहांत-**विखुरलेली** नर्मदानदी हत्तीच्या शरीरावर काढलेल्या चित्रविचित्र पट्टयांच्या वेलबुट्टीसारखी दिसेल.

---

१ विशीर्णां :—या पदाचा अर्थ प्रो. मिराशी यांनी उन्हाळ्यामुळें वाळलेला अरुंद झालेला नर्मदेचा प्रवाह असा घेतला आहे. त्यांना जबलपूर-नरसिंगपूर या दरम्यानच्या नर्मदेवरून मेघाला न्यावयाचा असल्यामुळें त्यांनीं अर्थाची अशी ओढाताण केली आहे. तथापि येथें हा अर्थ साफ चुकीचा व विपर्यस्त असून संदर्भाशीं मुळींच जमत नाहीं. विशेषत. नर्मदाप्रवाहाला हत्तीच्या अंगावरील बहुविध वेलपत्तीची जी उपमा दिली आहे, तीवरून हा मुद्दा सूर्यप्रकाशाइतका स्पष्ट होतो. उपमेय व उपमान यांच्यांतील साधारण धर्म विशीर्णत्व म्हणजे बहुविधत्व होय हें उघड आहे. म्हणूनच याचा अर्थ आजपर्यंतच्या सर्व टीकाकारांनीं व भाषांतरकारांनीं स्फुटितप्रवाहा (Parted into streamlets) असा केला आहे. विशीर्णा याचा इतका 'वाळलेला' अर्थ दुसऱ्या कोणीहि केलेला नाहीं. तसा करणें उचित नव्हे.

आतां प्रसिद्ध पुरातत्त्वज्ञ कै. प्रो. पाठक यांचें इंग्रजी भाषांतर पहा.

And traversing the road beyond Amrakut at a swifter pace by reason of the discharge of water, thou wilt see the Narmada parted into streamlets at the foot of the Vindhya rugged with stones and resembling the figures composed of the marks of pointed streaks on the body of an elephent.

वस्तुतः या श्लोकाचा अर्थ अगदीं स्पष्ट आहे. पण त्यांतहि मतभिन्नता आहे. म्हणून चर्चा केली पाहिजे. नर्मदेचें कोणतें दृश्य कवीला अभिप्रेत आहे? गज-शृंगारांत हत्तीच्या अंगावर बहुधा तांबड्या रंगाच्या (कारण त्याच्या काळ्या पाठीवर दुसरा रंग तितकासा खुलून दिसत नाहीं) चित्ररेखा किंवा आकृति काढतात त्याप्रमाणें नर्मदा नदीचा देखावा दिसणार आहे. असा देखावा कोणत्या ठिकाणीं दिसेल? जेथें नर्मदा अमरकंटकावरून खालीं उतरते व ज्या ठिकाणीं तिला आसपासच्या या डोंगराळ मुलखांतून अनेक जलौघ-प्रवाह-उपप्रवाह येऊन मिळतात, तेंच हें ठिकाण होय. नकाशांत (इंपी० गॅझे० प्लेट २२) मंडल नांवाचें गांव दाखविलेलें आहे. त्या ठिकाणीं हे नर्मदेचे कित्येक उपप्रवाह एकत्रित व केंद्रित झालेले स्पष्ट दिसतात. भौगोलिक भाषेत ८० ते ८२ × २२ ते २३ या नकाशासारख्या चौकटींत नर्मदा-प्रवाहांचें हें जाळें फार स्पष्ट दिसतें, व सहज डोळ्यांत भरतें (मागच्या प्रकरणांतील नर्मदा-प्रवाहाचा नकाशा पहा [1]). मौज अशी कीं, येथून पुढें मात्र नर्मदेचा एकत्रित प्रवाह थेट अखेरपर्यंत बहुतांशीं चक्क एकेरी-एकच रेघ लांबच्या लांब काढल्यासारखा अखेरपर्यंत दिसतो! यावरून हें लक्षांत येईल कीं, या विशिष्ट ठिकाणचें हे दृश्य दिसावयाचें म्हणजे मेघाला पूर्वे-कडूनच अमरकंटकवरून पश्चिमेकडे आलें पाहिजे. यानाच अर्थ रामगड हाच रामगिरि! रामटेकहून निघून दक्षिण-उत्तर दिशेनें जबलपुरापाशीं येणाऱ्या मेघाला हें दृश्य दिसणें अशक्य आहे. त्यामुळें रामटेक निःसंदिग्धपणें चुकीचा व रद्द ठरतो. म्हणून आम्हीं प्रारंभीं म्हटलें होतें कीं, नर्मदेच्या स्फुटितप्रवाहांचें वर्णन हें गमक अतिशय बलवत्तर व निर्णायक असून रामटेकला नाशाङ्कित करून रामगडला प्रस्थापित करण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं आहे.

आतां यांतील कालिदासाचें काव्यकौशल्य व उपमाचातुर्य पाहूं. तें बघावयाचें वरच्या प्रमाणाला पुष्टि मिळते म्हणून. जबलपुराच्या पुढचा नर्मदेचा एकेरी प्रवाह कवीला वर्णावयाचा नसून त्याच्या अलीकडील नर्मदेचे फाटे किंवा प्रवाहांचें जाळें कवीला अभिप्रेत आहे, हें आपल्याला त्याच्या उपमेवरून समजतें. हत्ती शृंगारतात

१ मेघमंडलांतून म्हणजे आकाशांतून मार्ग पहात असतां हें दृश्य सगेनरीष कालि-दासानें वर्णिल्याप्रमाणें दिसतें, याची माहिती अकल्पिततर्नें आम्हास मिळाली. मुंबईचे वैमानिक कै० एन. व्ही. जोगळेकर यांनी अमरकंटक ते मंडल या मार्गानें असा देखावा हुबेहूब दिसतो. कीं पुढें मात्र नर्मदेचा प्रवाह एकेरी रेघेसारखा दिसतो, अशी माहिती सांगितली.

तेव्हां त्याच्या पाठीवर काय एकच किंवा एकेरी रेष असते? पूर्वीच्या संस्थानांतून राजेरजवाड्यांचे स्वारीचे अथवा शृंगारलेले-रंगविलेले हत्ती पुष्कळांनीं पाहिले असतील. त्याच्या अंगावर किंबहुना अरुंद सोंडेवर देखील अनेक रंगीत रेषांची नक्षी किंवा वेलबुट्टी काढलेली असते. यावरून कवीला अनेक प्रवाह अभिप्रेत आहेत याची खात्री पटते. आतां उपमा किती समर्पक व बहारीची आहे पहा. विंध्याच्या पायथ्याला गजाच्या अंगाची अथवा पाठीची उपमा दिली आहे. पायथा काळा, गजहि काळा. पायथा उतरता तशी हत्तीची पाठहि कमानदार किंवा उतरती असते. पायथा उपलविषम म्हणजे मोठमोठ्या पाषाणांनीं उंच-सखल झालेला. हत्तीच्या अंगावर खवले किंवा सुरकुत्या असतात. त्यामुळें त्याचेंहि अंग विषम किंवा खडबडीत दिसतें. नर्मदेचे अनेक प्रवाह व त्यांची नक्षीदार गुंतागुंत तर हत्तीच्या अंगावर काढलेल्या अनेक रेषांची वेलबुट्टी. नर्मदेचे ते प्रवाह[1] पावसाळ्याच्या प्रारंभींच्या जलवृष्टीमुळें तांबूस झालेले तर गजशृंगाराच्या रेषाहि तांबड्याच! कालिदासाचा नेहमीं पूर्णोपमा करण्याकडे कल असतो त्याचें हें एक उदाहरण होय. उपमेय आणि उपमान यांच्या अंगोपांगांचें सादृश्य-दर्शक कोष्टक खालील-प्रमाणें बनविता येईल.

विंध्य = गज
पायथा ( पाद ) = गजाचें अंग किंवा पाठ
उपलविषमे = खवल्यांनीं खडबडीत दिसणारी पाठ
दगड काळे = पाठ किंवा खवलेहि काळे
नर्मदेचे प्रवाह = चित्रविचित्र रेषा ( बहुधा तांबड्या )
वृष्टीमुळें प्रवाह तांबूस = हत्तीच्या अंगावरच्या रेषाहि तांबड्या
प्रवाहांचें जाळें = वेलबुट्टी

असो. येथें नर्मदेचा एकेरी प्रवाह कीं अनेक प्रवाह अभिप्रेत आहेत, हा खरा वादाचा मुद्दा आहे. त्यांतच या लक्षणाचें निर्णायकत्व भरलेलें आहे. या

१ मेघदूतांतील वर्णनावरून पावसाळा सुरू झाल्याचें स्पष्ट दिसतें. इंद्रधनुष्य दिसते आहे ( श्लोक १५ ), कुटजकुसुमें फुललीं आहेत ( श्लोक ४ ), रामगिरीवर मेघ वृष्टि करीत आहे ( श्लोक १२ ), चातक हर्षनिर्भर होऊन गाणें गात आहेत ( श्लोक ९ ), मालक्षेत्र जलवर्षावानें सुगंधित झालें आहे ( श्लोक १६ ), आम्रकूटावर तर दावाग्नि विझण्याइतकी जोराची पर्जन्य-वृष्टि झाली आहे ( श्लोक १७ ), विशेषतः आम्रकूटावर तोयोत्सर्ग ( श्लोक १९ ) म्हणजे बरेंच पाणी पडलें आहे. इतकें कीं, त्यामुळें मेघ रिकामा व हलका झाला आहे. या सर्व उल्लेखावरून वर्षाकाळाला प्रारंभ होऊन पावसाची झोड सुरू झाल्याचे स्पष्ट दिसतें. त्यातल्या त्यात आम्रकूटा-वर बराच मेघवर्षाव झाल्याचा उल्लेख असल्यामुळें त्यापुढेच उगम पावणाऱ्या नर्मदेला व तिच्या उपप्रवाहांना पाणी आल्याशिवाय कसें राहील? आणि पावसाळ्याच्या प्रारंभींचे हे प्रवाह तांबडेच असणार, यांत शंका नाहीं.

वादाचा निर्णय कालिदासाचे अन्यत्र असेच उल्लेख पाहून होतो. ही गजशृंगाराची उपमा कवीची आवडती होती असें दिसतें. याच कल्पनेचा त्यानें आणखी दोन ठिकाणीं उपयोग केला आहे.

१. कुंजरबिंदुशोणाः (कुमारसंभव १·७)
ही उपमा भूर्जपत्रांवर धातुरसानें लिहिलेल्या अक्षरांना दिली आहे.

२. भक्तिभिर्बहुविधाभिरर्पिता
भाति भूतिरिव मत्तदंतिनः (कु. सं. ८·६९)

यांतील बहुवचनी प्रयोगावरुन गजशृंगाराच्या चित्ररेखा 'बहुविध' होत्या हें सिद्ध होतें. पण याहीपेक्षां आणखी मार्गे जाऊन या उपमेच्या नक्की अर्थाचा छडा लावतां येतो. कालिदासाचा व रामायणाचा फार घरोबा. त्याच्या कवितेचें तें माहेरघरच. प्रस्तुत उपमेंतील मूळ कल्पना त्यानें याच मांडारांतून उचलून आणली असली पाहिजे. नेहमींच्या घाटणीप्रमाणें त्याच्या सौंदर्यान्वेषिणी बुद्धीनें त्या कल्पनेला अधिक सुंदर व समर्पक करुन सजविली इतकेंच. रामायणांत रामचंद्र पंचवटींत पोंचल्यानंतर गोदावरीच्या तीरावरील डोंगरांचें वर्णन आहे.

दृश्यन्ते गिरयः सौम्याः फुल्लैस्तरुभिरावृताः
सौवर्णे राजतैस्ताम्रैर्देशे देशे तथा शुभैः
गवाक्षिता इवाभान्ति गजाः परमभक्तिभिः

—अरण्यकांड सर्ग १५. १४।१५

या श्लोकावरील टीका पहा. गवाक्षिता गजा इव भक्तिभिः गवाक्षाकार-नीलपीतादिवर्णरचनारूपालंकारैः अलंकृताः। म्हणजे गवाक्षाचा आकार असलेल्या म्हणजे जाळीदार किंवा नक्षीदार अशा विविध रंगांच्या रेषांनीं अथवा आकृत्यांनीं शृंगारलेल्या गजांची उपमा येथें दिली आहे. येथेंहि बहुवचनी प्रयोग आहे. यावरुन पूर्वीपासून हत्ती शृंगारतांना त्याच्या अंगावर बहुविध चित्रविचित्रित रेषा अथवा आकृत्या काढीत होते आणि ही गोष्ट कालिदासाला माहीत होती, हें स्पष्ट आहे. आणि म्हणूनच त्यानें हा बहुवचनी प्रयोग केला, हें सिद्ध होतें. यावरुन विशीर्ण याचा अर्थ वाळलेलीं किंवा पात्र उन्हाळ्यामुळें अरुंद झालेली असा मिराशींनीं त्यांच्या सोयीकरितां केलेला अर्थ बरोबर नाहीं. याबाबत शंका रहात नाहीं. तथापि आमचा अर्थ अधिक दृढ करण्याकरितां रामायणांतील दुसरी-कडचा गवाक्ष उपमेचा एक श्लोक देतों. (कि. १. २६।२७)

अमी मयूराः शोभन्ते प्रनृत्यन्तस्ततस्ततः
स्वैः पक्षैः पवनोद्धूतैः गवाक्षैः स्फाटिकैरिव

येथें गवाक्षांची उपमा मदोन्मत्त मोरांच्या चित्रविचित्रित व उभारलेल्या पिसाऱ्यांना दिलेली आहे, हें लक्षांत आणलें पाहिजे. गवाक्षें म्हणजेच मुळीं अनेक नक्षीचीं रंध्रें व वेलबुट्टीचें जाळें. पण शिवाय ही उपमा चित्रविचित्रित डोंगरांना व मोरपिसाऱ्यांना दिलेली पाहिली म्हणजे रामायणकर्त्याला बहुविधत्व वर्णन करावयाचें आहे, हें सहज लक्षांत येतें. आणि म्हणून 'गजाः परमभक्तिभिः' या वाल्मीकीच्या वरील श्लोकात नानाविधत्व निःसंशयपणें व्यक्त झालेलें आहे आणि हीच उपमा कालिदासानें उचललेली आहे. तेव्हां त्यांतहि बहुविधत्व अभिप्रेत आहे. अनेक फांटे फुटलेल्या स्फुटितप्रवाहा नर्मदेचें वर्णन कालिदासानें येथें केलें आहे, एकेरी नर्मदाप्रवाहाचें नव्हे.

आतां एक उलटा ताळा पाहूं. कारण या प्रमाणाची खात्री पटविणारी आणखी एक 'उलटी खूण' सुदैवानें आपल्यापाशीं आहे. कालिदासानें रघुवंशांत नर्मदेचेंच म्हणजे रेवा नदीचें वर्णन केलें आहे (सर्ग ६.४३). मात्र हा नर्मदेचा भाग [1]माहिष्मतीजवळचा (=हल्लींचा मांधाता प्रदेश) म्हणजे जबलपूरच्याहि पुष्कळ पूर्वेस खांडव्यानजीकचा होय. येथें नर्मदा एकेरी, एकप्रवाहा आहे, हें आपण पाहिलेंच आहे. म्हणून या ठिकाणीं कालिदासानें कशी निराळी उपमा योजली तें पहा.

प्रासादजालैर्जलवेणिरम्यां
रेवां यदि प्रेक्षितुमस्ति कामः

येथें नर्मदेच्या जलप्रवाहाला कांची म्हणजे रशनेची (=दोरी, कडदोरा) उपमा दिली आहे यावरून या ठिकाणचा एकेरी प्रवाह स्पष्टपणें सूचित होतो. एकाच नदीच्या दोन ठिकाणच्या भिन्न देखाव्यांना दिलेल्या दोन भिन्न उपमांमुळें कालिदासाचें निरीक्षण व वर्णनांतील कांटेकोरपणा तर व्यक्त होतोच; पण मेघदूतात वर्णिलेलें नर्मदा-दृश्य जबलपूरजवळ नसून मंडलाजवळ आहे, याबाबत शंका रहात नाहीं.

मिराशींनीं मात्र विशीर्णां या नर्मदेच्या विशेषणाचा अर्थ 'आटलेली, अरुंद' असा घेतला आहे. ते लिहितात :

> नर्मदा नदीचें वर्णन जबलपूर ते नरसिंगपूर या भागांत वर्षाकालारंभीं त्या नदीचें जें दृश्य दिसतें त्यासारखेंच आहे. ग्रीष्म ऋतूंत पाणी आटल्यामुळें नर्मदा नदीचा प्रवाह अरुंद होऊन खडकाळ प्रदेशांतून वाहत जातो.
> [सं. मु., पृ. ६०]

१. माहिष्मती म्हणजेच हल्लींचें ओंकारमांधाता म्हणतात तें क्षेत्र. हे बेट असून नर्मदेच्या प्रवाहाच्या मध्यभागीं आहे. हे ठिकाण प्राचीन काळीं भरभराटींत होतें. बौद्ध वाङ्मयात याला अवंती-दक्षिणापथ किंवा दुसरी अवंती असे म्हटलें आहे.

जो नाहीं तो अर्थ नेमका त्यांनीं उचलला आहे. मिराशींना मेघदूतांतलें नर्मदेचें दृश्य रामटेक-जबलपूर या त्यांच्या मेघ-मार्गाशीं जुळण्याकरितां जबलपुरापाशीं न्यावयाचें आहे. त्यासाठीं ही विशीर्ण शब्दाच्या अर्थाची ओढाताण दिसते. परंतु शब्दांच्या ओढाताणीनें कोणालाहि एकीकडलें स्थळ दुसरीकडे ओढून नेतां येणार नाहीं. शिवाय ग्रीष्मऋतु आणि पाणी आटण्याची भाषा मिराशी कां बोलत आहेत, हें समजत नाहीं. वर्षाकाल सुरू होऊन जोराची पर्जन्यवृष्टि होऊं लागल्याचीं स्पष्ट चिन्हें व उल्लेख मेघदूताच्या आरंभीं कितीतरी आहेत. ते आम्हीं मागच्या पानावरील तळटीपेंत दाखविले आहेत. ग्रीष्मऋतु चुकीचा, आटलेलें पाणी चुकीचें आणि त्याचप्रमाणें जबलपुराजवळची एकेरी नर्मदाहि चुकीची !

सारांश, कालिदासानें केलेलें नर्मदेच्या स्फुटित प्रवाहांच्या दृश्याचें वर्णन हें एकच प्रमाण इतकें प्रबळ आहे कीं, त्यामुळें रामटेक निखालसपणें चुकीचा ठरून रामगड शाबीत होतो. इतर प्रमाणें नसतीं तरी देखील एवढ्या एका नर्मदा-वर्णनावर रामगडच्या बाजूनें निकाल द्यावा लागेल.

२०. गच्छेः (श्लोक २०):—'नर्मदेचें पाणी पिऊन किंवा शोषून पुढें जा' असा हा उल्लेख आहे. या ठिकाणीं 'नर्मदा ओलांड अथवा उत्तीर्य' इत्यादि अर्थाचा शब्द न घालतां नुसता 'गच्छेः' असा प्रयोग कवीनें केला आहे. त्यामुळें नर्मदा नदी ओलांडावयाची नसून तिच्यावरून कांठाकांठानें जावयाचें आहे, असा हेतु ध्वनित होतो. त्याचा फलितार्थ असा कीं, मेघाचा मार्ग दक्षिणोत्तर नसून पूर्व-पश्चिम होता. ही दिशा रामगड-अमरकंटक-विदिशा हाच मार्ग दाखविते.

२१. दशार्ण-विदिशा-वेत्रवतीसंबंधींचें हें प्रमाण मागें विवेचिलें आहे.

२२. उत्तरमेघ श्लोक ४१ प्रमाणें रामगिरीवर हरिणी, मोर व नदी किंवा जलप्रवाह आहेत. आजहि रामगडवर विविध जातींचे व रंगांचे हरिण-काळविटांचे नयनमनोहर व चपळ कळप इतस्ततः पळत असलेले आढळतात. रामगडच्या रानांत मोरहि विपुल आहेत.

## जलप्रवाह व धातुराग

रामगडवर व आसपास नदी, जलप्रवाह व प्रपात (धबधबा) हे तर अनेक आहेत. पर्वतावर चढतांना वाटेंत पाण्याचीं सुंदर सरोवरें लागतात. आणि तीं देखील कमळांनीं सुशोभित असतीं. त्यांचें ह्ल्दारांनीं केलेलें वर्णन मागें दिलेंच आहे. शिवाय वाटेंत अनेक छोट्या छोट्या नद्या व ओढे लागतात. (ह्ल्दार, पृष्ठ ३८२) वरच्या गूढरम्य गुहेंतला (कक्षविल) स्वच्छ व मधुर पाण्याचा निर्झर आपण पाहिलाच. शिवाय अगदीं डोंगरमाथ्यावर पठाराच्या कडेकडेनें वहाणारा एक नदीवजा ओढा आहे. तो उत्तरेकडे वहात जाऊन कड्यावरून स्फुटित-प्रवाहांनीं खालीं उडी घेतो. धबधब्याच्या या रमणीय दृश्याचें वर्णन पहा.

Entering by the gateway and skirting the edge of the table-land towards the North, we came on the northside to a larsiple piece of table ground about 200 ft. in width, through which a small river meandering, falling in cascades down the cliff, after reaching the edge of the table-land.

A Survey of India, Vol. XIII, p. 32.

यावरून कविवर्णनाप्रमाणें यक्षाला रामगडवरच्या हरिणींच्या डोळ्यांत आपल्या प्रियेच्या कटाक्षाची लकब आणि तिथल्या मोरांच्या पिसाऱ्यांत आपल्या प्रियेच्या केशभाराचा डौल व नखरा पहाता आला असेल यांत शंका नाहीं.तथापि शेवटच्या कल्मांतला एक नदीविषयक बारकावा लक्षांत घेण्याजोगा आहे. 'नदीवीचिषु भ्रूविलासान्' अशी कल्पना मांडली आहे. म्हणजे नदीच्या तरंगांत मला तुझा भ्रुकुटी-विलास दिसतो, असें यक्ष म्हणत आहे. पण येथें घातलेलें नदीतरंगांचें विशेषण मोठें सूचक आहे. 'प्रतनु नदीवीचिषु' म्हणजे लहान लहान नदीच्या तरंगांत. प्रतनु या शब्दाच्या बहुवचनामुळें 'लहान' या विशेषणाचा ओढा 'वीचिषु'कडे म्हणजे तरंगांकडे असला तरी त्याच्या अर्थाचा कांहीं अंश नदीकडे जातोच, हें *मार्मिकांच्या सहज लक्षांत येईल. एरवाधा रमणीचा भ्रुकुटी-भंग लहानशा तरंगां*तूनच प्रतीत होणार. आणि औचित्याच्या दृष्टीनें या लहानलहान लहरी किंवा तरंग लहानशा नदींतलेच हवेत. यक्षानें रामगिरीवर उत्कंठेनें पाहिलेली प्रतनु नदी म्हणजे रामगडच्या माथ्यावरून वाहणारी छोटी नदी होय.

२३. उत्तरमेघांतल्या ( श्लोक ४४ ) वर्णनाप्रमाणें या भागांत पावसाळ्याचे चार महिने सोडून उत्तरेकडून दक्षिणेकडे उलटे वारे वहातात. भूगोलाच्या पुस्तकांतील नकाशांत ही उलट गति बाणांच्या टोकांनीं दर्शविलेली असते. ती पहावी.

२४. आतां शेवटी एक मनोरंजक पण खात्री पटविणारें प्रमाण पहावयाचें आहे. विरहदुःखावर कांहीं अंशीं तोडगा म्हणून अथवा मनाला थोडा चाळा किंवा विरंगुळा म्हणून शिलेवर यक्ष धातुरागांनीं आपल्या प्रियेचें चित्र काढण्याचा उद्योग आरंभतो, असें उत्तर मेघाच्या ४२ व्या श्लोकांत दाखविलें आहे. हें वर्णन किंवा कल्पना अतिशयोक्त, अतिरंजित आणि केवळ रसपरिपोषाकरितां कवीनें डोक्यांतून काढली, असें सकृद्दर्शनीं वाटण्याचा संभव आहे. परंतु विस्मयाची व कौतुकाची गोष्ट ही कीं, कालिदासाची कल्पनाशक्ति निरंकुश असली तरी उच्छृंखल नाहीं. कालिदासाची ऐतिहासिक-भौगोलिक माहिती व वर्णनें अवास्तव किंवा काल्पनिक नसून बिनचूक व समर्पक असतात, असें अलीकडे उजेडांत येऊं लागलेल्या ऐतिहासिक साधनांवरून सिद्ध झालें आहे. ( प्रो. मिराशी : कालिदास पृ. ८८।८९ ) या कवीचा स्वैर प्रतिभाविहारहि सत्याच्या चतुःसीमेच्या आत असतो. त्याच्या वर्णनशैलीचें विमान विवक्षित वाट सोडून वाटेल तिकडे वाऱ्यावर वाहवत जात

नाहीं. रसिक पतिव्रतेची कामलीला देखील पतिनिष्ठ असते. त्याप्रमाणें कालिदासाची कविता किंवा कल्पकता वास्तवतेशीं काडीइतकीहि काडीमोड करीत नाहीं. त्याच्या कल्पनेचा नाच सत्यामोंवतीं हें त्याचें वैशिष्ट्य. म्हणूनच त्याचें काव्य हृदयाची पकड घेतें. वस्तुनिष्ठता आणि आत्मनिष्ठता किंवा सत्य आणि कल्पना यांचा इतका सुंदर व अविरोधी मिलाफ इतरत्र क्वचितच पहावयास सांपडेल.

कोणतीहि गोष्ट प्रत्यक्ष पाहिलेली, अनुभवलेली, पटलेली असल्याशिवाय कालिदास तिचें केवळ काल्पनिक व पाल्हाळिक वर्णन करीत नाहीं, याचें प्रस्तुतचा श्लोक हें एक उत्कृष्ट उदाहरण होय. कसें तें पहा त्या निर्जन डोंगरावर यक्ष चित्रें कशीं काढणार? शिला मिळेल पण हे धातुराग कुठले? मिराशी यांनीं रामटेकवरच्या तांबड्या दगडांची उपपत्ति दिली आहे ती कशी चुकीची आहे, हें मागें दाखविलें आहे. कारण दगड रंगानें दिसण्याला अगदीं लालभडक असला तरी शिळेवर तो तसा उठत नाहीं! असो. धातुराग म्हणजे डोंगरांत सांपडणारा खनिज नैसर्गिक रंग. तो ओलसर किंवा निदान पातळ करतां येण्यासारखा हवा. एरवीं चित्र कसें वठायचें? असे नैसर्गिक रंग रामगड पर्वतावर सांपडतात, एवढेंच नव्हे तर हें त्याचें वैशिष्ट्य आहे. पूर्वी येथील जोगिमारा गुहेंतील प्राचीन रंगीत चित्रांचें वर्णन दिलें आहे, तीं चित्रें या डोंगरांत सांपडणाऱ्या रंगांनींच रंगविलेलीं आहेत. तांबड्यापेक्षां पांढरा रंग येथें विपुल आढळतो. इतकेंच काय, येथील गरीब शेतकरी देखील आपल्या झोंपडीला या रंगांची वेलबुट्टी काढून भूषित करतो. अंगणांतहि याची चित्रविचित्र वेलपत्ती काढतात. मलयपर्वतांतल्या भिल्लिणींनें चंदनकाष्ठांचें चळण वापरावें त्यासारखाच हा प्रकार म्हणावयाचा. चित्रकार हलदार वर्णन करतात:

> The huts built by the korwas possess one peculiarity. Even the poorest cottager does not ommit these decorations. The people decorate their courtyards with coloured earth in pretty ornamental designs. They mostly use a kind of white indigenous colour which they get very easily from the earth.
>
> The red material does not appear to be very common here ... I believe the white paints used in the paintings were prepared from the indigenous white clay to which I have already referred. This white clay is obtainable in abundance in the cave above the high hill near the temple and it is used in preparing an ointment which is applied by devout pilgrims to their foreheads. [p. 381, 386]

एवढेंच नव्हे तर रामगड पर्वतावर जेथें हा तांबडा रंग विपुल सांपडतो त्या ठिकाणाला 'तिलक-माती' असें नांव पडलें आहे. चित्रकूटावर रामानें सीतेच्या भालप्रदेशीं याचा तिलक लावला होता, म्हणून हें नांव पडलेलें असावें—

स निघृष्यांगुलिं रामो धौते मनःशिलोचये
चकार तिलकं तस्या ललाटे रुचिरं तदा
बालार्कसमवर्णेन तेजसा गिरिधातुना

(अयो. सर्ग ९६·१८।१९)

हा सर्ग प्रक्षिप्त समजतात. पण हा उल्लेख संशयास्पद म्हणून सोडला तरी पुन्हा सुंदरकांडांत (४०·५) मनःशिलेच्या या तिलकाचा स्पष्ट उल्लेख आहेच. हनुमान् सीतेचा निरोप घेऊन रामाकडे परत जावयास निघतो त्या वेळीं सीता हीच खूण रामाला पटण्याकरितां सांगते.

मनःशिलायाः तिलको गंडपार्श्वे निवेशितः
त्वया प्रनष्टे तिलके तं किल स्मर्तुमर्हसि

हा उल्लेख तर स्पष्ट व निःसंदिग्ध आहे. रामगडावर मिळणाऱ्या याच लाल रंगाचा–मनःशिलेचा तिलक रामचंद्रानें सीतेच्या कपाळीं लावला, यांत शंका नाहीं आणि म्हणूनच त्या जागेला 'तिलक-माती' हें नांव शेंकडों वर्षांपासून परंपरेनें चालत आलें आहे आणि म्हणूनच शेंकडों यात्रेकरू प्रतिवर्षी तेथें दर्शनाला जातात तेव्हां आदरानें व भक्तीनें तेथल्या त्या लाल मातीचा तिलक आपल्या कपाळीं लावतात.

सारांश, रामगडावर यक्षाला आपल्या प्रियेचें चित्र काढण्याकरितां हे धातुराग मुबलक होते, हे धातुराग किंवा रंजकद्रव्यें येथील वैशिष्ट्य असल्यामुळें रामगडाबाबत शंका रहात नाहीं. हें शेवटचें प्रमाण सूक्ष्म पण वैशिष्ट्यपूर्ण आणि विश्वास पटविणारें आहे.

चित्रकूटावर सीतेच्या कपाळीं तिलक लावल्याचे हे उल्लेख प्रक्षिप्त मानले तरी त्यांत महत्त्व आहे. कारण, प्रक्षेपकांनीं जी ही नवीन कल्पना रचून घातली ती येथें तिलक लावण्याजोगी लाल माती किंवा रंग आढळतो म्हणूनच घातली हें उघड आहे. नकली किंवा बनावट (प्रक्षिप्त या अर्थानें) करावयाचें तें खऱ्यासारखें दिसेल आणि खरें म्हणून पचेल अशा हिशेबानें व हेतूनेंच केलेलें असतें!

## पशुपक्ष्यांची साक्ष

रामगिरीच्या चोवीस खुणा रामटेकशीं जुळत नाहींत. रामगडशीं मात्र खात्रीलायक रीतीनें जमतात हें दाखविलें. आतां रामटेकची असंभवनीयता दाखविणारे एक पशुपक्ष्यांचें सूक्ष्म पण बळकट प्रमाण पहा. रामगड भाग म्हणजे छत्तीसगड किंवा छोटा नागपूर प्रांत (हल्लींचा मध्यप्रदेश). हा प्राचीन काळापासून हत्तींकरितां प्रसिद्ध आहे. आजहि तेथें हत्ती सापडतात. त्याचप्रमाणें मेघदूतात वर्णिलेले विविध पशुपक्षी. रामटेक अगर त्याच्या परिसरात ही प्राणिसंपत्ति नाहीं. त्याचप्रमाणें रामगडहून हिमालयाकडे जाणाऱ्या मेघाला हंस व बलाक पक्षी प्रवासात सोबत करतील, असें कालिदासानें वर्णिलें आहे.

संपत्स्यन्ते नभसि भवतो राजहंसाः सहायाः ( श्लोक ११ )
सेविष्यन्ते नयनसुभगं खे भवन्तं बलाकाः ( श्लोक ९ )

आतां हंस व बलाक हे पक्षी महाराष्ट्रांत म्हणजे नर्मदेच्या दक्षिणेला कधींच येत नाहींत. त्यांचा सगळा कारभार नर्मदेच्या उत्तरेला चालतो. पावसाळा सुरू झाला, कीं यांच्या शेंकडोंच्या टोळ्या संततिव्यवहाराकरितां उत्तरेकडे व भारता-च्याहि पलीकडे हजारो मैल जातात आणि शरद् ऋतूंत परत येतात. ही मंडळी मूळ भारतांतील रहिवासी नव्हेच. हे पाहुणे आहेत. ऋतुसंहारांत (३·८) विंध्य-पर्वतांतील हंस, कादंब इत्यादि पक्ष्यांनी गजबजलेल्या नद्यांचें मनोहर वर्णन आहे. त्याला उद्देशून डॉ. आपटे 'पक्षिदर्शन' या पुस्तकात लिहितात :

हा समग्र देखावा पाहण्याकरितां आपणांला नर्मदा ओलांडली पाहिजे. नर्मदेच्या दक्षिणेला हंस दिसणें नाहीं. कादंब दिसणें मुद्दां कठीणच (पृष्ठ १२). *महाराष्ट्रांत बलाकपक्षी सहसा दिसत नाहींत* (पृष्ठ ६१).

तात्पर्य, मेघदूतांतील सर्व देखावा नर्मदेच्या पलीकडचा असून दक्षिणेकडचा नाहीं. अर्थात् हें वर्णन रामटेकचें संभवत नाहीं. पशुपक्ष्यांची साक्ष देखील राम-टेकच्याविरुद्ध आहे!

रामगिरीचीं चोवीस लक्षणें वरीलप्रमाणें समर्पक रीतीनें जुळत असल्यानें रामगड हाच रामगिरि, याबद्दल शंका रहात नाहीं (याबाबतचें तौलनिक कोष्टक मागील प्रकरणाच्या शेवटीं परिशिष्ट १ मध्यें दिलें आहे तें पहावें). तथापि या सर्वांपेक्षांहि एक बलवत्तर व सर्वसंशयोच्छेदक प्रमाण आम्ही पुढील तीन प्रकरणांत सादर करणार आहोंत. रामगड हाच प्राचीन चित्रकूट हें आम्हीं मुख्यतः रामायणावरून, इतर प्राचीन ग्रंथांच्या आधारें व खुद्द कालिदासाच्या रघुवंशांतील वर्णनावरून पुढें दाखविलें आहे. *हाच रामगिरित्वाचा सर्वांत प्रबळ असा पुरावा होय.*

सारांश, रामगडचा तोंडावळा रामगिरीशीं जुळतो हें आपण पाहिलें. कालि-दासाच्या रामगिरि-वर्णनाचा कपडा रामगड पर्वताला बिनचूक बेतून शिवल्यासारखा बसतो. पुढें आपल्याला चित्रकूटाकडे वळावयाचें आहे. अर्थात् त्याकरितां आप-ल्याला हें स्थान सोडण्याची जरूर नाहीं कारण हाच चित्रकूट आहे! आतां एवढेंच कीं, त्यावर कालगतीचीं पुटें बसल्यामुळे तो आपल्याला ओळखूं येत नाहीं. तो दिसण्याकरितां फक्त जुन्या काळाचा चष्मा डोळ्यांवर चढवावयास हवा. पण त्याच्या आधीं प्रो. मिराशी यांनीं रामगडवर दोन आक्षेप उपस्थित केले आहेत, त्यांचें निरसन करून हें प्रकरण संपवूं.

## रामगडवरील आक्षेपांचें निरसन

मिराशींचा रामगडवर मुख्य आक्षेप हा कीं, 'हें स्थान मेघदूतांतील वर्णना-प्रमाणें आम्रकूट (अमरकंटक) व नर्मदा नदी यांच्या दक्षिणेस नसून ईशान्येस आहे.'

कोणीं सांगितलें तुम्हांला रामगिरि यांच्या दक्षिणेला आहे म्हणून ? मेघदूतांत *तसा आधार नाहीं. शिवाय रामगड नर्मदेच्या किंवा अमरकंटकाच्या ईशान्येस* आहे असें म्हणणें बरोबर किंवा न्यायाचें होणार नाहीं. स्थूलमानानें सांगावयाचें तर रामगड पर्वत त्यांच्या पूर्वेकडे आहे असेंच म्हणावें लागेल -- आणि तसेंच आपण म्हणतोंहि. नकाशाकडे सहज एक दृष्टि टाकली तरी हें पटेल.' कवि काव्यांत स्थळांचें वर्णन करतो तें फूटपट्टी किंवा कोन-मापक घेऊन करीत नाहीं. अंतर व दिशा यांचें दोरीसूत माप देणें हें काम रसलोलुप कवीचें नसून रूक्ष गणितज्ञाचें आहे. कवीचें माप व सूत्र निरालेंच असतें. तथापि अगदीं भूमितीच्या काटेकोर भाषेंत बोलावयाचें म्हटलें तरी देखील रामगड अमरकंटकाच्या पूर्वरेषेपासून वर फक्त १८ अंशांवर आहे. प्रत्यक्ष एंजिनीयर घेतला तरी तो सुद्धां अगदीं शास्त्रीय किंवा कायदेशीर दृष्टीनें देखील याला ईशान्य म्हणणार नाहीं ! दुसरें नर्मदेबद्दलचें विधान. रामगड नर्मदेच्या ईशान्येला आहे असें म्हणणें म्हणजे मात्र शुद्ध न पचणारें धाडस होय. हा विपर्यास आहे हें एखादा शाळकरी मुलगा देखील नकाशावरून सांगेल ! सारांश, संशोधनाच्या शुद्ध बाजारांत अशी वंचना उपयोगी नाहीं. असो. अमरकंटक रामगडच्या पश्चिमेला पण जरा खालीं ( १८ अंशांवर ) आहे म्हणून तर कवीनें किंचित् पश्चात् ( = कांहींसें पश्चिमेकडे आणि मागें ) असा मोठा खुबीदार श्लिष्ट शब्दप्रयोग वापरला आहे. उलट यांत कालिदासाचें चातुर्य व श्रेष्ठत्व दिसून येतें. नकाशांत पाहिलें तर स्थूलमानानें रामगड, अमरकंटक, नर्मदा व भिलसा हीं सर्व स्थळें सामान्यतः पूर्व-पश्चिम अशा सरळ रेषेंत येतात, हें स्पष्ट दिसतें. आणि म्हणूनच मेघदूतातील वर्णनाला रामगड यथास्थित जुळतो.

प्रोफेसरमजकुरांची रामगडला असलेली दुसरी हरकत तर याहून मौजेची आहे !

" शिवाय हें ठिकाण अत्यंत बिकट ठिकाणीं निर्जन अशा प्रदेशांत आहे. तेथें हत्तीवरून जातांना आपणांस किती श्रम पडले, याचें सविस्तर वर्णन बंगाली चित्रकार श्रीयुत असित हलदार यांनीं 'मॉडर्न रिव्ह्यू'च्या अंकांत प्रसिद्ध केलें आहे. अशा ठिकाणीं यक्षाला रहावयाला लावण्यांत कालिदासाचा कोणता हेतु होता, हेंहि ध्यानांत येत नाहीं. तेव्हां रामगड हा रामगिरि असणें शक्य दिसत नाहीं. " [ सं मु. पृ. ५९ ]

कालिदासाचा हेतु ध्यानांत येतो. पण या आक्षेपांतील मिराशींचा हेतु मात्र चटकन् ध्यानांत येत नाहीं ! अलकेंतून निर्वासित होऊन आपलें माहात्म्य संपुष्टांत आलेला ( अस्तंगमितमहिमा ) ज्याला Crest-fallen म्हणतां येईल असा पदभ्रष्ट विरहव्यथित जो यक्ष--त्यानें एकांतस्थळीं जाऊन रहावयाचें नाहीं तर मग कुठें शहरांत जाऊन रहावयाचें ? ही कल्पनासुद्धा रसिकांना सहन होणार नाहीं. असें कालिदासानें दाखविलें असतें तर तो कालिदास झाला नसता ! औचित्य हा कालिदासाच्या महाकवित्वाचा एक महत्त्वाचा पैलू आहे. शाकुंतलांत गुणी व निष्पाप

शकुंतलेला दुष्यंतराजाच्या दरबारांतून अवमानित होऊन खालच्या मानेनें परत यावें लागलें. पण कालिदास त्या नव्या शकुंतलेला जुन्या कण्वाश्रमांत परत आणीत नाहीं. तिला पुन्हा कण्वाच्या आश्रमांत जागा देण्यांत जी चूक झाली असती तशीच चूक यक्षाला एखाद्या संपन्न शहरांत किंवा विलासस्थळीं नेण्यांत झाली असती, यक्षाला शाप होता–शिक्षा होती. त्याचा पूर्ववृत्तान्त आपल्याला माहीत नाहीं म्हणा. तथापि तोंपर्यंत पत्नीचा विरह कसा तो त्याला माहीत नसावा. त्या आघाताखालीं त्याच्या मनाचा आणि यौवनाचा चुराडा व कोंडमारा झाला होता. पण त्याहीपेक्षा अधिकारच्युतीचें आणि हद्दपारीचें शल्य त्याच्या अंतःकरणाला अधिक टोंचत असलें पाहिजे. प्रेमिकाला प्रिया-विरह आणि मानी मनुष्याला अपमान यापेक्षां अधिक दुःसह प्रसंग तो कोणता? पण मनींची व्यथा सांगायची कुणाला? कुणाला तोंड दाखविण्याची सुराणी नव्हती व इच्छाहि नव्हती. यक्षाच्या मन:स्थितीला अनुरूप म्हटलें म्हणजे एखादें एकांतवासाचें स्थळ हेंच होय आणि कालिदासानें तेंच पसंत केलें. म्हणूनच तो महाकवि आणि म्हणूनच मेघदूत लघु असूनहि महाकाव्य!

वाल्मीकीनें हेंच केलें. रामायणांत भरद्वाज ऋषीनें रामाला गंगा-यमुनांच्या संगमावर असलेल्या आपल्या आश्रमांत सुखानें राहण्याची प्रार्थना केली होती पण रामानें ती नाकारली. रामाला एकांतवास हवा होता. लोकांचा–जाणान्यायेणान्यांचा संपर्क नको होता.

> आगमिष्यति वैदेहीं मां चापि प्रेक्षको जनः
> अनेन कारणेनाहमिह वासं न रोचये
> एकांते पश्य भगवन् आश्रमस्थानमुत्तमम्
> अयोध्याकांड सर्ग ५४·२४।२५

राम म्हणाला, आम्हांला एकांतस्थळ सांगा. लोकांची ये-जा आणि विचारपूस नको. विमनस्क स्थितींत प्रिय जनांचा सहवास सुद्धां नकोसा होतो, हें त्यांतलें इंगित आहे. हें जाणून घेऊनच भरद्वाजानें रामाला चित्रकूटाची शिफारस केली. व्यथित व निर्वासित रामचंद्राप्रमाणें यक्षाला देखील जनसंपर्कापासून दूर असें निवांतस्थळच योग्य. आणि म्हणूनच कालिदासानें रामायणांतल्याप्रमाणें नुसती तशीच नव्हे, तीच जागा यक्षाला राहण्याकरितां दिली! शिवाय रामगडला निर्जन प्रदेशांतील स्थळ म्हणण्यांत मिराशींनीं अतिशयोक्ति केली आहे. एकूण असें एकांत स्थळ शापग्रस्तयक्षाच्या निवासाकरितां पसंत करण्यांत कालिदासानें मनोज्ञ औचित्य प्रकट केलें आहे. पण तें मिराशींना पसंत नाहीं! नावडतीचें मीठ आळणी, दुसरें काय? मिराशींच्या दोन्ही आक्षेपांत तथ्य नाहीं.

रामगड पाहिला. मेघदूताच्या चष्म्यांतून तोच रामगिरि, हेंहि पाहिलें. आतां रामायणाच्या लांब पल्ल्याच्या दुर्बिणींतून पाहूं. म्हणजे तोच चित्रकूट दिसूं लागेल! तें पुढील प्रकरणांत.

* * *

## स्रोत ३ रा

# हल्लींचा तोतया चित्रकूट

धारास्वनोद्गारिदरीमुखोऽसौ शृंगाग्रलग्नांबुदवप्रपंकः ।
बध्नाति मे बंधुरगात्रि चक्षुः। दृप्तः ककुद्मानिव चित्रकूटः ॥

—कालिदास ( रघुवंश १३·४७ )

आतांपर्यंत रामगिरि कोणता, हा प्रश्न मेघदूतांतील अंतर्गत पुराव्याच्या आधारानें सोडविला. रामगड हाच रामगिरि. आतां चित्रकूट कोणता ? या प्रश्नाचा निर्णय करावयाचा आहे. पूर्वी सूचित केल्याप्रमाणे सदरचा मध्यप्रदेशांतील विंध्य पर्वतराजींतला रामगड म्हणजेच प्राचीन चित्रकूट होय, हा सिद्धान्त पुढील प्रकरणांतून मांडावयाचा आहे. पण त्यापूर्वी शास्त्रीय पद्धतीप्रमाणें हल्लीं समाजात तो चित्रकूट कसा चुकीचा आहे, हें दाखविलें पाहिजे.

मेघदूताच्या क्षेत्रांत ज्याप्रमाणें रामटेकचें त्याचप्रमाणें 'रामायणाच्या प्रांतात हल्लींच्या चित्रकूटाचें बस्तान बसलें आहे! तथापि हीं दोनहि स्थळें चुकलेलीं असून इतराना चुकवीत आहेत! हल्लींचा चित्रकूट म्हणजे कामताजवळचा (प्रयागच्या खालीं पण पश्चिमेकडे असलेला बुंदेलखंडातील) डोंगर, असें आतां[1] विद्वानांनीं ठरविलें आहे. हा हवाला देऊन (सं. मु. पृष्ठ ५७) त्या आधारावर प्रो. मिराशी यांनीं आपलीं काहीं अनुमानें रचलीं आहेत. यावरून चुकीचा असला तरी वहिवाटीचा हक्क हळूहळू कसा प्रस्थापित होत जातो हें दिसून येतें. तथापि जितका रामटेक चुकीचा, तितकाच आधुनिक चित्रकूट चुकीचा, हें लवकरच समजून येईल. रामायणातील सुप्रसिद्ध चित्रकूट हा उत्तुंग, भव्य, उंच शिखर असलेला एक विस्तीर्ण व जबरदस्त पर्वत आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. असेंच त्याचें वर्णन रामायणात, इतर पुराणांत, बौद्ध व जैन वाङ्मयात आणि खुद्द कालिदासाच्या काव्यांत आलेलें आहे. त्याबाबत दुमत नाहीं. आता बुंदेलखंडातील **हल्लीं समजण्यांत येतो तो चित्रकूट पाहिला तर तो रामटेकप्रमाणेंच एक सौम्य, ठेंगणा व वैशिष्ट्यविहीन** डोंगर आहे! शिवाय तोहि **शिखरहीन व सपाट माथ्याचा** आहे. (नक्की ठिकाण अक्षांश-रेखांश २५×८१ हल्लींच्या चित्रकूट रेल्वे स्टेशन-पासून सुमारें ४ मैलावर.) तो केवळ यमुनेला बराचसा जवळ आहे एवढ्या एकाच गोष्टीवर त्यानें विद्वानांकडून चित्रकूटत्वाचें वारसा-सर्टिफिकेट एकदा

[1] प्रथम हें मत पार्जिटर साहेबानें १८९४ मध्यें (J.R.A.S.) पुढें मांडले.

मिळवून ठेवलें आहे! आणि तीच समजूत हल्लीं लोकांत प्रचलित झाली आहे! कोणाचें माहात्म्य कसें वाढेल हें सांगतां येत नाहीं. समाजांत ज्याप्रमाणें मलत्याच व्यक्तींना कधीं कधीं मलतेंच स्थान मिळून जातें, त्याप्रमाणें इतिहासक्षेत्रांतहि चुकीच्या व अयोग्य स्थळांना नसलेलें महत्त्व प्राप्त होतें! स्थळ निश्चित करण्याचीं प्रमुख साधनें दोनच : वर्णन व दिशा. त्यांपैकीं पहिलें प्रथम घेवूं. दुसरें पुढच्या प्रकरणांत.

## चित्रकूटाचें प्राचीन वर्णन

### (अ) रामायण

रामायण-अयोध्याकांड-सर्ग ५४ ते १०९ यांमध्यें चित्रकूटाचें वर्णन सुमारें नऊ-दहा ठिकाणीं सविस्तर आलेलें आहे. त्याचें वाचकांच्या सोयीकरितां बनविलेलें कोष्टक पुढील पानावर छापलें आहे.

ह्या संस्कृत कोष्टकाचा मराठींत क्रमवार गोषवारा असा :

१ एकान्त स्थळ.

२ रमणीय व उत्कृष्ट दिसणारा.

३ उंच, भव्य व पवित्र. (गंधमादनतुल्य किंवा कैलासशिखरासारखा शोभणारा, हिमालयासारखा). .

४ अनेक उंच शिखरें.

५ गर्द झाडी, दाट अरण्य, विशाल व विविध वृक्ष.

६ नाना तऱ्हेचे वन्य पशु.

७ मोर, हत्ती व हरिण यांचे कळप.

८ नाना प्रकारचे पक्षी.

९ महर्षिसेवित, ऋषींचे आश्रम, पर्णकुटिका, पुण्यभूमि.

१० नदी, जलप्रवाह, जलप्रपात, झरे.

११ गुहा.

१२ यक्षकिन्नराचरित देश.

१३ दोन नद्या – मंदाकिनी व मालिनी.

१४ सोसाट्याचा वारा (जणूं शिखरांना गदगदां हलविणारा).

१५ चित्रकूटाचें शिखर मुळकेवजा असून जणूं जमीन फोडून वर निघालें आहे, असा भास होतो. सर्व बाजूंनीं सहज दिसावें इतकें उंच .

१६ नाना तऱ्हेचीं लता – पुष्पें व विपुल कंदमुळें-फळें.

आतां या मूळ संस्कृत उल्लेखांचें कोष्टक पुढील पानांवर पहा—

रामायण

चि त्र

| सर्ग ५४ | श्लोक | सर्ग ५६ | श्लोक | सर्ग ९३ | श्लोक |
|---|---|---|---|---|---|
| एकान्ते आश्रमस्थानम् | २६ | | | नीलवन | ८ |
| पुण्यः | २८ | चित्रकूटस्य पुण्य- | | मंदाकिनी नदी | ८ |
| | | कानने | ११ | निष्कूजम् (=एकान्त) | १४ |
| महर्षिसेवितः | २८ | मुनयः महात्मनः | १५ | घोरप्रदर्शनम् (निबिड) | १४ |
| येथून महर्षि सदेह स्वर्गा- | | | | शीघ्रं अनिलः वहति | १५ |
| ला जातात | ३१ | | | नाऽमनुष्ये... | २२ |
| कल्याणानि शृंगाणि | ३० | प्रवृद्धशिखरम् | १० | स्वर्गपथः इव | १८ |
| (बहुवचन) | | | | तापसानां निवासः | १८ |
| शुभदर्शनः | २८ | मनोरमम् | १२ | सानूनि रम्याणि | ९ |
| | | रम्यः | १४ | अतिमात्रं मनोज्ञः | १८ |
| | | रम्यं | १३ | | |
| गंधमादन-संनिभः | २९ | मनोज्ञः | १४ | | |
| गोलांगुलानुचरितः | २९ | स्वाजीवः | १४ | ऋक्षः | २ |
| वानरर्क्षनिषेवितः | २९ | बहुमूलफलं | १३ | | |
| मधुमूलफलोपेतम् | ३८ | बहुमूलफलः | १४ | | |
| नानानगगणोपेतः | ३९ | समभूमितलेरम्ये<br>द्रुमैर्बहुभिरावृते | ११ | नगाः (फुलांचा खच) | १० |
| किन्नरोरगसेवितः | ३९ | | | किन्नराचरितं देशं | ११ |
| मयूरनादाभिरुतः | ४० | नानापक्षिगणायुतम् | १३ | बर्हिणः प्रियदर्शनान् | १७ |
| | | नानाद्रुमलतायुतः | १४ | | |
| गजराजनिषेवितः | ४० | मातंगयूथानुसृतं | १० | मत्ताः यूथपाः | १ |
| कुंजरयूथानि | ४१ | | | | |
| कुंजर | ४३ | | | | |
| मृगयूथानि | ४१ | संपन्नसरसोदकं | १३ | शीघ्रवेगाः मृगगणाः | १२ |
| सरित्प्रस्रवणप्रस्थान् | | | | बहवः पृषताः मृगाः | |
| दरीकंदरनिर्झरान् | ४२ | पक्षिसंघानुनादितं | १० | (मृगीभिः सह) | १९ |
| मत्तैः मृगैः (wild | | | | (spotted antelope) | |
| beasts) कोयष्टिभ | | | | पतत्रिणां अधिवासं | १७ |
| कोकिल | | | | | |

अयोध्याकांड

# कूट

## सर्ग ९४

| | श्लोक |
|---|---|
| जलप्रपात | १३ |
| उद्भेद | |
| निष्पंद | |
| स्रवद्भिः | |
| गुहासमीरणः (सुगंधितः) | १४ |
| विशालाः शैलाः शोभन्ते | २० |
| कामिनां स्वास्तरान् | २४ |
| खनू इव उद्विद्धैः शिखरैः धातुमद्भिः | ४ |
| विचित्रशिखरे | १६ |
| भित्त्वेव वसुधां भाति... | |
| कूटोऽयं दृश्यते सर्वतः शुभः | २३ |
| रमणीय | ३ |
| शैलप्रस्थेषु रम्येषु | ११ |
| रम्ये | १६ |
| ऋक्षगणैः वृतः (अदुष्टैः) | ७ |
| बहुपुष्पफले | १६ |
| बहुमूलफलोदकः | २६ |
| पुष्पवद्भिः फलोपेतैः छायावद्भिः | १० |
| कामहर्षणान् किन्नरान् | ११ |
| विद्याधरस्त्रीणां क्रीडोद्देशान् | १२ |
| नानाद्विजगणायुते | १६ |
| बहुपक्षिसमाकुलः | ७ |
| नानाद्विजगणायुतं | ४ |
| नानामृगगणैः द्वीपि + तरक्षु | ७ |

## सर्ग ९५

| | श्लोक |
|---|---|
| शैलापासून दूर मंदाकिनी नदी | १ |
| मंदाकिनीं विगाहस्व | १३ |
| ,, ,, | १४ |
| जटाजिनधराः ऋषयः | ६ |
| सिद्धजनाकीर्णाम् | ९ |
| विधूतकल्मषैः तपोदमशमान्वितैः सिद्धैः | १३ |
| मारुतोद्धूतशिखरैः प्रनृत्त इव | ८ |
| (=शिखरें (बहुवचन) व सोसाट्याचा वारा) | |
| चित्रकूटस्य दर्शनं पुरवासात् | |
| आधिकं मन्ये | १२ |
| नयनांजनप्रभं | १९ |
| नानाविधैः तीररुहैः पुष्पफलद्रुमैः | ४ |
| गजयूथलोडितां | १८ |
| मृगयूथनिपीतानि | ५ |
| निपीततोयां गजसिंहवानरैः | १८ |

## सर्ग ९८-९९-१०३

| | श्लोक |
|---|---|
| **सर्ग ९८** | |
| सुशुभः | १२ |
| गिरिराजसमः (हिमालयासारखा) | १२ |
| पुण्यजनोपपन्नं | १ |
| (भरतः) रामाश्रमं जगाम | |
| **सर्ग ९९** | |
| तापसालयसंस्थिता (पर्णकुटी) | ४ |
| उदाग्रदंतानां कुंजराणां | ११ |
| तरस्विनां शैलपार्श्वे परिक्रांतं अन्योन्यप्रतिगर्जितम् | |
| **सर्ग १०३** | |
| गुहागिरीनाम् | ४९ |

## ( ब ) जैन व बौद्ध वाङ्मय

पालींत चित्तकूट अतिशय रमणीय, देखणा व पवित्र (पद्मपुराण प्र. २१ तीर्थमाहात्म्य) जैनांच्या भागवती टीकेंत चित्तकूड म्हणून उल्लेख. रमणीय व निर्दोष स्थळ (जातक २·१७६ व ६·१२६). त्यांत एक सुवर्णगुहा[१] व नैसर्गिक जलाशय होता (जातकग्रंथ).

हा रमणीय पर्वत त्यांतील सुवर्णगुहेंत राहणाऱ्या हंसांचें वसतिस्थान होतें. त्यातले कांहीं वेगवान् व कांहीं सोन्याचे अथवा सोनेरी होते. (जातकग्रंथ क्र. २, ५ व ६).

नीतीच्या परिपालनाकरितां तेथें जा, असें सांगितल्यावरून प्रजानुरंजनाकरितां एक राजा चित्तकूड पर्वतावर गेला असें जातकग्रंथांत (५·३५२) म्हटलें आहे. रामायणांतील रामकथेंत फिरवाफिरव करून ही जातककथा रचली असावी असा वास येतो. बौद्ध प्राचीन ग्रंथांनीं पुष्कळ ठिकाणीं हिंदु कथाचें असें विकृतीकरण केलें आहे.

चिंताहरण चक्रवर्ती यांनीं जैनांच्या पद्मपुराणाचा बंगालींत गोषवारा प्रसिद्ध केला आहे. रामलक्ष्मण मालवदेशांतील चित्रकूटाच्या पायथ्याशीं आले व तेथें अरण्य इतकें घनदाट होतें कीं, माणसांची वस्ती शोधून काढणें कठीण होतें, असें त्यांत *वर्णिलें* आहे. (यांतील *'मालव'* देशाचा *'माल'* क्षेत्राशीं संबंध असावा. पूर्वी मालव देशाची व्याप्ति बरीच पूर्वेकडे म्हणजे रामगडपर्यंत होती, असें दिसतें.)

## (क) पुराणें व इतर ग्रंथ

—महाभारतांत चित्रकूटाचा व जवळच्या मंदाकिनी नदीचा उल्लेख (८५.५८।५९) आहे.

—भागवतपुराणांत चित्रकूटाला पर्वत (१९.१६) तर ललितविस्तरांत टेकडी म्हटलें आहे.

—भवभूतीच्या उत्तररामचरितांत चित्रकूट पर्वताकडे यमुनेच्या कांठानें जाणाऱ्या रस्त्याचें वर्णन आहे. (१·२४)

टिकठिकाणचीं प्राचीन वर्णनें वर संकलित करून दिलीं आहेत. त्यांतील सूर एकच आहे. त्यावरून चित्रकूटाचा डौल व स्वरूप यांची सहज अटकळ येईल.

---

१ सुवर्णगुहा : कस-विल हीच हाथिफोड गुहा. तिलाच बौद्धांनीं सुवर्णगुहा म्हटलें आहे (प्रकरण पांचवें पहा.)

विशेषतः रामायणांतलें वर्णन तर इतकें तपशीलवार, निःसंदिग्ध व समर्पक आहे कीं, त्याच्याशीं समरस झाल्यावर चित्रकूट आणि त्याचें उंच शिखर सहज डोळ्यांपुढें उभें राहील. विशेषतः अयोध्याकांडाच्या ९४ व्या सर्गांतील चित्रकूटवर्णनांत रामगडचा तोंडावळा स्पष्ट दिसतो. या वर्णनावरून अंदाजलेला चित्रकूट रामगडशीं कसा चपखल जुळतो, हें सहज लक्षांत येईल. जुळणारच. कारण हल्लींचा रामगड हाच प्राचीन चित्रकूट होय.

## वेंठा, बोडका व विनशिखराचा डोंगर

आतां हल्लींच्या चित्रकूटाची सूरत पहा. पहिली गोष्ट ही कीं, या बुंदेलखंडांतल्या टेकडीमध्यें चित्रत्व नाहीं आणि कूट म्हणजे शिखरहि नाहीं! ही सपाट माथ्याची एक सौम्य टेकडी आहे. त्याला शिखरच नाहीं तेव्हां तें चित्रविचित्रित असण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. हा नांवालासुद्धां चित्रकूट म्हणतां येत नाहीं! कपलाचा वाळा घालून मिरविणारी ही सोनुबाई आहे! यावर वृक्ष अगर झाडेंझुडपें नाहींत. फक्त गवत वाढतें. या पांचपोंफुटी शिखरहीन बोडक्या टेकाडाला विंध्य-हिमालय पाहिलेल्या आर्यांकडून चित्रकूट हें प्रौढ नांव कधींकाळीं तरी मिळालें असेल असें वाटत नाहीं.

रामायणांत वर्णिलेल्या घटना येथें घडलेल्या असणें संभवनीय नाहीं. दाक्षिण्यबुद्धीनें देखील हा डोंगर रमणीय असें म्हणतां यावयाचें नाहीं. मन्दाग्नि आणि उंची तर बाजूलाच राहिली. याखेरीज आम्हीं पहिल्या प्रकरणांत दाखविल्याप्रमाणें रामगिरि ठरूं शकेल तोच खरा चित्रकूट. ही अट हा तथाकथित चित्रकूट पुरी करूं शकत नाहीं. कारण इथें रामगिरीची गांठ आहे! रामटेक जसा चित्रकूट नव्हे म्हणून रद्द ठरवितां येईल त्याचप्रमाणें हा चित्रकूट रामगिरि होऊं शकत नाहीं म्हणून निकालांत निघतो. 'किंचित् पश्चात् मज' या उल्लेखानुळें नर्मदेच्या (किंवा विंध्याच्या) दक्षिणेकडील व उत्तरेकडील सर्व डोंगर बाद होतात. रामगिरि नर्मदेच्याच ओळीला, नर्मदेच्या पूर्वेला हवा. हा डोंगर तसा नाहीं. सबब तो रामगिरि नाहीं आणि म्हणूनच चित्रकूटहि नाहीं.

सारांश, रामायणांतील चित्रकूट आणि आधुनिक चित्रकूट यांच्यामध्यें विलक्षण तफावत आहे, त्यांच्यामध्यें कोणतेंच साम्य नाहीं. त्यांच्यांतील विरोध स्पष्टपणें लक्षांत येण्याकरितां पुढें दिलेलें तुलनात्मक कोष्टक पहा. त्यांत फक्त कांहीं ठोबळ गोष्टी नमूद केल्या आहेत. शिवाय तिसरें रामगडचें सदर मुद्दाम जोडलें आहे, म्हणजे जातां जातां चित्रकूटाचीं लक्षणें रामगडशीं कशीं तंतोतंत जुळतात, हेंहि सहजच लक्षांत येईल. एका नजरेंत दोन कामें होतील.

| रामायणांतील चित्रकूट | हल्लींचा चित्रकूट | रामगड |
|---|---|---|
| १ उंच, खूप उंच-शिवाय गगनचुंबी विचित्र शिखरें. भव्य व प्रेक्षणीय. | फारच ठेंगणा, सुमारें ५०० फुटांच्या आंत-माथा सपाट, शिखर नाहीं-दिसण्याला अगदीं सामान्य, वैशिष्ट्यहीन. | ३२०० फूट उंच-गगनचुंबी विलक्षण सुळका. भव्य आणि देखणा. |
| २ नदी, जलप्रवाह, डोंगरमाथ्यावर पठार (Table Land) आणि दरीकंदर-निर्झर म्हणजे डोंगरांतील गुहेंतून वहाणारा झरा (सरित्प्रस्रवणप्रस्थान् दरीकंदरनिर्झरान् अयोध्या. ५४·४२) | डोंगरावर जलप्रवाह नाहीं, पठार नाहीं, गुहा नाहीं. अर्थात् गुहेंतून वहाणारा झराहि नाहीं. | जलप्रवाह, धबधबा-माथ्यावर पठार (Table Land) गुहेंतून वहाणारा रम्य निर्झर. |
| ३ ऋक्षबिल ही अद्‌भुत व नैसर्गिक गुहा. | गुहा नाहीं. | हाथिफोड चमत्कृतिपूर्ण स्वाभाविक गुहा. |
| ४ अनेक लहानमोठ्या जलप्रवाहांमुळें मद पाझरणाऱ्या हत्तीसारखा दिसणारा. | पाणी नाहीं. | अनेक जलप्रवाहांनीं युक्त व भिजणारा. |
| ५ घनदाट वृक्षांचें अरण्य. | मोठाले वृक्ष अथवा जंगल नाहीं. जवळ-जवळ बोडका. फक्त झुडपें व रानगवत उगवणारा. | मोठाल्या प्रचंड वृक्षांचें दाट जंगल. |
| ६ चित्रकूटाच्या रस्त्यावर वणवे नाहींत (दावैश्चैव विवर्जितः। अयो. ५५·९) | मोठमोठाले वणवे सदैव लागतात. | वणवे नाहींत. |
| ७ चित्रकूटाच्या उत्तर चढावर एक रम्य गुहा. | गुहा नाहीं. | सीताबेंगरा नांवाची गुहा रामगडच्या उत्तर चढावरच आहे. |
| ८ रानांतल्या हत्तींचे कळप. | हत्ती नाहींत-असणें शक्य नाहीं. कारण हत्तींना राहण्यासारखें दाट किंबहुना विरळ सुद्धां जंगल येथें नाहीं. | जंगली हत्ती अद्यापहि आहेत. |

| रामायणांतील चित्रकूट | हल्लींचा चित्रकूट | रामगड |
| --- | --- | --- |
| ९ मंदाकिनी नदी उत्तरेला. | पयोष्णी नदी पूर्वेच्या बाजूला आहे. | रूहर नदी रामगडच्या उत्तरेलाच वहाते. |
| १० नानाविध हरिणांचे कळप-चित्रांग म्हणजे ठिपक्यांचेसुद्धां. | हरिणें नाहींत-असणें शक्य नाहीं. | विविध जातींच्या हरिणांचे कळप, विशेषतः ठिपक्यांचे हरिण अद्यापिहि आहेत. |
| ११ धातुराग[3] ( मनःशिलायाः तिलकम् ). | धातुराग नाहींत.` | धातुराग अजूनहि विपुल सांपडतात. |

१ हें प्रमाण व त्याचें कारण मोठें मनोरंजक आहे. बेगलर साहेबांनीं याबाबत आपला स्वतःचा अनुभव लिहून ठेवला आहे. ( A. R. S. XIII ) अलाहाबाद म्हणजे प्रयागहून हल्लींच्या चित्रकूटाकडे जाणाऱ्या रस्त्यावरच्या ठेंगण्या टेकड्या बहुतेक बोडक्या आहेत. म्हणजे त्यांवर मोठाले वृक्ष अथवा जंगल नाहीं. रानगवत मात्र विपुल आहे. तें वाळून शुष्क झालें म्हणजे सहज पेटायला अगदीं सोपें. त्यामुळें या भागांत जातां येतां नेहमीं वणवे लागलेले दिसतात. किंबहुना वणव्यांचें दृश्य हें या भागांतील वैशिष्ट्य आहे. उलटपक्षीं रामगडच्या रस्त्यावर एकदांहि रानवणवा दिसला नाहीं, असें बेगलर साहेब लिहितात. याचें कारण ओलसर वृक्ष-वनस्पतींची दाट झाडी हें असावें.

२ हें लक्षण अयोध्याकांडाच्या ९५ च्या पुढील सर्गांत सांपडतें. परंतु हा सर्ग प्रक्षिप्त समजला जातो. तथापि त्यांतलें चित्रकूटाचें वर्णन रामगडचीं व त्यावरील सीताबेंगरा या नांवानें प्रसिद्ध असलेल्या गुहेशीं आश्चर्यकारक रीतीनें जुळतें यांत शंका नाहीं. या गुहेंत सीतादेवी राहिली होती अशी आख्यायिका आहे. प्रक्षेपक झाले तरी पचेल तें व जुळेल तेंच वर्णन रचून घुसडणार, हें अवश्य लक्षांत घेतलें पाहिजे.

३ रामगडावर सीताबेंगरा गुहेच्या जवळच डोंगरांत एक धातुराग किंवा तांबडा रंग विपुल सांपडतो. या ठिकाणाला 'तिलकमाती' असें नांव पडलें आहे. येथें रामचंद्रानें सीतेच्या भालप्रदेशीं जो तिलक लावला त्यावरून हें नांव पडलें आहे असें सांगतात. आजहि रामगडावर जाणारे यात्रेकरू या स्थळाचें दर्शन घेऊन तेथल्या लाल मातीचा तिलक कपाळीं लावतात.

हें तुलनात्मक कोष्टक दिल्यानंतर त्यावर अधिक भाष्य करण्याची गरज नाहीं. वर्णन अजिबात जुळत नाहीं. तो हा चित्रकूट नव्हे. आतां दिशा व अंतर हें साधन पहावयाचें. तें भ्रामक व घोंटाळ्याचें आहे. म्हणून त्याची छाननी जरा बारकाईनें केली पाहिजे.

' यमुनेपासून समीप ' यावर भर देऊन " चित्रकूट म्हणजे कामताजवळचा (बुंदेलखंडांत) चित्रकूट होय असें आतां विद्वानांनीं ठरविलें आहे " अशा विद्वानांचा हवाला देऊन प्रो. मिराशी तोच चित्रकूट मानतात. पण ते स्वतः तरी कुठें शंकेवून मुक्त झाले आहेत ? त्यांतली गोम अशी कीं, हा ' ठरविलेला ' चित्रकूट यमुनेपासून ६५ मैलांवर आहे आणि रामायणांत हें अंतर दिलें आहे वीस मैल ! त्यामुळें साशंक झालेले मिराशी लिहितात :

> हा चित्रकूट पर्वत प्रयागापासून सुमारें ६५ मैलांवर आहे. त्यामुळें रामायणांत वर्णिलेला पर्वत हाच काय, अशी शंका येते. तिचें निराकरण दोन प्रकारांनीं करतां येतें. रामायणांतील अंतर अदमासें दिलें असावें किंवा पार्जिटरसाहेब म्हणतात त्याप्रमाणें चित्रकूट ही एखादी विशिष्ट टेकडी नसून दोन नद्यांपासून प्रयागच्या पश्चिमेस सुमारें २० मैलांपर्यंत पसरणारी पर्वतराजि असेल. त्यापैकीं पहिलें निराकरण जास्त संभवनीय दिसतें. (सं. मु. पृ. ५७)

रामायणांत तर चित्रकूट यमुनेपासून दशकोशावर म्हणजे वीस मैलांवर आहे, असें स्पष्ट म्हटलें आहे. यांचा मानीव चित्रकूट पडला ६५ मैलांवर! म्हणजे इतकें करून तरी अंतर कुठें जमतें आहे ! ही अडचण आली तेव्हां तिचें ' निराकरण ' करावयाचें ! पण अशा रीतीनें केलेलें निराकरण पुस्तकांत होतें, मनांत होत नाहीं. रामायणांतलें अंतर अदमासानें दिलेलें म्हणावयाचें, मग तें १५० मैलांवरच्या रामगड पर्वतापर्यंत ताणण्यास काय हरकत ? दीडशेंपेक्षां पासष्ट मैल हें वीस मैलांच्या मानानें कमी चुकीचें अंतर आहे यांत शंका नाहीं. परंतु या बाबतींत कमी चुकीनें अंतर हा मुद्दा उपयोगी पडण्यासारखा नाहीं.

## वर्णन बरोबर—अंतर चूक

(१) हल्लींच्या रामायणाच्या आवृत्तीहून मूळ रामायण भिन्न होतें याबद्दल विद्वानांचें मतैक्य आहे. आतांच्यापैकीं बराचसा व महत्वाचा भाग मूळ वाल्मीकीच्या रामायणांत समाविष्ट असेल हें खरें. तथापि त्यानंतर वेळोवेळीं त्यांत 'दुरुस्त्या' व फेरफार घुसडण्यांत आले आहेत. त्यांचीं उदाहरणें विद्वानांनीं आधारपूर्वक निदर्शनास आणलीं आहेत. अयोध्याकांडांतील ९५ नंतर आलेला सर्ग प्रक्षिप्त मजकुराचें एक ठळक उदाहरण होय. उत्तरकांडांतील पुष्कळसा भाग उघडउघड मागाहून घुसवलेला दिसतो. म्हणूनच प्रयाग ते चित्रकूट यांतील 'दशक्रोश' हें अंतर विश्वसनीय मानतां येत नाहीं. इतर पुरावा विसंगत किंबहुना विरुद्ध जात असतांना या 'दशक्रोशा'ला शब्दप्रामाण्य किंवा स्वयंप्रामाण्य लाभूं शकणार नाहीं.

(२) शिवाय रामायणांत सर्वत्र कोश आणि योजन हे शब्द फार ढिलाईनें वापरलेले आहेत हें स्पष्ट दिसतें. त्यावरून नक्की निष्कर्ष काढूं जातां फसगत होण्याचा संभव असतो. त्यावर विसंबून फूटपट्टीनें व कांटेकोर गणितानें मोजमापें व अनुमानें करणें योग्य होणार नाहीं. दश याचा अर्थ (दशरथ, शतावधानी इ. शब्दांप्रमाणें) गणितांतला मोजून दहा असा नसून सरासरीनें पुष्कळ असाहि असूं शकेल.

(३) मूळ शतक्रोश हा पाठ बदलून तेथें 'दशक्रोश' असा जांवईशोध मागाहून दडपलेला असण्याची एक शक्यता आहे. शिवाय या शब्दप्रयोगाच्या मार्गेपुढें अंतरें सांगण्याकरितां योजन शब्द सर्रास वापरलेला आढळतो. मग मध्यें हा 'कोश' कसा उपटला? त्यावरूनहि संशय बळावतो.

(४) प्रयागला गंगा-यमुनासंगमावर आश्रम असलेला भरद्वाज ऋषि रामाला सांगतो :

> दशक्रोश इतस्तात गिरिर्यस्मिन् निवत्स्यसि
> चित्रकूट इति ख्यातो गंधमादनसंनिभः ॥
> (अयो० ५४.२८।२९)

आतां गंधमादन म्हणजे कैलासाइतका उंच व भव्य दुसरा कोणताच पर्वत येथून वीस मैलांवर नाहीं. अर्थातच हें दशक्रोश अंतर उघड उघड चुकीचें दिसतें. प्रयागपासून किंवा शब्दशः पाहिलें असतां भरद्वाजाश्रमापासून हें 'दशक्रोश' अंतर मागाहून दडपल्याची चूक कशी व कां झाली याची उपपत्ति आम्हांस सुचली आहे ती येथें दाखल करतों. चित्रकूटाप्रमाणें खुद्द भरद्वाजाश्रमाचाही रामायणांत घोटाळा झाला आहे! प्रयाग ते चित्रकूट यांच्या दरम्यान **भरद्वाजाचे एकूण दोन आश्रम** होते हें स्पष्ट दिसतें. एक गंगायमुनांच्या बेचक्यांतला किंवा यमुनेच्या **उत्तर तीरावर** असलेला-सर्ग ५४ व ९०।९२ यांत वर्णिलेला आणि दुसरा आश्रम चित्रकूटाच्या अगदीं जवळ यमुनेच्या **दक्षिणेकडे** सर्ग ११३ मध्यें उल्लेखिलेला.

वनवासी राम व त्याच्या मागोमाग कांहीं दिवसांनीं भरत आला. त्यांची व भरद्वाजाची भेट पहिल्या आश्रमांत झाली. परंतु नंतर भरत चित्रकूटावर रामाची गांठ व पादुका घेऊन परत फिरला, त्या वेळीं चित्रकूटानजीक किंबहुना पायथ्याशींच त्याला भरद्वाजाचा आश्रम दिसला ! ही गोष्ट फार महत्त्वाची आहे.

[1]अदूरात् चित्रकूटस्य ददर्श भरतस्तदा ।
आश्रमं यत्र स मुनिर्भरद्वाजः कृतालयः ॥

(अयो० ११३·४)

भरद्वाजाचा हा गंगाकांठचा पहिला आश्रम खास नव्हे. कारण येथून परत अयोध्येला जातांना भरत व त्याच्या परिवाराला यमुनेपार (श्लोक ११३·२१) व्हावें लागलें. शिवाय ही गोष्ट वरील श्लोकांतील कृतालयः म्हणजे नवीन आश्रम बांधून तेथें रहाण्यास आलेला भरद्वाजमुनि या वर्णनावरून स्वच्छ दिसते. राम व भरत यांना प्रयागाश्रमांत भेटलेला भरद्वाजऋषि त्यांच्या मागोमाग चित्रकूटानजीक कसा आला ? कशाकरितां आला ? आणि त्यानें आपला नवा आश्रम इतक्या थोड्या अवकाशांत बांधला तरी कसा ? टीकाकारानें म्हटल्याप्रमाणें राम-भरत-भेटींत काय झालें, हें जाणण्याची उत्कंठा भरद्वाजाला लागलेली होती आणि राहवेना म्हणून तो प्रयागाश्रम सोडून लगोलग चित्रकूटानजीक येऊन मुक्काम करून राहिला. ही गोष्ट भरत व भरद्वाज यांच्या संभाषणावरूनदेखील सहज लक्षात येते. यावरून भरद्वाजाचा पहिला प्रयागाश्रम चित्रकूटापासून 'दशक्रोशा 'च्या थोड्या अंतरावर नसून बराच लांब होता, असें अनुमान करतां येतें. **हा दुसरा नवीन भरद्वाजाश्रम मात्र चित्रकूटापासून जवळ म्हणजे सुमारें दशक्रोशाच्या आंतबाहेर असावा.** परतु मागाहून कालांतरानें हा मधला धागा तुटला, स्मृतींतून गेला आणि संभ्रमानें दशक्रोशाचें अंतर भरद्वाजाचा प्रसिद्ध असा जो प्रयागचा आश्रम त्याच्यापासून धरण्यात येऊं लागलें असावें व त्यामुळें ही चूक उत्पन्न झाली असण्याचा संभव आहे.

(५) प्रयागपासून चित्रकूटाचा मार्ग अयोध्याकांडांत एकूण दोन ठिकाणीं आला आहे. भरद्वाजऋषीच प्रथम रामाला आणि नंतर भरताला सांगतो. परंतु या दोन्ही ठिकाणीं नेमका मार्ग-वर्णनाचा भाग क्लिष्ट व संदिग्ध आहे आणि

१ या श्लोकावरची संस्कृत टीका पहा :

*अनेन यमुनादक्षिणतटेऽपि ऋषिभरद्वाजाश्रम इति ज्ञायते। अतएवाग्रे भरद्वाजामंत्रणोत्तरं ततस्ते यमुनां तीर्त्वेति वक्ष्यति। संप्रति तत्र स्थितिस्तु रामभरतयोः संवादं शिष्यद्वारा झटिति श्रोतुमिति बोध्यम् ॥*

यावरून भरद्वाजानें पहिला आश्रम सोडून घाईनें स्थलांतर केलें, ही गोष्ट टीकाकाराच्या देखील लक्षात आलेली होती. म्हणूनच त्यानें त्याचा खुलासा केला आहे व तो योग्यहि आहे.

शिवाय त्या दोहोंत तफावत आहे. रामायणाच्या एरवींच्या साध्या व प्रसन्नरमणीय भाषाप्रवाहांत हा क्लिष्ट भाग वेगळा वाटतो व खटकल्याशिवाय रहात नाहीं. याखेरीज भरद्वाजाश्रम प्रथमच्या वर्णनावरून *गंगायमुनासंगमाच्या* उत्तरेला आहे, अशी कल्पना होते. शिवाय आश्रम लागण्यापूर्वी कोणतीच नदी राम-लक्ष्मणांना ओलांडावी लागत नाहीं. तथापि आश्रमांतून भरद्वाजाचा निरोप घेऊन निघाल्यावर मात्र फक्त यमुना नदीच काय ती त्यांना ओलांडावी लागून ते दक्षिणेकडे येतात, असें पुढचें वर्णन आहे. हें कोडें नीटसें उलगडत नाहीं. त्यामुळेंहि या भागांत कांहींतरी भागाहून कमी-जास्त केलेलें असावें, हा संशय दृढ होतो.

## चुकीचा चित्रकूट कां मानला गेला ?

हल्लींचा चुकीचा चित्रकूट कां व केव्हांपासून मानण्यांत येऊं लागला? त्याची कारणमीमांसा खालीलप्रमाणें असावी, असें म्हणतां येईल. बांदा जिल्ह्यांतील कालंजर व त्याच्याच उत्तरेला थोड्या अंतरावर असलेला चित्रकूट हे दोन किल्ले म्हणून निदान नवव्या-दहाव्या शतकापासून माहीत होते असें दिसतें. दक्षिणेंतल्या राष्ट्रकूट राजांनीं उत्तर हिंदुस्थानांत आपलें वर्चस्व रहावें, म्हणून हे दोन कोट आपल्या ताब्यांत ठेवले होते, असें देवळीच्या ताम्रपटावरून दिसून येतें. त्यांत *राष्ट्रकूट सम्राट् तृतीय कृष्ण याच्याविषयीं आलेला खालील श्लोक पहा :*

यस्य परयेक्षिवाखिलदक्षिणदिग्विजयमाकर्ण्य ।
*गलिता गुर्जरहृदयात् कालंजर चित्रकूटाऽशा ॥*

म्हणजे चित्रकूट नांवाचे एकूण दोन डोंगर होते. एक मध्यप्रदेशांतील, गोंडवनांतील *सिरगुजा संस्थानांतील रामगड म्हणजेच पूर्वीच्या दंडकारण्यांतील चित्रकूट पर्वत.* आणि दुसरा बांदा जिल्ह्यांतील कालंजर किल्ल्याजवळचा यमुनेनजीक असलेला (म्हणजे ६५ मैलांवर) चित्रकूट किंवा चित्रकोट किल्ला. पहिल्या म्हणजे रामाच्या चित्रकूटालाच रामगिरि हें नांव पडलें असावें व कालवर्धानें त्या रामगिरीचा रामगड झाला. हा रामगड म्हणजेच प्राचीन चित्रकूट हें ज्ञान व इतिहास अनेक कारणांनीं कालौघांत नष्ट झाला–विसरला गेला. पुढें चित्रकूट हें नांव आयतेंच असलेला बुंदेलखंडांतील हा डोंगर हाच रामाचा चित्रकूट असें भ्रांतीनें सहजच मानण्यांत येऊं लागलें असावें. लोक गतानुगतिक असल्यामुळें हाच 'चित्रकूट' कालांतरानें पक्का झाला! अंधश्रद्धेनं या ठिकाणीं राम-विषयक अनेक दंतकथा निर्माण झाल्या. यमुनेच्या सान्निध्यानें भ्रांतीला पुष्टि मिळाली. भागाहून अधिकाधिक देवता-स्वरूप प्राप्त झालेल्या रामाशीं निगडित स्थळ निर्माण करण्याच्या मनुष्य-स्वभावसुलभ लालसेंतून हा डोंगर उत्पन्न झाला. बहुधा या तोतया चित्रकूटाशीं जुळवें अंतर ठेवण्याकरितां 'दशक्रोश', 'यमुनेसमीप' इत्यादि लक्षणांचे प्रक्षित

श्लोक मागाहून रचून रामायणांत घालण्यांत आले असले पाहिजेत. अंतराच्या या उल्लेखावर भर देऊन व भरंवसा ठेवून पार्जिटर प्रभृति संशोधकांनीं या कामता-जवळच्या चित्रकूटाला मान्यता दिलेली आहे. तथापि हे उल्लेख कसे बिन-अस्सल, संशयास्पद, विसंगत व अविश्वसनीय आहेत, हें वर दाखविण्यांत आलें आहे.

## मंदाकिनी नदी कोणती?

चित्रकूटालगत मंदाकिनी नदी वहाते असा उल्लेख कालिदासाचे ग्रंथ, रामायण, महाभारत व इतर पुराणांतूनहि आहे. हल्लीं बुंदेलखंडांतील चित्रकूटशेजारीं पयोष्णी किंवा पयस्विनी नांवाची छोटी नदी आहे तीच मंदाकिनी असें मानतात. तथापि तसें मानण्याला विशेष खूण किंवा आधार नाहीं. रामायणाच्या अयोध्याकांडांत (सर्ग ९५) मंदाकिनीचें वर्णन आहे: " मृगयूथनिपीता, सिद्धजनाकीर्णा, रमणीय-तीर्था, गजयूथलोडिता, गजसिंहवानरैः निपीततोया, पुष्पभरैः अलंकृता " इ. इ. राम सीतेला सांगतो—

सखीवत् च विगाहस्व सीते मंदाकिनीं नदीम् ।
मन्यस्व वनिते नित्यं सरयूवत् इमां नदीम् ॥

चित्रकूटनिवासांत सीता मंदाकिनी नदींत अयोध्येच्या शरयूंतल्याप्रमाणेंच भक्तिभावानें स्नान करीत होती. ' जनकतनयास्नानपुण्योदकेषु ' या कालिदासाच्या उल्लेखाचा मूलाधार हाच असला पाहिजे, यांत शंका नाहीं. मंदाकिनी या नांवा-वरून व रामायणातील वर्णनावरून ही नदी चित्रकूटाच्या पूर्वेला असून, मध्येंच मंद व मध्येंच वेगानें वहाणारी, बेटें असलेली, अनेकविध पशुपक्ष्यांनीं गजबजलेली, दाट अरण्यांत वहाणारी असावी असें दिसतें. पयोष्णी नदी पश्चिमेकडे आहे! तिच्यांत बेटें नाहींत, भोंवतीं अरण्य नाहीं, म्हणूनच पशुपक्षी असतील असें वाटत नाहीं. उलटपक्षीं रामगडलगत पूर्वेला रहर नदा आहे तिला हें सर्व वर्णन जुळण्यासारखें आहे. विशेषतः कांहीं ठिकाणीं डोह आणि कांहीं ठिकाणीं खळखळाटाचा वेगवान् प्रवाह हें रहर नदीचें वैशिष्ट्य युरोपियन प्रवाशांनींदेखील नमूद करून ठेवलें आहे. या दोहोंत रहर हीच मंदाकिनी असण्याला अधिक पात्र आहे, यांत शंका नाहीं.

## कालिदासाचा चित्रकूट हा नव्हे

रामायणांत वर्णिलेला चित्रकूट म्हणजे हल्लींचा तथाकथित चित्रकूट नव्हे, हें वरील विवेचनावरून सहज लक्षात येण्यासारखें आहे. तथापि अजूनहि अधिक प्रमाणांची आवश्यकता भासत असेल तर या बाबतींत खुद्द कालिदासाचा लेखी पुरावा सादर करतां येईल. रामायणाचें अनुकरण करणारा, रामायणाच्या परंपरेंत वाढलेला कालिदास चित्रकूट कोणता समजतो, याला फार महत्त्व आहे.

[1]रामायणांतील चित्रकूटच कालिदासाचा चित्रकूट असणार हें उघड आहे. पण या बाबतीत शंकेला जागा रहात नाहीं. कसें तें पहा.

रघुवंशांत बारावा व तेरावा सर्ग मिळून चित्रकूटाचे एकूण तीन उल्लेख आले आहेत. पहिल्यांत चित्रकूट पर्वताचा ठावठिकाणा आहे, दुसऱ्यांत दिशा आहे आणि तिसऱ्यांत तपशीलवार वर्णन आहे. प्रथम बाराव्या सर्गातील ९ वा श्लोक पहा.

विवेश दंडकारण्यं प्रत्येकं च सतां मनः

रामानें दंडकारण्यांत आणि त्याचबरोबर प्रत्येक सज्जनाच्या अंतःकरणांत प्रवेश केला असें वर्णन कवीनें आपल्या मनोरम शैलीनें केलें आहे. यानंतरच्या १५ व्या श्लोकांत भरत 'चित्रकूटवनां'त रामाला भेटण्याकरितां आला. यावरून कालिदासाचा चित्रकूट रामायणाप्रमाणेंच दंडकारण्यांत होता हें स्पष्ट आहे. हल्लींचा चित्रकूट दंडकारण्यांत मोडत असणें शक्य नाहीं. कारण दंडकारण्य विंध्याच्या दक्षिणेकडे होतें हें पुढच्या प्रकरणांत दाखविलें आहे. दुसरा उल्लेख आहे तो असा :

रामस्त्वासन्नदेशत्वात् भरतागमनं पुनः ।
आशंक्य उत्सुकसारंगां चित्रकूटस्थलीं जहौ ॥
प्रययौ आतिथेयेषु वसन् ऋषिकुलेषु सः ।
दक्षिणां दिशं ऋक्षेषु वार्षिकेष्विव भास्करः ॥

(सर्ग १२·२४।२५)

या श्लोकांतील वर्णनावरून **चित्रकूट ऋक्षपर्वताच्या परिसरांत** अथवा त्याचाच एक भाग होता हें उघड दिसतें. ऋक्षपर्वतांतच रामगड आहे. हल्लींच्या *चित्रकूटाचा आणि ऋक्षपर्वताचा कांहींच संबंध नाहीं!* आतां कालिदासानें चित्रकूट पर्वताचें केलेलें रेखीव वर्णन पहा. **धारास्वनोद्गारिदरीमुखोऽसौ** हा तो **मूळ श्लोक** (रघु. १३.४७) प्रकरणारंभीं दिला आहे.

त्यांतील चित्रकूट पर्वताचें कालिदासाचें शब्दचित्र फारच बहारीचें व स्पष्ट आहे. वैशिष्ट्यपूर्ण आहे. हा श्लोक खऱ्या चित्रकूटाचा छडा लावण्याचें एक मुख्य साधन होय. त्याची चर्चा अन्यत्र केली आहे. येथें फक्त त्याचा तपशील देतों :

---

१ पण या बाबतींत अनुमान करण्याचीहि जरूर नाहीं. चित्रकूटऐवजीच रामगिरि हें काव्यानुकूल सुंदर नवीन नांव कालिदासानें बुद्धिपुरःसर योजलें हें पुढें दाखविलें आहे. एवढेंच नव्हे तर रामगिरीच्या वर्णनांत रामायणांतील चित्रकूट-वर्णनाचे शब्दप्रयोग दर्शांत जसेच्या तसे कालिदासानें उचलून घेतले आहेत! स्निग्ध–'छाया'–तरु इत्यादि लक्षणें तींच, शब्द तेच, ठावठिकाणा व दिशा तीच. मग स्थळही तेंच असणार नाहीं काय! या विषयाचा सविस्तर ऊहापोह ७ व्या प्रकरणांत सांपडेल.

उंच भव्य उत्तुंग शिखरें, जलप्रपात, त्याचा प्रतिध्वनि, माथ्यावर लांबच] लांब विस्तीर्ण व आरपार गुहा कीं जणूं तें त्या पर्वताचें तोंड ( दरीमुखोऽसौ ) लांबूनसुद्धां दर्शनीय व आकर्षक.

या वर्णनांतील एकहि लक्षण हल्लींच्या चित्रकूटापाशीं नाहीं ! त्यामुळें कालिदासाचा चित्रकूट हा नव्हे याबद्दल अधिक खातरजमा करण्याचें कारण उरत नाहीं. शिवाय एकदां रामगड हाच रामगिरि हें प्रस्थापित झाल्यावर तो आपोआपच चित्रकूट ठरतो. रामायणानुसारी कालिदासाच्या समजुतीप्रमाणें व त्यानें केलेल्या वर्णनाप्रमाणें रामचंद्र फक्त चित्रकूटावरच राहिलेले. मग त्यानें ' रघुपतिपदैः अंकितं ' आणि ' जनकतनयास्नानपुण्योदक ' अशा रामसीता-वैशिष्ट्यांनीं वर्णिलेला रामगड म्हणजेच चित्रकूट नव्हे काय ? शेवटीं साधा प्रश्न असा कीं, कालिदास रामगिरि हें नांव **चित्रकूटाखेरीज** कोणत्याहि अन्य डोंगराला देणें शक्य तरी आहे काय ?

वस्तुतः गणितशास्त्राच्या पद्धतीनें हाच सिद्धांत खालीलप्रमाणें मांडतां येईल :

रामगड = रामगिरि
रामगिरि = चित्रकूट
∴ रामगड = चित्रकूट

तथापि या पद्धतीचा अवलंब न करतां रामगड हाच चित्रकूट हें समीकरण आम्ही स्वतंत्रपणें सिद्ध करणार आहोंत. म्हणजे या सिद्धांत-प्रस्थापनेला दुहेरी भक्कमपणा येईल.

सारांश, रामपदांचा मानकरी मानला गेलेला बुंदेलखंडांतील हल्लींचा डोंगर हा वाल्मीकीचा किंवा कालिदासाचा चित्रकूट नव्हे. याचें वर्णन जुळत नाहीं. अंतर जमत नाहीं. पुढें दिशा पहावयाची आहे, त्यातहि हीच दशा दिसेल. मग खरा चित्रकूट कोणता ? तो कळण्याकरितां आपल्याला वनवासी रामाच्या मागोमाग गेलें पाहिजे-निदान अयोध्येपासून पंचवटीपर्यंत. कारण खरा चित्रकूट पर्वत त्याच वाटेवर सापडणार हें उघड आहे. यासाठीं ' रघुपति-पदां 'चा माग काढला पाहिजे. म्हणून आतां रामाचा मार्ग अनुसरूं या. तोच दिशा दाखवील आणि इच्छित स्थळीं आणून सोडील !

* * *

## झोत ४ था

# वनवासी रामाचा खरा मार्ग

तदा तस्मिन् स काकुत्स्थः श्रीमत्याश्रममंडले
जगाम चाश्रमांस्तेषां पर्यायेण तपस्विनाम्
दक्षिणेन महान् श्रीमान् अगस्त्यभ्रातुराश्रमः
दक्षिणा दिक् कृता येन शरण्या पुण्यकर्मणा ॥ —अरण्यकांड सर्ग ११.

रामस्त्वासन्नदेशत्वात् भरतागमनं पुनः
आशंक्योत्सुकसारंगां चित्रकूटस्थलीं जहौ
प्रययौ आतिथेयेषु वसन् ऋषिकुलेषु सः
दक्षिणां दिशम् ऋक्षेषु वार्षिकेष्विव भास्करः ॥ —रघुवंश १२·२४।२५.

यौवराज्याभिषेकार्ची वस्त्रें उतरून ठेवून वनवासाचीं वल्कलें धारण केलेले श्रीरामचंद्र अयोध्येहून निघाले ते शरयू नदी ओलांडून गुहाच्या शृंगवेर-पुराला यांबून प्रयागला येऊन पोंचले. येथपर्यंतचीं स्थळें व मार्ग स्पष्ट असून त्याबद्दल मतभिन्नता नाहीं. त्याचप्रमाणें शेवटीं राम पंचवटीहून ऋष्यमूक पर्वतावर गेले. ऋष्यमूक म्हणजे हल्लीं बेल्लारी जिल्ह्यांतील हंपीजवळ अनागुदी नांवानें प्रसिद्ध असलेली डोंगरांची रांग होय. ऋष्यमूक किंवा त्याच्यालगतचें पर्वतशिखर म्हणजेच रामायणाचा व कालिदासाचा माल्यवान् पर्वत. या ऋष्यमूकापासून पंपा नदी, त्याच नांवाचें सरोवर, दक्षिणकिनारा व सेतु बांधून सागर ओलांडून लंकाप्रवेश हा अखेरीच्या मार्गाचा इतिहास व त्याचा[1] तपशील सर्वांना मान्य होण्यासारखा आहे. याप्रमाणें रामकथेचे व राम-मार्गाचे स्वाभाविकपणेंच तीन तुकडे पडतात. अयोध्या ते प्रयाग हा पहिला भाग, स्पष्ट व प्रस्थापित झालेला आहे. तिसरा व शेवटचा टप्पा, पंचवटी ते लंका हाहि तितकाच निर्विवाद आहे. या दोहोंच्या दरम्यानचा भाग, *प्रयाग ते पंचवटी हाच काय तो गोंधळाचा व चुकीचा* प्रचलित होऊन बसला आहे. प्रयागपासून पंचवटीपर्यंतची हल्लीं मानण्यांत येते ती स्थलमालिका उघडउघड घोंटाळ्याची, अविश्वसनीय व न पटणारी आहे. ती

---

१ सीलोन म्हणजे रामायणांतील लंका नव्हे असेंहि एक मत आहे. शिवाय पूर्वीची लंका समुद्रांत बुडाली असेंहि म्हणतात. कांहीं विद्वानांनी तर लंका दक्षिण टोंकाला नसून मध्य हिंदुस्थानांत होती असाहि पक्ष मांडला आहे. एका प्राचीन ज्योतिषानें उज्जयिनी व लंका एकाच मेरिडीयनवर आहेत असें म्हटले आहे. त्यावरून हल्लींच्या लंकेच्या शेजारीं दुसरें लंका बेट असावें असा तर्क होतो. तथापि प्रस्तुत विषयाला हीं मतमतांतरें अनवश्यक म्हणून विचारात घेतलेलीं नाहींत.

ऐतिहासिक दृष्टीनें व शास्त्रीय पद्धतीनें दुरुस्त करणें जरूर आहे. तथापि रामकथेचा व राम-पथाचा आरंभ आणि शेवट हे ज्ञात असल्यावर तदनुरोधानें या सांखळीचा मधला दुवा बसविणें फारसें जड नाहीं. बाजूचे दोन तुकडे बरोबर असल्यावर मधला साधा खटकन् बसतो.

प्रयाग ते पंचवटी या दरम्यानच्या रामाच्या प्रवासांत अनेक स्थळें वर्णिलीं आहेत. तीं मग पाहूं. पण मुख्य पांच स्थळें किंवा स्टेशनें म्हणजे दंडकारण्य, चित्रकूट, अगस्त्याश्रम, जनस्थान व पंचवटी हीं होत. हीं सर्व ठिकाणें परस्पर-संबद्ध असून त्यांची एक सांखळी आहे. आणि म्हणूनच कीं काय हल्लीं त्यांतील एखादेंच चुकलेलें नसून एकमेकांना जुळतील अशा रीतीनें तीं सर्वच चुकून बसलेलीं आहेत। मेंढराचा कळप जसा चुकला म्हणजे सबंधच चुकतो त्याप्रमाणें चुकीच्या ठिकाणांची ही एक मालिकाच तयार झाली आहे. अंधश्रद्धेनें व परंपरेनें या चुकीच्या समजुतींना पोसलें आहे. दंतकथांनीं त्याचा खुंटा बळकट केला आहे. कांहींना संशोधक आपला पाठिंबा देऊन चुकले आहेत. प्रचलित समजुतीप्रमाणें [1]दंडकारण्य स्थूलमानानें हल्लींच्या महाराष्ट्रांत, चित्रकूट बुंदेलखंडांत, अगस्त्याश्रम नाशिकच्या आसपास (अगस्तिपुरी म्हणतात तो किंवा अकोला येथें), आणि जनस्थान व पचवटी खुद्द नाशिकला असें मानतात. या मार्गामुळें रामायणाप्रमाणें दक्षिणेकडे जावयास निघालेल्या रामाला कारणाशिवाय किती वांकडी वाट करावी लागते, आणि पश्चिमेकडे–अतिपश्चिमेकडे–जावें लागतें पहा.

उलटपक्षीं, विंध्यापासून पूर्वगोदावरीपर्यंत (पूर्वीचें गोंडवन किंवा मध्य प्रांताचा पूर्वभाग व छोटा नागपूर प्रांत) हें दंडकारण्य, सिरगुजा संस्थानांतील रामगड हा चित्रकूट, त्याच्या दक्षिणेला अगस्त्याश्रम आणि भद्राचलम् येथें पंचवटी व त्याच्या आसमंतात्चा प्रदेश म्हणजेच जनस्थान; हा मार्ग कसा सरळ व संभवनीय आहे पहा. हा मार्ग–म्हणजे प्रयागहून रामगडद्वारा ओरिसांतून पूर्व-किनाऱ्यानें राजमहेंद्रीजवळ गोदावरीकांठच्या भद्राचलमला उत्तर-दक्षिण येणारा मार्ग नुसता स्वाभाविक नव्हे तर तोच रामायणाला व कालिदासालाहि अभिप्रेत आहे, हें आता दाखवावयाचें आहे. वरील पाच स्थळांपैकीं एक किंवा अधिक स्थळें नक्की व संशयातीत करतां आलीं तर आपोआपच परंपरित प्रमाणानें चित्रकूट पक्का होईल. त्यासाठीं ही शोधाशोध करावयाची.

---

१ एवढेंच नव्हे तर दंडकारण्य मुळीं यमुना नदीपासूनच सुरू होतें असें हल्लींच्या चित्रकूटाचें समर्थन करणाऱ्यांना मानणें भाग पडतें. कारण चित्रकूट तर पहला दंडकारण्यात त्या मानानें हल्लीं ठरविण्यात आलेला चित्रकूट फारच दूर यमुनेशीं भिडावयाला जातो! म्हणून या विसंगत भूमिकेंतून सुटण्याकरिता दंडकारण्यच यमुनेपर्यंत ताणावयाचें! यामुळें दंडकारण्यांत चित्रकूट ठेवण्याऐवजीं 'चित्रकूटा'पर्यंत दंडकारण्य उचलून न्यावयाचें, असा विपरीत प्रकार संशोधकांना करावा लागत आहे!

प्रथम स्थूलमानानें सारासारविवेकाच्या बुद्धीनें एकवार या प्रश्नाकडे पाहूं. राम प्रयागच्या प्रसिद्ध गंगा-यमुना संगमाजवळ येऊन ती नदी पार करून अलीकडे आल्यावर तो कोणीकडे आणि कोठून जाईल ?

दक्षिण दिशेला असलेल्या दंडकारण्यांतच येऊन राहण्याला रामचंद्र वचनवद्ध झालेला होता हें विसरतां कामा नये. कैकेयीची तशी अटच होती. गादीचा खरा वारस आणि लोकप्रिय अशा राजपुत्राला केवळ राज्यभ्रष्ट करून उपयोगी नाहीं तर त्याला दीर्घकाळ प्रजाजनांच्या नजरेसमोरून काढून लावलें पाहिजे हा जो कुटिल राजनीतीचा नेहमींचा पवित्रा तो कैकेयीच्या चित्तांत वागत होता. (अयोध्याकांड सर्ग ९।१०।११) राम एकदां प्रजेच्या दृष्टीआड आणि म्हणूनच सृष्टीआड झाला कीं मग 'माझा' भरत दृढमूल होण्याला अडचण नव्हती। मंथरेनें तिला अशीच मसलत दिली होती :

रामप्रव्रजनं दूरं नव वर्षाणि पंच च
रूढश्च कृतमूलश्च शेषं स्थास्यति ते सुतः॥
येन कालेन रामश्च वनात् प्रत्यागमिष्यति
अंतर्बहिश्च पुत्रस्ते कृतमूलो भविष्यति ॥

यावरून दंडकारण्य व त्यांतील चित्रकूट अयोध्येच्या राज्यापासून बराच लांब असावा, हें ओघानेंच येतें. अयोध्या म्हणजे उत्तर कोसलाची तत्कालीन व्याप्ति निश्चित नाहीं. तथापि पराक्रमी रघुवंशीय राजांनी, निदान दशरथाची राज्यसीमा यमुनेपर्यंतच नव्हे तर विंध्यापर्यंत भिडली असावी. कारण दशरथानें पूर्वीं दक्षिणेंत जाऊन लढाया मारलेल्या होत्या. तेव्हांच तर ते भयानक वर कैकेयीला मिळून बसले होते.

दिशमास्थाय कैकेयि दक्षिणां दंडकान् प्रति
वैजयन्तमिति ख्यातं पुरं यत्र तिमिध्वजः ॥
स शम्बर इति ख्यातः शतमायो महासुरः
तत्राऽकरोत् महायुद्धं राजा दशरथस्तदा ॥

वर्णनावरून व नांवावरून हा तिमिध्वज राजा ऊर्फ शम्बर असुर म्हटला असला तरी राक्षस दिसतो. कारण असुर इतक्या खालीं दक्षिणेंत आणि राज्य स्थापिलेला असणें शक्य नाहीं. शिवाय विंध्याच्या वर उत्तर प्रदेशांत म्हणजे आर्यावर्तात वैजयंत नगर किंवा तिमिध्वज राजा इतिहासांत भेटत नाहीं. यावरून यांत उल्लेखिलेला दंडका भाग किंवा दंडकारण्य यमुनेपासून तर पुष्कळच 'दूर' विंध्याच्या दक्षिणेस असावें या अनुमानाला पुष्टि मिळते.

विंध्याखालच्या दंडकारण्यांत यावयाचें ठरलें तर रामचंद्र (सीतेसह) विंध्य रांगेंतले डोंगर ओलांडीत बसेल कीं अमरकंटक (मेखल) आणि रामगड यांच्या

दरम्यानच्या बेचक्यांतून ( हल्लीं नकाशावर छोटा नागपूरचें पठार या नांवानें दाखवितात त्यामधून ) जो मिनत्राणाचा रस्ता आहे त्यानें खालीं उतरेल ? फार प्राचीन काळापासून दक्षिणेंत येण्याचा तोच प्रसिद्ध [1]मोठा रस्ता आहे.

रामाला प्रयागानंतर नाशिकच्या दिशेनें तिरपी व आडवळणाची वाट काढून पश्चिमेकडे जाण्याचें काय कारण होतें ? त्या भागांतील अवंती-विदर्भादिक राज्यांत किंवा नजीक अशा स्थितींत जाण्यामध्यें कांहीं औचित्य नव्हतें. हा दिग्विजय नव्हता, वनवास होता ! शिवाय विंध्यांतून रामानें दंडकारण्य-प्रवेश केल्याचें वर्णन रामायणांत आहे. बुंदेलखंडातील हल्लींच्या 'चित्रकूटा' हून रामचंद्र नाशिककडे गेले असें म्हटलें तर वाटेंत नर्मदा नदी लागणार. मग रामायणांत नर्मदा ओलांडल्याचा उल्लेख कसा नाहीं ? थेट अयोध्येच्या शरयू नदीपासून अखेर-पर्यंत वाटेंत आडव्या येणाऱ्या प्रत्येक पूर्व अगर पश्चिम-वाहिनी नदीचा जर उल्लेख आहे, तर नर्मदेचा कां नाहीं ? कारण सरळ आहे. रामाला नर्मदा लागलीच नाहीं. लागण्याचें कारण नव्हतें. नर्मदा टाळून तिच्या उगमाच्या पूर्वेकडून तो दक्षिणेंत उतरला. पूर्वीपासून तीच प्रसिद्ध वाट होती.

## रामायणांतलें ऐतिहासिक रहस्य

रामायणाच्या काव्यरंजित आवरणाखालचा ऐतिहासिक गाभा पाहिला पाहिजे. रामकथानक हें भारतांत वसाहतीकरितां येणारे आक्रमक आर्य व येथील मूळचे रहिवासी यांच्यांतल्या झगड्याचें प्रतीक व इतिहास होय. सुधारलेल्या लोकांचीं शस्त्रेंहि सुधारलेलीं असतात. त्यांचा समाज अधिक सुसंघटित, युद्धपद्धति अधिक शिस्तीची व शिताफीची असते. विकासाच्या दृष्टीनें वरच्या पातळीवर असलेल्या समाजापुढें कमी विकसितांना नमावें लागतें, हा जो मार्क्सवादांतील सिद्धांत त्याचेंच राम-राक्षस युद्ध[2] हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. राम सत्यवचनी म्हणून जिंकला नाहीं, धनुर्धारी म्हणून जिंकला. सत्यमेव जयते हें अर्धसत्य आहे ! सत्याची

---

१ याच रस्त्यानें महाभारतात सहदेव व नतर सम्राट् अशोक यानें लंकेला पाठविलेले धर्मप्रसारकाचें मंडळ ( mission ) उत्तरेंतून दाक्षिणेकडे आलें होतें.

२ सामान्यतः त्रिशूल, शक्ति ( Javelin ), मुद्गर, खड्ग, काठ्या, ही राक्षसांचीं आयुधें होतीं. राक्षसांपैकीं फक्त रावण व इंद्रजित् या दोघांनींच काय तो धनुष्यबाण वापरला तथापि मागाहून कवींनीं ही दुरुस्ती केलेली असावी, हें उघड दिसतें. त्यांनीं रावणाच्या हातांत धनुष्य दिलें ! रावणाचा पराक्रम वाढविल्याशिवाय त्याला मारणाऱ्या रामाचा महिमा कसा वाढणार ? रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव असें अनन्वय अलंकारानें केलेलें वर्णन ही एक अतिशयोक्तीची लकेर आहे. राक्षसांपैकीं इतर कोणीच धनुष्य वापरल्याचें वर्णन नाहीं, ही गोष्ट सूचक आहे. राक्षसाधिपति बलाढ्य योद्धा होता, ही गोष्ट खरी. पण धनुर्धारी रामापुढें त्याचा टिकाव लागण्यासारखा नव्हता.

कास धरल्यामुळें आत्मबल वाढतें हें निःसंशय. अनुषंगानें तेज व तडफहि वाढत असेल. तथापि रांगड्या रणांगणावर प्रत्यक्ष कलह उभा राहिला म्हणजे दोन हात करतांना नैतिक श्रेष्ठत्वापेक्षां शस्त्रश्रेष्ठत्वच अधिक निर्णायक. युद्धभूमीवर विजयश्री नीति-अनीतीचा हिशेब मांडीत बसत नाहीं. उतावळ्या विजयश्रीला तितका धीर नसतो। ती जबरदस्ताला माळ घालून मोकळी होते. दाशरथि राम अधिनायक असलेल्या तत्कालीन आर्यांच्या अजिंक्यतेचें रहस्य ऐतरेय ब्राह्मणांत सांपडतें.

"Vishnu departed with fame and gods followed him seeking to obtain fame. From the left hand of him the bow was produced and from the right hand arrows. Hence bow and arrows have holy origin. Though many, they could not *overcome him though he was only one.* Therefore *many* men without bow and arrows cannot overcome one with *bow* and arrows."

Taittiriya Aranyaka ( vol. IV, Muir's Sanskrit Texts )

रानटी राक्षस बलवान् होते पण त्यांचीं शस्त्रें त्यांच्या संस्कृतीप्रमाणें दुर्बळ, भागासलेलीं होतीं. आर्यांना धनुर्विद्या[1] अवगत होती. परंतु धनुर्बाणाचा-शत्रूंच्या त्रिशूलादि शस्त्रांच्या टप्प्यांत न सांपडतां लांबून त्यांचेवर शरसंधान करतां येणाऱ्या या अजब शोधाचा विस्तृत प्रमाणावर व कौशल्यानें प्रथम वापर करून प्रसरणशील आर्यांचा ध्वज व संस्कृति दक्षिण टोंकापर्यंत सागरांतापर्यंत भिडविली हें रामाचें वैशिष्ट्य व महिमा. म्हणून रामायणानें रामचंद्राला देवतातुल्य व अजरामर करून ठेवलें आहे. तें नवीन उगवणारें धनुष्ययुग होतें. उगीच नाहीं रामबाण शब्द रूढ झाला. तो आर्यसमाजाच्या शस्त्रश्रेष्ठत्वाचा आणि म्हणून अजिंक्यतेचा वाचक होता. भारतवर्षाच्या कीर्तिमंदिरांत धनुर्धारी रामाची प्रतिमा स्थापन झाली, ती त्या अवताराचें व तत्कालीन समाजाचें नेमकें वैशिष्ट्य प्रकट करण्याकरितां. त्यापूर्वीच्या काळांत वामन युक्तिबळानें बळीला पाताळांत दडपीत होता, नरसिंह आपल्या तीक्ष्ण नखाग्रांनीं दैत्यांना फाडीत होता, आणि परशुराम शत्रूवर कुऱ्हाड चालवीत होता. पहिला बाण सोडला रामानें. मध्ययुगाच्या अखेरीस बंदुका

१ दंडकारण्यांत असतांना रावणाचे चवदा हजार जनस्थाननिवासी राक्षस रामाच्या अंगावर चालून आले पण एकट्या रामानें त्यांचा फडशा उडविला असें रामायणानें जें प्रौढीनें वर्णन केलें आहे त्यातलें इंगित हेंच- धनुष्यबाण.

चतुर्दशसहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम्
हतान्येकेण रामेण खरश्च सहदूषणः ॥

चवदा हजारांचा आंकडा फुगविलेला असेल- पण बऱ्याच मोठ्या राक्षससमुदायाला रामानें आपल्या धनुष्यानें पळवून लावलें असलें पाहिजे यांत शंका नाहीं.

किंवा चालू काळांत अणुबाँब, या शोधांत जी अद्भुतता, भयानकत्व व संहार-सामर्थ्य आहे तेंच त्या प्राचीन काळीं नव्या धनुष्यबाणांत भरलेलें होतें. स्फोटक दारूचा शोध लागण्यापूर्वी धनुष्यबाण ही संहारक व लांब पल्ल्याच्या नेमबाजीनें गांठलेली कमाल मर्यादा होती. शस्त्राच्या वापरांत झालेला तो मौलिक बदल (Qualitative change) होता.

रामाची थोरवी ही कीं, त्यानें आर्यांची वसाहत व संस्कृति विंध्याच्याहि पलीकडे दक्षिणेंत रेटली आणि स्थिर केली. अनार्यांपैकीं कांहींना दिपवून, कांहींना वश करून, कांहींना मारून. तोंपर्यंत विंध्याचलाची आडवी रांग किंवा नर्मदा हीच आर्यावर्ताची दक्षिणसीमा समजली जात होती.

इमां सागरपर्यंतां हिमवद्विंध्यकुंडलाम्

मध्य आशियांतून अफगाणिस्तानाच्या द्वारा आलेले आर्य पूर्वेकडे बंगालपर्यंत पसरत गेले. उत्तरेला हिमालय आणि दक्षिणेला विंध्य यांच्या दरम्यानचा सुपीक मुलुख एवढेंच आर्यांचें जग होतें. विंध्याच्या पलीकडे दक्षिणेंत अरण्य — दंडकारण्य होतें (विंध्यशैवलयोर्मध्ये). तेथें मूळपासून राक्षसांची वस्ती होती, खालीं लंकेपासून ते विंध्यापर्यंतचा मुलुख[1] राक्षसांच्या वर्चस्वाचा होता, असें रामायणावरून स्पष्ट दिसतें. अगदीं प्रारंभींच्या काळांत आर्यांची आक्रमक नजर या प्रदेशाकडे वळली नव्हती. मागतें आहे तोंपर्यंत पर्वत कोण ओलांडतो ! तथापि राम-काळाच्याहि पूर्वी आर्य लोक विंध्याच्या पलीकडे डोकावून पाहूं लागले होते आणि आदिवासी अनार्यांशीं त्यांच्या चकमकी झडूं लागल्या होत्या. आर्य बिहारमध्यें (विदेह) वेदकालांतच स्थायिक झालेले असून आता ते गंगेच्या दक्षिण तीरावर (पश्चिम बंगाल म्हणजे रामगडच्या वरच ईशान्येला) वसाहती करूं लागले होते. वामनावताराची चरित्रभूमि हीच. बलिपत्नीचें नांव विंध्यावलि होतें. बळीला पाताळांत घातला याचा अर्थ विंध्या-पलीकडे पिटाळून लावला असा असण्याचा संभव आहे याच जागेवर विश्वामित्राचा सिद्धाश्रम होता आणि येथेंच राक्षसांच्या उपद्रवापासून रक्षण होण्याकरितां त्यानें

१ नंतरच्या पुराणांतून राक्षस व असुर हे शब्द समानार्थी वापरलेले आढळतात एवढ रामायणांतहि कांहीं ठिकाणीं हा घोटाळा आहे. तथापि हा समज चुकीचा आहे. सुर व असुर हे आर्य-पूर्वजांच्याच दोन शाखांचे प्रतीक शब्द आहेत. दिति व अदिति यांची ही सावत्र प्रजा या कथेवरून हें स्पष्ट दिसतें. म्हणून तर असुरांना म्हणजे शत्रूंना वेदवाङ्मयांत 'भ्रातृव्य' हें नांव मिळालें आहे दोघांचा जन्म काश्यपापासूनच या दोघांमध्यें चाललेल्या सतत कलहाचा उल्लेख रामायणांतहि आहे. प्राचीन संस्कृत वाङ्मयांत वर्णिलेले सुर किंवा देव म्हणजे, देवतास्वरूप दिलेले तत्कालीन आर्यांचे पूर्वज, याबाबत विद्वानांचें एकमत आहे. असुर ही त्यांचीच शाखा, पण कांहीं कारणानें मतभेद व कलह उत्पन्न झालेले लोक. हे असुर म्हणजे इराणच्या झेंद लोकांचे पूर्वज किंवा इराणांत रहाणारे आर्य असले पाहिजेत असें झेंद अवेस्ता या पारशी लोकांच्या प्राचीन धर्मग्रंथावरून दिसतें. राक्षस म्हणजे मात्र अजिबात निराळे. ते येथले मूळचे आदिवासी किंवा अनार्य.

राम-लक्ष्मण या बालवीरांना मुद्दाम आणलें होतें. यावरून आर्यांनीं व त्यांच्या नेत्यांनीं येथूनच म्हणजे ओरिसांतून अथवा लगतच्या छोटा नागपूर पठारांतून विंध्य प्रथम ओलांडला असें दिसतें. कै. चिं. वि. वैद्य यांनीं असेंच मत प्रकट केलें आहे.

"The Aryans appear thus to have entered the South from North-east through Orissa and by the eastern coast."

— The Story of Ramayana, p. 21.

अर्थात् ओरिसापेक्षांहि जरा पश्चिमेला असलेल्या रामगडनजीक म्हणजेच चित्रकूटापाशीं विंध्याची सांखळी थोडीशी तुटलेली असून तेथें पठार आहे. तोच मार्ग भौगोलिक दृष्ट्या अधिक सुकर व संचाराला सोयीचा असल्यामुळें तेथूनच आर्यांनीं आपल्या दक्षिण-आक्रमणाच्या चंचुप्रवेशाला सुरवात केलेली असणें अधिक स्वाभाविक आहे. या पहिल्या दक्षिणप्रवेशीं आर्य धुरंधरांपैकींच अगस्त्य हा एक होता. अनुलंघ्य विंध्य उल्लंघिण्याचा मान रामायणानें त्याला बहाल केला आहे. विश्वामित्राप्रमाणेंच त्याच्यांत ब्राह्म आणि क्षात्र अशा दोन्ही गुणांचें मिश्रण[१] होतें. शापादपि शरादपि अशी त्याची तयारी व तेज होतें. अगस्त्यऋषींच्या मुखांत मंत्र होता तर खांद्यावर धनुष्य होतें. प्रथम दक्षिणेंत त्यानें पाय रोंवला. उत्तर गोलार्धांतील सात ताऱ्यांना ( Great Bear ) वेदकालीन सप्तर्षींचें नामाभिधान प्राप्त झालें. त्याच कारणाकरितां दक्षिणेकडच्या एका तळपणाऱ्या ताऱ्याला कृतज्ञ आर्यांनीं अगस्त्य ऋषींचें नांव दिलें. दक्षिण दिशा त्यानें शोधली व व्यापली. मागाहून राम आला. त्यानें ही दक्षिण विजयाची धुरा हिरीरीनें उचलली. इंद्र व विष्णु यांचेपासून मिळालेला अक्षय्यभाता व धनुष्य अगस्त्यानें रामचंद्राच्या हवालीं केलें (अरण्यकांड सर्ग १२) तें या घटनेचेंच प्रतीक होतें. आर्यांच्या शत्रूंशीं करावयाच्या सामन्याचें धुरीणत्व, साधन व जबाबदारी परंपरेनें आतां रामावर येऊन पडली, असा त्याचा अर्थ होता.

---

१ निगृह्य तरसा मृत्युं लोकानां हितकाम्यया ।
दक्षिणा दिक् कृता येन शरण्या पुण्यकर्मणाम् ॥
तस्येदमाश्रमपदं प्रभावादस्य राक्षसैः ।
दिगियं दक्षिणा नासाद्यते नोपभुज्यते ॥
नाम्ना चेयं भगवतो दक्षिणा दिक् प्रदक्षिणा ।
प्रथिता त्रिषु लोकेषु दुर्धर्षा क्रूरकर्मभिः ॥

—अरण्यकांड सर्ग ११

## विंध्य ही आर्य-अनार्यांची सीमारेषा

विंध्याच्या उत्तरेकडे आर्य आणि दक्षिणेकडे अनार्य अशी वांटणीची स्थिति फार काळ टिकली नाहीं, टिकणें शक्य नव्हतें. आर्य व अनार्य यांच्यांतील झगडा[१] अपरिहार्य होता. वर्धिष्णु व विजिगीषु आर्य विंध्य ओलांडून दक्षिणेकडे सरकूं लागले. आर्यांचें हें आक्रमण राक्षसांना सहन होईना. विंध्याचा परिसर हें दोघांच्या मधील चकमकीचें ठिकाण बनलें. अगस्त्य व त्याच्या मागोमाग अनेक आश्रम दण्डकारण्यांत धिटाईनें स्थापन झाले होते खरे, तथापि विंध्यांत असलेला चित्रकूट पर्वत ( हल्लींचा नव्हे ) व त्यावरचे आश्रम येथपर्यंत येऊन राक्षस उपद्रव व विध्वंस करीत. दंडकारण्यांतले ऋषि रामाला गाऱ्हाणें सांगतात.

पंपानदीनिवासानां अनुमंदाकिनीमपि ।
चित्रकूटालयानां च क्रियते कदनं महत् ॥

या श्लोकांतील चित्रकूटाला विंध्याचा वास आहे. हल्लींचा चित्रकूट अभिप्रेत असता तर यमुनेची मोठी खूण सांगितली असती. मंदाकिनी या किरकोळ नदीपेक्षां विख्यात यमुनेची खूण अधिक चांगली होती. एकंदरीनें पूर्वापार संदर्भ पहातां, अगस्त्यानें विंध्य ओलांडला तो या ठिकाणीं म्हणजे पूर्वेकडून ओलांडला असें दिसतें. चित्रकूटापासून दक्षिणेस थोड्याच अंतरावर अगस्त्याश्रम होता. तेथेंच रामाची व त्याची भेट होऊन गोदावरीच्या कांठीं पंचवटींत रहाण्यास रामाला त्यानें सांगितलें, असें रामायणांत वर्णिलें आहे. अर्थात् रामचंद्रहि याच मार्गानें विंध्यांतून आला असला पाहिजे, हें उघड आहे.

वरील विवेचनावरून चित्रकूटाचा कांटा रामगडकडे कसा झुकत आहे, हें दिसून येईल. आतां इतर स्पष्ट प्रमाणें पाहूं. प्रयाग ते पंचवटी या राममार्गाचे पांच टप्पे क्रमवार घेऊं.

---

१ वेद, रामायण व महाभारत हे तीन ग्रंथ आर्यांच्या इतिहासातील तीन अवस्थांचे अथवा कालखंडाचे द्योतक व प्रतीक आहेत. पहिल्यांत निसर्गाशीं लढा, दुसऱ्यात परक्याशीं लढाई तर तिसऱ्यात आपसातील यादवी आहे ! मौज ही कीं, पहिल्या दोन झगड्याप्रमाणें तिसराही समर्थनीय ठरला ! भाऊबंदकीच्या युद्धाला आवश्यक अशी नैतिक बैठक व तत्त्वज्ञान हवें होतें, तें चतुर कृष्णानें पुरविलें. पूर्वी सत्यवचनी राम वंद्य होता, आता मुत्सद्दी कृष्णही प्रातःस्मरणीय ठरला ! सावत्र भाऊ पाया पडून परत बोलावीत असतांही रामाला वनवासांतून माघारीं न फिरविणारें रामायण आणि स्वबांधवांना सुईच्या अग्राएवढी माती देखील न देणारें आणि त्यासाठीं सहार माडणारें महाभारत याच्यांतील अतर विस्मयजनक आहे. भौतिक परिस्थितीनुसार धर्म व नीतिविषयक कल्पना कशा बदलतात याचें हें ढळढळीत उदाहरण होय. ज्याच्यांत समाजांतील बहुतांचें हित तोच 'धर्म' बनतो !

## १. दंडकारण्य

दुर्दैवानें या अंधारांत एक गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट असेल तर ती ही कीं, चित्रकूट[1] दंडकारण्यांत होता. मूळ कैकेयीची अटदेखील तशीच होती. म्हणून चित्रकूट-निश्चितीच्या दृष्टीनें दंडकारण्याची व्याप्ति-विशेषतः उत्तरसीमा ठरविण्याच्या प्रश्नाला फार महत्त्व आहे. दंडकारण्य नक्की केल्यावर जो डोंगर त्याच्या हद्दीबाहेर जातो तो चित्रकूटच नव्हे. तीच गत हल्लींच्या मानीव चित्रकूटाची होते. हल्लींचा तोतया चित्रकूट विंध्याच्या पुष्कळ उत्तरेला यमुनेजवळ आहे. तो पक्का धरावयाचा. पण चित्रकूट तर पडला दंडकारण्यांत. म्हणून दंडकारण्य ताणून विंध्याच्या पलीकडे यमुनेपर्यंत भिडवावयाचें, अशी आजची संशोधन-क्षेत्रांतील स्थिति आहे. परंतु दंडकारण्य विंध्यापलीकडे सरकूं शकत नाहीं आणि म्हणून यमुनेजवळचा चित्रकूट शाबीत होत नाहीं. कसें तें पहा. एक तर **विंध्यशैवलयोर्मध्ये** अशी स्पष्ट मर्यादा रामायणांत सांगितलेली आहे. म्हणजे विंध्य ही दंडकारण्याची उत्तरसीमा निश्चित होते. तसेंच वर दिलेल्या प्राचीन परंपरेच्या इतिहासांतून हाच सूर निघतो. अमरकोशांत तसाच उल्लेख आहे—

आर्यावर्तं पुण्यभूमिर्मध्यं विंध्यहिमालयोः

शिवाय भास-काळांत देखील हिमालय आणि विंध्य या आर्यावर्ताच्या उत्तर व दक्षिण सीमा समजल्या जात होत्या, हें स्पष्ट आहे. भास कवीच्या तेराहि नाटकांत 'हिमवद्विंध्यकुंडलाम्' हें भरतवाक्य आलेलें आहे. त्यावरूनहि दंडकारण्य विंध्याच्या दक्षिणेला सुरू होत असलें पाहिजे, हें उघड दिसतें. शिवाय याच भासकवीचें 'प्रतिज्ञा-यौगंधरायण' नामक ऐतिहासिक नाटक आहे. त्याच्या पहिल्या अंकांत नायक उदयन राजा (बुद्धाचा समकालीन) नर्मदा नदी पार करून आपल्या राज्याच्या सरहद्दीवरील वेणुवनांत गेला होता, असें दाखविलें आहे. म्हणजे कौशांबी राजधानी असलेलें त्याचें राज्य नर्मदेपर्यंत पसरलेलें होतें, असें दिसतें. शिवाय त्याची हद्द पश्चिमेकडे उज्जयिनीला व पूर्वेकडे मगधाला भिडली होती, असेहि उल्लेख आहेत. यावरून नर्मदेच्या उत्तरेला दंडकारण्य असणें संभवनीय दिसत नाहीं. याखेरीज रामायण-महाभारत काळापासून या नर्मदा आणि यमुना यांच्या दरम्यानच्या टापूंत पश्चिम टोकापासून तो थेट पूर्वेपर्यंत ओळीनें राज्यें असलेलीं दिसतात. उज्जयिनी, अवंती, दशार्ण, चेदी, कौशांबी (वत्सदेश), काशीचें राज्य इ० इ० (किष्किंधाकाड, महाभारत व डॉ. बी. सी. लॉ यांची G. Dictionary of Ancient India पृष्ठ ४८ व ३१५.) मग या भागांत दंडकारण्य कसें येणार?

१ रामगिरि देखील दंडकारण्यातच होता हें सर्वांना ठाऊक होतें. मे. चा टीकाकार स्थिरदेव (१० वे शतक) म्हणतो : 'रामगिरिस्तु दंडकांतः प्रसिद्धः।'

विशेषतः ज्या जागेवर हल्लींचा चित्रकूट उभा आहे तो भाग पूर्वी वत्सदेश, चेदी किंवा दशार्ण देशांत मोडत होता. कालिदासाच्या मेघदूतांतील दशार्णाहून रामायणांतील दशार्ण देश वेगळा होता, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. रामायणांत त्याचा उल्लेख मेखल व उत्कल या देशांसमवेत केला आहे. (कि. सर्ग ४१ · ८।१०) शिवाय रामायणकाळीं खुद्द नर्मदेच्या अलीकडेदेखील विदर्भ व दक्षिण कोसल हीं राज्यें होतीं. विदर्भाचें राज्य फार प्राचीन आहे. रामाचा आजा अज हा युवराज असतांना स्वयंवराकरितां नर्मदा ओलांडून विदर्भाची राजधानी कुंडिनपूर येथें आला होता (रघु. सर्ग ५). प्राचीन भारतवर्षाचा नकाशा सहज पाहिला तरी ही गोष्ट नजरेंत भरते. नर्मदेच्या वर प्राचीन देशांचीं व राज्यांचीं नावें व मुलूख आढळतात. अमरकंटकच्या पूर्वेकडील डोंगराळ भाग, पूर्वीचें गोंडवन अथवा छोटानागपूर प्रांत हा मात्र ढळढळीत मोकळा दिसतो. हेंच पूर्वीचें दंडकारण्य. यावरून विदर्भ ही दंडकारण्याची पश्चिम सीमा आणि विंध्यपर्वत ही उत्तरसीमा याबद्दल शंका रहात नाहीं. विंध्याच्या सुमारें दीडशें मैल उत्तरेकडे असलेल्या यमुनेशीं भिडणारा हल्लींचा ठेंगू चित्रकूट दंडकारण्याच्या आणि म्हणूनच शक्यतेच्या चौकटींत बसत नाहीं. कालिदासानेंदेखील आधीं दंडकारण्य-प्रवेश आणि मागाहून चित्रकूटवन लागतें असें वर्णन केलें आहे (रघु. १२·९ व १५). खरा चित्रकूट वर निष्पन्न झालेल्या चतुःसीमांच्या हद्दींतच असला पाहिजे हें उघड आहे. होय, तो खुद्द विंध्यांतच आहे· तो आतां पाहूं या.

## २. चित्रकूट

बुंदेलखंडांतील नव्हे, मग खरा चित्रकूट कोणता ? विंध्यांतला किंवा ऋक्षपर्वतांतला रामगड चित्रकूटाच्या वर्णनाला कसा तंतोतंत जुळतो, हें पुढील प्रकरणांत पाहावयाचें आहे. एवढेंच काय पण इतका जुळणारा पर्वत याच भागांतच काय पण भारतांत कोठेंहि नाहीं. कारण सर्वांत मोठी खूण म्हणजे चित्रकूटांतलें कक्षबिल किंवा आरपार गुहा रामगडवर हाथिफोड गुहा या नांवानें आजही आढळते. रामायणानें व कालिदासानेंहि वर्णिलेलें हें अचूक वैशिष्ट्य फक्त रामगडच्या उंच डोंगरांत भेटतें. तथापि येथें आपण फक्त दिशेचा विचार करीत आहोंत. पहिला टप्पा दंडकारण्य, तो निश्चित झाला. आतां यापुढील टप्पे ठरल्यावर चित्रकूटाचें स्थळ यांच्या दरम्यान आहे हें ओघानेंच सिद्ध होईल. तथापि पुढें जाण्यापूर्वी एक मनोरंजक प्रमाण दाखल करतों. त्यावरून रामाच्या मार्गाची हीच दिशा होती, हें कळून येईल. रघुवंशाच्या बाराव्या सर्गांत 'चित्रकूटस्थलीं जहौ'— म्हणजे चित्रकूट सोडल्यानंतर राम ऋक्षपर्वतांतल्या ऋषींच्या आश्रमांत वास्तव्य करीत करीत दक्षिण दिशेला आला (श्लोक २५) व मग त्याला पंचवटी लागली (श्लोक ३१), अशी दिशा व क्रम सांगितला आहे.

[1]प्रययावातिथेयेषु वसन् ऋषिकुलेषु सः
दक्षिणां दिशमृक्षेषु वार्षिकेष्विव भास्करः॥

या श्लोकांत कालिदासाचें ज्योतिषशास्त्राचें ज्ञान दिसून येतें. त्याचा उपयोग करून त्यानें ही बहारीची उपमा दिली आहे. पण **त्यांतली खरी मौज व मर्म ऋक्ष हा द्व्यर्थी शब्द योजण्यांत आहे.** ऋक्ष म्हणजे नक्षत्र आणि पर्वताचें नांवही. तोच शब्द सूर्याकडे लावतांना नक्षत्र आणि रामचंद्राकडे लावतांना ऋक्ष-पर्वत असा अर्थ आहे. प्रो. उपाध्याय ( India in Kalidasa, p. 9 ) यांनी देखील हाच अर्थ स्वीकारला आहे. शब्दाचा मार्मिक श्लेष अथवा कोटि साधण्याची कालिदासाची हातोटी व आवड लक्षांत घेतां या श्लोकांत ऋक्ष शब्दाचे दोन्ही अर्थ अभिप्रेत आहेत व प्रतीत होतात यांत शंका नाहीं. यावरून अत्रि, शरभंग, शातकर्णी, सुतीक्ष्ण इ० ऋषींचे आश्रम ऋक्षपर्वताच्या आसपास होते हेंहि यावरून स्पष्ट दिसतें. हे सर्व आश्रम चित्रकूटापासून व एकमेकांपासून दहापांच मैलांच्या अंतरावर होते, असें रामायणांतहि म्हटलें आहे. आतां ' ऋक्ष-बिल ' असणारा रामगड म्हणजेच चित्रकूट हा ऋक्षपर्वताचाच भाग. ( येथेंच कालिदासाच्या चित्रकूट-वर्णनाचा रघु. १३ - ४७ हा श्लोक काढून पहावा म्हणजे लख्ख प्रकाश पडतो. ) तेव्हां राम दंडकारण्यांत शिरून ( = छोटा नागपूर प्रांत ) रामगडावर राहून ( = चित्रकूट ) नंतर पायथ्याशीं असलेल्या ऋक्ष - परिसरांतल्या तपोवनांत ऋषींचा पाहुणचार घेत घेत **दक्षिणेकडे** अगस्त्याश्रमांत जाऊन तसाच खालीं पूर्व गोदावरीच्या कांठीं पंचवटींत ( = भद्राचलम् ) आला. या मार्गाबद्दल शंका रहात नाहीं. उलटपक्षीं हल्लींच्या चित्रकूटाहून हल्लींच्या पंचवटीकडे म्हणजे नाशिकला जावयाचें म्हटलें तर ती ' दक्षिणां दिशम् ' होणार नाहीं, हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. बुंदेलखंडांतून नाशिककडे जाणाऱ्या रामाचें वर्णन कांटेकोर कालिदास, 'राम दक्षिण दिशेप्रत गेला' असें करणें शक्य आहे काय ? आणि त्याला दक्षिणायनांत उत्तरेकडून दक्षिण-दिशेकडे येणाऱ्या सूर्याची उपमा तो उपमाचतुर कवि देईल, हें तरी संभवनीय आहे काय ?

### ३. अगस्त्याश्रम

अगस्त्याश्रम नाशिकजवळ अगस्तिपुरी म्हणतात तेथें किंवा अकोला येथें होता, असें प्रतिपादन करतात. परंतु पंचवटी नाशिकजवळ हें गृहीत धरून अगस्त्याश्रम तिकडे नेलेला असावा. तथापि वर दाखविल्याप्रमाणें आधाराची टिकाणें नष्ट झाल्यानंतर त्या स्थल-निश्चितीच्या फंदांत सांपडलेला अगस्त्याश्रम

आता या भागांतून दुसरीकडे जाऊं शकत नाहीं. कदाचित् अगस्त्याचा दुसरा एखादा आश्रम नाशिकभागांत असूं शकेल. पण रामायणांतील व रघुवंशांतील अगस्त्याचा आश्रम रामगड आणि भद्राचलम् यांच्या दरम्यान असला पाहिजे, हें उघड आहे. असें ठिकाण म्हणजे जुन्या नकाशावर दाखविलेलें Rab Kop हें होय, असें अनुमान व माहिती बेगलरसाहेबांनीं नमूद केली आहे. त्याचेंच नांव बदलून हल्लीं धर्मजयगड असें ठेवलेलें आहे. तें हल्लींच्या नकाशांतून सांपडतें.

तथापि धर्मजयगड हें ठिकाण रामायणाला अभिप्रेत असेल असें दिसत नाहीं. कारण पंचवटीपासून म्हणजे गोदावरीपासून अगस्त्याश्रम फारसा दूर नाहीं. प्रथम विंध्य ओलांडून अगस्त्यऋषि दक्षिणेंत आला, त्या वेळीं त्याचा पहिला मुकाम व आश्रम या ठिकाणीं असण्याची शक्यता आहे. परंतु नंतर अधिक दक्षिणेकडे येऊन त्यानें गोदावरीच्या अलीकडे आपला आश्रम बांधला असावा. तोच रामायणाला व कालिदासालाहि अभिप्रेत आहे.

येथें अगस्त्याश्रम व चित्रकूट या दोहोंना उपकारक व त्यांची गांठ बांधणारा म्हणजे त्यांची परस्परसमीपता व दिशा दाखविणारा महत्त्वाचा रामायणांतर्गत पुरावा नमूद करतों. हा चित्रकूट कुठेंसा आहे, याचें निःसंदिग्ध गमक किष्किंधाकांडांत आलें आहे. सुग्रीवानें सीतेचा शोध सर्व दिशांना जाऊन करा असें हनुमान-अंगदप्रभृति सर्व वानरांना सांगितलें सर्व स्थळेंहि नांवनिशीवार दिग्दर्शित केलीं. त्यात महेंद्रपर्वताचा पत्ता सांगितला तो असा.

**अगस्त्येनांतरे तत्र सागरे विनिवेशितः**
**[1]चित्रसानुनगः श्रीमान् महेंद्रः पर्वतोत्तमः ॥**

म्हणजे महेंद्र पर्वत अगस्त्यानें सागरांत प्रतिष्ठापित केला असा अर्थ करतात. परंतु त्याला आधार नाहीं किंवा तशी कथाहि नाहीं. म्हणून 'अगस्त्येनांतरे' याचा अर्थ अगस्त्यऋषीच्या म्हणजे आश्रमाच्या जवळपास असा असावा. तथापि पहिला रूढ अर्थ पत्करला तरी देखील त्यावरून अगस्त्याचें व त्याच्या निवासाचें संनिधत्व सूचित होतेंच. आता हा महेंद्र म्हणजे पूर्वकिनाराभर पसरलेली ओळ समजत असले तरी गंगासागरसंगमाजवळचा पर्वत रामायणाला अभिप्रेत आहे यांत शंका नाहीं. कारण पुन्हा पुढच्याच श्लोकांत (कि० ४१.२१) महेंद्र पर्वत समुद्रांत शिरलेला (अवगाढः महार्णवम्) असें सांगितलें आहे. शिवाय देवर्षियक्षप्रवरसिद्ध-चारण इत्यादींनीं शोभित (श्लोक २२) असें म्हटलें आहे. चित्रकूटाच्या भागाचें

१ चित्रसानुनग — सानु म्हणजे कूट किंवा शिखर आणि नग म्हणजे पर्वत, यावरून चित्रकूटाच्या शिखरापर्यंतच्या रांगेचा समावेश महेंद्र या विस्तीर्ण पर्वतराजींत होत असावा, असें वाटतें. निदान चित्रकूट महेंद्राच्या लगत जरा पश्चिमेला होता हें तर निश्चितच आहे.

हेंच वैशिष्टय आहे. या खाणाखुणा ऐकून हनुमानप्रभृति वानर दक्षिण दिशेला जाऊन *विंध्यकाननांत हिंडूं लागले व विंध्याभोंवतीं फिरूं लागले* (कि० सर्ग ४९) आणि विंध्य पर्वतांतल्या *गुहा तपासूं लागले. तेथें त्यांना* **ऋक्ष-बिल** *नांवाची* ऋक्ष पर्वतांतली आरपार गुहा आढळली. हें ऋक्ष-बिल[1] आपल्या संशोधनाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें होय. हीच वैशिष्टयपूर्ण व अन्यत्र न आढळणारी खूण रामगड व चित्रकूट येथें सांपडत असल्यामुळें ते दोन्ही एकच, हा सिद्धान्त प्रस्थापित होतो. या ऋक्षबिलाचें व भोंवतालचें विस्तृत वर्णन रामायणांत आहे· पण आपला प्रस्तुतचा मुद्दा निराळाच आहे· त्या ऋक्षबिलांत वानरांना एक तापसी भेटली. तिनें केलेल्या पृच्छेला उत्तर देतांना हनुमान् म्हणतो—

अगस्त्याचरितां आशां दक्षिणां यमरक्षिताम् (५२·७)

यावरून अगस्त्यनिवासाच्या जवळपास हें विंध्यांतलें ऋक्षबिल किंवा चित्रकूट *असला पाहिजे हें स्पष्ट दिसतें. त्याच्यापुढचा या सांखळीचा आणखी* एक दुवा पहा. ऋक्षबिलांत शिरलेल्या वानरांना त्या स्वयंप्रभा नामक तापसीनें डोळे मिटायला लावून मग आपल्या तपोबलानें सर्वांना त्या गुहेच्या बाहेर क्षणार्धांत सुरक्षितपणें काढलें व त्यांना मार्गदर्शन केलें (५२·३१।३२).

एष विंध्यगिरिः श्रीमान् नानाद्रुमलतायुतः।
एष प्रस्रवणः शैलः सागरोऽयं महोदधिः॥

तिनें सांगितलें : हा विंध्य, त्याच्यापुढें हा प्रस्रवण आणि त्याच्यापुढें हा महासमुद्र दिसतो आहे पहा. बहुधा प्रस्रवण हें चित्रकूटाचेंच किंवा नजीकच्या पर्वताचें नांव असावें. नतर वानरवीर समुद्रापर्यंत गेले व तेथें महेंद्रपर्वतावर चढून हनुमानानें उड्डाण केलें व लंका गांठली.

यावरून समुद्र, महेंद्र पर्वत, चित्रकूट व अगस्त्य-आश्रम एकाच प्रदेशांत असावे, हें निःसंदिग्धपणें दिसतें. आणि ओरिसा व आसपासचा भाग हाच तो प्रदेश होय. आतांपर्यंतच्या आपल्या विवेचनाच्या दिशेला यामुळें केवढी बळकटी येते, हें वेगळें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

## कालिदासाचा अगस्त्य-आश्रम कुठें ?

शेवटीं यासंबंधींचें सर्वांत पक्कें व निर्णायक बोट दाखविणारें प्रमाण पहा. रामायणांतील अगस्त्याश्रमापासून दक्षिणेला थोड्या अंतरावर गोदावरीच्या काठीं

---

१ पुन्हा युद्धकांड सर्ग १२६ मध्यें या ऋक्षबिलातील वृत्तान्ताचा उल्लेख आला आहे. हनुमान् भरताला सर्व हकीगत निवेदन करतांना याविषयीं म्हणतो—

तेषां नो विप्रनष्टानां विन्ध्ये पर्वतसत्तमे। भृशं शोकाभितप्तानां महाकालोऽत्ययर्तत॥

यावरून हें ऋक्ष बिल विंध्यांतच होतें, यांत शंका रहात नाहीं. डॉ. नन्दलाल दे यांनीं हेंच मत व्यक्त केलें आहे. (Geographical Dictionary).

पंचवटी. कालिदासाचा अगस्त्याश्रम आणि पंचवटी तीच हें निर्विवाद आहे, म्हणून कालिदास अगस्त्याश्रम कुठें समजतो, हा महत्त्वाचा मुद्दा आहे. त्याचें खात्रीलायक गमक आपल्याला रघुवंशाच्या चवथ्या सर्गांत रघुदिग्विजयवर्णनांत सांपडतें. रघु राजा देश जिंकीत चालला त्यांचा क्रम असा. वंग (बंगाल), नंतर उत्कल (बिहार) आणि मग कलिंग (ओरिसाचा पूर्व भाग). तेथून तो तसाच खालीं **पूर्व किनाऱ्यानें** दक्षिणेकडे कावेरी नदी व मग पांड्यराजाच्या मुलखांत आला. या कलिंग आणि कावेरीनदीच्या दरम्यानच्या पूर्वकिनाऱ्यावरच्या भागालाच कालिदासानें **' अगस्त्याचरिता आशा '** म्हणजे अगस्त्य-संचारित दक्षिणदिशा असें म्हटलें आहे.

ततो वेलातटेनैव फलवत्पूगमालिना ।
**अगस्त्याचरितां आशां** अनाशास्यजयो ययौ ॥ (श्लोक ४४)

या ठिकाणीं अगस्त्य याचा अर्थ तारा नसून ऋषि व आशा याचा अर्थ दिशेपेक्षां प्रदेश असा अभिप्रेत आहे, हें संदर्भावरून स्पष्ट दिसतें. हा 'अगस्त्याचरिता आशा' हा शब्दप्रयोग कवीनें कुठून आणला ? रामायणातली माहिती, कथानक, कल्पना एवढेंच नव्हे तर जसेच्या तसे शब्दप्रयोगहि उचलून घेणाऱ्या कालिदासानें ही शब्दयोजनाहि रामायणांतून घेतली हें उघड आहे. अशा क्षम्य व रम्य उसनवारीचीं नमुनेदार उदाहरणें पुढें 'रामायणाचें ऋण' या सहाव्या झोताच्या उजेडांत दाखविलीं आहेत. 'अगस्त्याचरितां आशाम्' हा हनुमानानें वापरलेला शब्दप्रयोग (कि. ५२·७) कवीनें उचलून रघुवंशांत वापरला आहे. यावरून अगस्त्याचा संचार व आश्रम कालिदास **पूर्वकिनाऱ्यावर** गोदावरीच्या आसपास मानीत होता, याबाबत शंका रहात नाहीं. शिवाय ओरिसा-मार्ग हाच उत्तरेंतून दक्षिणेकडे येण्याचा तत्कालीन मार्ग होता, हेंहि यावरून दिसतें. रामचंद्र याच मार्गानें आला.

येथें आणखी एका कालिदासाच्या अगस्त्याविषयक उल्लेखाचा विचार करणें योग्य होईल. रघुवंशाच्या सोळाव्या सर्गांत ग्रीष्म ऋतु म्हणजे उन्हाळा सुरू झाल्याचा प्रसंग आहे. त्या ठिकाणीं सूर्यभ्रमणाचा निर्देश आहे. सूर्य दक्षिण दिशा सोडून उत्तरेकडे येतो त्या वेळीं उत्तरेकडील बर्फ वितळतें, या नैसर्गिक घटनेचा उपयोग करून उत्तर दिशा जणूं आनंदाचे शीत अश्रु गाळवे, अशी मनोहर उत्प्रेक्षा कवीनें केली आहे. पण आपल्याला फक्त दिशेच्या उल्लेखापुरतें पाहावयाचें आहे.

अगस्त्यचिह्नात् अयनात् समीपं
दिगुत्तरा भास्वति संनिवृत्ते ॥

याहि श्लोकांत कालिदासाचा सुंदर श्लेष प्रतीत होतो. सूर्य दक्षिणायनांत दक्षिणकडे सरकत एका ठराविक बिंदूपर्यंत जातो व तेथून तो पुन्हा उत्तरेकडे परततो.

'रथयुज परिवर्तितवाहनः' इत्यादि श्लोकांत (रघु० ९·२५) तीच कल्पना आहे. अगस्त्यचिन्ह हा शब्द ज्योतिषशास्त्रीय घटनेला उद्देशूनहि कदाचित् असेल. (विजापूरचे ज्योतिषशास्त्रज्ञ श्री. केतकर यांचा हा शब्द कालिदासानें पारिभाषिक अर्थानें वापरला, असा दावा आहे तथापि प्रो. आपटेप्रभृति तज्ज्ञांच्या मतें तो सिद्धान्त टिकण्यासारखा नाहीं.) तें कसेंहि असो, अगस्त्यऋषीची खूण किंवा आश्रमस्थान असणारी म्हणजे दक्षिण दिशा असा अर्थ मात्र त्यांत मार्मिक बुद्धीला व्यक्त झाल्यावेरीज रहात नाहीं. दक्षिण दिशा व हा भाग कालिदासाच्या डोक्यांत अगस्त्याशीं पक्का निगडित झालेला आहे, हें स्पष्ट दिसतें. यावरून कालिदासाचा *अगस्त्याश्रम व म्हणून पंचवटीहि पूर्व गोदावरीनजीकच असली पाहिजेत.* आतां उलट ताळा पहा. हल्लींच्या समजुतीप्रमाणें अगस्त्य व पंचवटी नाशिकची म्हटली, तर *या अति-पश्चिमेकडून पूर्वेकडे किंवा फार तर ईशान्येकडे जाणाऱ्या मार्गाला* व दिशेला उपमाचतुर कालिदास दक्षिणोत्तर संचार करणाऱ्या सूर्याची उपमा खासच देणार नाहीं, हें रसिकांना सहज पटेल.

कालिदासाचा व रामायणाचा अगस्त्याश्रम पूर्व गोदावरीनजीक होता.

### ४. जनस्थान

वास्तविक पंचवटी व पांचवें जनस्थान यांचा एकत्र विचार करावयास हवा इतकीं *तीं समीपवर्ती व एकमेकांत गुंतलेलीं आहेत.* तथापि येथें केवळ सोयीसाठीं जनस्थानाला वेगळें काढलें आहे. जनस्थानांत पंचवटी कीं पंचवटींत जनस्थान *असा संशयकल्लोळ क्वचित् टीका-ग्रंथांतून दृष्टीस पडतो परंतु या दोन्ही भूमिका* बरोबर नसून पंचवटी जनस्थानाला चिकटून सीमारेषेवर होती, असें दिसतें. कारण *पंचवटी ही गोदावरीकांठची एक रमणीय जागा होती. आणि* जनस्थान हा तेथपासून सुरू होऊन खालीं थेट हिंदुस्थानच्या दक्षिण टोकापर्यंत पसरलेला विस्तृत भूप्रदेश असावा. येथें राक्षसांची वसती व वर्चस्व होतें. खर-दूषणप्रभृति चवदा हजार राक्षसांचें सैन्य येथूनच पंचवटींतल्या रामावर चालून गेलें. त्याअर्थी जनस्थान राक्षसाधिप रावणाच्या लंकेसमीप किंबहुना त्याच्या अंमलाखालीं असावें. म्हणजेच हिंदुस्थानच्या दक्षिणेकडील अखेरच्या त्रिकोणी टोंकापर्यंत तें भिडलेलें होतें. *जनस्थान शब्दावरील टीकेंत 'रावण सीमानम् जनस्थानाख्यं नगरम्' या* कतकदेवाच्या व्याख्यानानें वरील तर्काला बळकटी येते. शिवाय कालिदासदेखील जनस्थानाची अशीच व्याप्ति समजत होता, हें दाखवून देतां येतें. जनस्थान हा प्रदेश पांड्यराजाच्या समीप किंबहुना हद्दीला हद्द लागलेला होता, असा रघुवंशांत (सर्ग ६·६२) उल्लेख आहे. शेजारचा प्रबळ पांड्यनृपति जनस्थानावर स्वारी करील या भीतीनें लंकेश्वर अस्वस्थ झाला (जनस्थानविमर्दशंकी) या वर्णनामुळें जनस्थानाशीं रावणाचा संबंध व समीपता स्पष्टपणें सूचित होते. जनस्थान हा हल्लीं

म्हणतात त्याप्रमाणें नाशिकजवळ अगर फक्त गोदावरीजवळच असतें तर लंकाधिपतीला जनस्थानविमर्दाशी होऊन पांड्य राजाशीं घाईघाईनें तह करण्याची जरूरी नव्हती. शेवटीं कालिदासाचा आणखी एक अंतर्गत पुरावा सादर करतो. रघुवंशाच्या तेराव्या सर्गात राम सीतेसह लंकेहून विमानमार्गानें परत येत असल्याचें वर्णन आहे. त्यांत लंका सोडल्यानंतर समुद्र ओलांडून होतांच दक्षिण किनाऱ्यावर **भारताच्या भूमीवरचें पहिलें ठिकाण** राम पहातो व वर्णन करतो तें म्हणजे जनस्थान हें होय (श्लोक २२). यावरून वरील निष्कर्षच दृढ होतो. अशा या जनस्थानाला नाशिकपेक्षां भद्राचलमृची पूर्वगोदावरीवरची पंचवटी अधिक समर्पकतेनें जुळते, हें सहज लक्षांत येईल. शिवाय प्रयागपासून आपण रामाची पावलें शोधीत अगस्त्याश्रमापर्यंत येऊन पोंचलों आहोत. तेथून दक्षिणेला आलें म्हणजे पूर्वगोदावरीच लागणार. रामायणाच्या नकाशाप्रमाणें पूर्वीची सर्व ठिकाणें व खुणा जमत चालल्या, मग पुढें पंचवटीदेखील येथेंच दिसणार नाहीं काय? आतां पंचवटीच पहावयाची आहे.

### ५. पंचवटी

राम वनवासात चित्रकूट म्हणजे रामगड सोडल्यानंतर अनेक ऋषींच्या आश्रमांत मुक्काम करीत करीत दक्षिणेकडे सरकत सरकत अगस्त्याश्रमीं येऊन पोहोंचला व नंतर समीप असलेल्या गोदावरीकांठच्या पंचवटींत पर्णकुटी बांधून राहिला, असें रामायणांत वर्णिलें आहे. कालिदासाचें रघुवंशांतील वर्णनहि हुबेहूब तसेंच आहे. या दोहोंतील दिशादर्शक उल्लेखांचे महत्त्वाचे निवडक श्लोक प्रकरणारंभीं नमूद केले आहेत.

तात्पर्य, रामगडकडून बिहार-ओरिसांतून दक्षिणेंत राजमहेंद्रीजवळ पूर्वगोदावरीसमीप येऊन भिडलेला राम आतां नाशिकला कशा जाणार? नाशिककडे म्हणजे पार पश्चिम टोंकाला जाण्याचें प्रयोजन काय? आणि थेट पश्चिम दिशेकडे किंवा नाशिकभागाकडे रामाचा रोख होता, असें दाखविणारा उल्लेख रामायणांत किंवा कालिदासांत तरी कुठें आहे? मूळ म्हणजे रामायणातली ऐतिहासिक पंचवटी रामगड व पूर्वगोदावरीच्या उत्तरेला भिडलेलें जनस्थान याना जोडणाऱ्या दक्षिणोत्तर रेषेवर असली पाहिजे. रामाची पंचवटी राजमहेंद्रीजवळ समुद्राला अनेक मुखानीं मिळूं पहाणाऱ्या गोदावरीच्या कांठीं होती. तेथेंच जवळ अगस्तिमलय किंवा अगस्तिमले नावाचा गांव व डोंगर आहे, ही सूचक गोष्ट फार महत्त्वाची आहे. राम-सीता रहात होते त्या पचवटींतल्या त्यांच्या पर्णकुटीपासून जवळच हत्ती जलक्रीडा करीत असल्याचें वर्णन रामायणात आहे. नाशिकजवळ तर गोदावरीचा उगम आहे. तेथील प्रवाहांत हत्ती जलक्रीडा कशी करणार? त्याला पात्र रुंद हवें. अर्थात् पूर्वगोदावरीचा विस्तृत प्रवाह या ठिकाणीं अभिप्रेत आहे, यावरूनहि प्रस्तुतचा स्थलसिद्धान्तच दृढ होतो.

रामगडहून अगस्त्याश्रमाकडे किंवा नंतर पंचवटीकडे येणाऱ्या रामाला कालिदासानें दक्षिणायनांत उत्तरेकडून दक्षिणेकडे सरकणाऱ्या सूर्याची उपमा दिली आहे. आतां रामगडाहून नाशिकजवळच्या अगस्त्याश्रमाकडे किंवा पंचवटीकडे जावयाचें म्हटलें तर ही दिशा किंवा मार्ग पूर्वेकडून पश्चिमेकडे असा होतो. त्याला उत्तरेकडून दक्षिणेकडे भ्रमण करणाऱ्या सूर्याची उपमा जुळत नाहीं हें उघड आहे.'

महाराष्ट्र हेंच पूर्वीचें दंडकारण्य अशी चुकीची समजूत प्रचलित व दृढ झाल्यामुळें नाशिकची पंचवटी उत्पन्न झाली आहे, तिकडे राम गेले नाहीत.

## 'नाशिक' या नांवाचा खोटा व खरा इतिहास

नाशिक या नांवासंबंधीं एक शूर्पणखाविषयक दंतकथा प्रचलित आहे. परंतु ती खरी नाहीं. सुप्रसिद्ध रामायणसंशोधक श्री. आबा चांदोरकर यांनीं हिंदुस्थानभर प्रवास करून तीं तीं स्थळें पाहून सूक्ष्म संशोधनानंतर नाशिक-पंचवटी चुकीची असून खरी पंचवटी पूर्व गोदावरीजवळ आहे, असेंच मत प्रकट केलें आहे. (चांदोरकरांची मुलाखत: 'रविवार सकाळ', ता. २६-७-५३) नाशिकसंबंधीं श्री. चांदोरकर म्हणतात :—

> नाशिक नांवामागील इतिहास पाहिला तरी वरील गोष्टीलाच पुष्टि मिळते. रावणाची बहीण शूर्पणखेचें नाक लक्ष्मणानें कापलें. तें जेथें पडलें तें ठिकाण पुढें नाशिक नांवानें ओळखलें जाऊं लागलें, अशी एक कथा सर्वश्रुत आहे. पण 'नाशिक' शब्दाची खरी कथा ती नव्हे. दक्षाची कन्या उमा. बापानें यज्ञाचें आमंत्रण दिलें नाहीं म्हणून तिनें यज्ञकुंडात उडी घेतली. तिचें प्रेत महादेवानें तुकडे-तुकडे करून निरनिराळ्या दिशांना फेकून दिलें. ते जेथें जेथें पडले तेथें तेथें देवीचें स्थान निर्माण झालें. तिचें नाक नाशिकजवळ पडलें म्हणून त्या ठिकाणास नाशिक हें नांव पडलें.

त्याचप्रमाणें त्यांचें 'शबरी' या नांवाचें संशोधन लक्षांत घेण्यासारखें आहे :

> वनवासांत शबरीनें रामाची भेट घेतल्याचा उल्लेख आहे. शबरी नांवाची नदी आंध्र प्रांतांत आहे. तिच्या कांठीं शबर या वन्य जमातीचे लोक अद्यापहि रहातात. त्यांची संख्या चार लाखावर आहे.

हल्लींच्या मध्यप्रदेशांत शेवरीनारायण नांवाचें प्राचीन स्थान बिलासपुराजवळ आहे. त्या ठिकाणीं शिल्लक प्राचीन देऊळ अजूनहि उभें आहे. येथें

शबरीशीं (= शेवरी) गांठ पडली, असा इतिहास व परंपरा आहे. (सविस्तर वृत्तान्त ६ व्या प्रकरणांत पहा.) या भागांत रहाणाऱ्या कोल लोकांमध्यें शबरीच्या व रामाच्या अनेक कथा व गीतें प्रचलित आहेत. राम-शबरी भेटीचें स्मारकभूत असें हें स्थान व त्या परिसरांतील जुना इतिहास यांवरून रामाच्या प्रस्तुत वनवास-मार्गालाच दुजोरा मिळतो.

आतांपर्यंत दंडकारण्य, चित्रकूट, अगस्त्याश्रम, पंचवटी व जनस्थान हे राममार्गावरचे पांच महत्त्वाचे टप्पे दिग्दर्शित केले. हीं नवनिश्चित स्थळें कशीं सलग, संबद्ध व स्वाभाविक आहेत, हे सहज दिसेल. शिवाय त्यांना रामायणाचा व कालिदासाचा आधार आहे, हेंहि आम्हीं दाखविलें आहे. त्यावरून अयोध्या ते राजमहेंद्री हा सरळ दक्षिणोत्तर मार्गच वनवासाचा होता, याबद्दल शंका रहात नाहीं.

शेवटीं हाच राम–मार्ग खरा, याबद्दलचें सर्वांत प्रबळ असें प्रमाण मांडतों. रामायणांत रामाचा मार्ग स्थलवार असा दोनदां वर्णिलेला आहे. एकदां जातेवेळचा व पुष्पक विमानांतून परत येते वेळचा. त्याचप्रमाणें कालिदासाच्या रघुवंशामध्यें तेराव्या व बाराव्या सर्गांत राम-मार्गाचीं उलटसुलट वर्णनें आलीं आहेत. रामायणा-प्रमाणें कालिदासाचा प्रधान हेतु इतिहास-कथन नसून काव्य-निर्मिति हा होता. म्हणून त्यानें नीरस स्थळें सोडून देऊन शेलक्या स्थळांवर आपल्या रसान्वेषी कलेची चोंच कामापुरती कशी नेमकी मारली आहे, हेंहि त्यावरून कळून येतें. तथापि या कविद्वयानें वर्णिलेला स्थळ-क्रम आणि दिशा सुसंगत व एकच आहेत, हें चटकन् ध्यानांत येण्याकरितां वाल्मीकि व कालिदास या उभयतांच्या मार्गाचें तौलनिक कोष्टक तयार करून पुढील पानावर देण्यांत येत आहे.

---

**पंचाप्सरस् सरोवर :**—वर प्रतिपादित केलेला राममार्ग दृढ करणारें आणखी एक गमक आम्हास सापडलें आहे परतु तें उशीरा हातीं लागल्यामुळें येथें विस्तारानें दाखल करता येत नाहीं. चित्रकूट आणि पचवटी याच्या दरम्यान पचाप्सरस् नांवाचें विस्तीर्ण सरोवर राममार्गावर होतें, असें वर्णन रामायण व रघुवंशातहि आहे (वर दिलेलें कोष्टक पहा.) हल्ली या सरोवराचा छडा नक्की लावता येत नाहीं. म्हणून हल्लीच्या राममार्गाशीं जुळत नसणाऱ्या बेतानें तें नाशिकच्या जवळपास मानावें असें सशोधक सागतात. परतु The List of Ancient Monuments in the Chota Nagpur Division यात सदरचे सरोवर छोटा नागपूर भागातल्या उदयपूर संस्थानात असें म्हटलें आहे. हें ठिकाण धर्मजयगडापाशीं रामगडच्या दक्षिणेला येतें. हे विधान मी तपाशीत असताना तें बरोबर असल्याचीं प्रमाणें मिळालीं. त्याची सविस्तर चर्चा प्रस्तुत लेखकाच्या आगामी New Light on Kalidasa and his Meghaduta या ग्रथात पहावी पंचाप्सर सरोवराच्या या स्थलनिश्चयानें रामाचा प्रस्तुत प्रकरणात प्रस्थापित केलेला मार्ग अधिकच सुप्रतिष्ठित होतो.

—लेखक

असो. यांत एखादा दुसरा ऋषीचा आश्रम मार्गेपुढें झाला असला तरी दोघांचा राम-मार्ग तोच आहे, हें सहज दिसून येईल. म्हणजे कालिदासाचा मार्ग कळला कीं रामायणाचा मार्ग ठरतो. मग कालिदास कोणता मार्ग समजत होता ? कालिदासाचा चित्रकूट कोणता ? सुदैवानें या बाबतींत कालिदासाचें वर्णन निःसंदिग्ध आहे. त्यानें रामाकरवीं खऱ्या चित्रकूटाकडे नेमकें बोट दाखविलें आहे. तें अचूक वर्णन पहा :

धारास्वनोद्गारिदरीमुखोऽसौ । शृंगाग्रलग्नांबुदवप्रपंकः
बध्नाति मे बंधुरगात्रि चक्षुः । दृप्तः ककुद्मानिव चित्रकूटः

चित्रकूट पर्वत भव्य व उंच होता. त्याला शिखरें ( बहुधा दोन ) असून तीं निमुळतीं होत आकाशांत गेलीं होतीं. इतकीं कीं, त्यावर ढग येऊन लागत. त्या पर्वताच्या माथ्यावर एक लांबलचक दरी म्हणजे आरपार गुहा होती व त्यांत झऱ्याच्या पाण्याची धार पडत असून त्याच्या ध्वनीनें व प्रतिध्वनीनें ती गुहा निनादित होत होती. या नैसर्गिक सामुग्रीवर कवीनें आपल्या शैलीनुसार मोहक पूर्णोपमा रचली आहे. पर्वताच्या शिखरांवर ओथंबलेले काळे ढग, त्याखालीं लांबट गुहेंतून पडणारें पाणी आणि त्याचा आवाज यामुळें तो चित्रकूट पर्वत वप्रक्रीडेमुळें शिंगांच्या टोंकांना माती चिकटलेला आणि तोंड उघडून लाळ गळणारा व मोठ्यांदा गरजणारा मस्त रानबैल दिसावा तसा होता. या उपमेंतील तपशील फोडून खालीलप्रमाणें देतां येईल.

| | |
|---|---|
| चित्रकूट पर्वत | = मस्त रानबैल |
| माथ्यावरची लांबट गुहा | = बैलाचें तोंड ( उघडलेलें ) |
| गुहेंतून पाझरणारें पाणी | = मस्त बैलाच्या तोंडांतील लाळ व त्याचा आवाज व त्याचें रेंकणें किंवा गर्जना |
| शिखरें | = शिंगें |
| शिखराग्रांना बिलगलेले काळे ढग | = शिंगांच्या टोंकांना लागलेला चिखल |
| दृप्त म्हणजे अरण्यानें वेढलेला | = दृप्त म्हणजे रानटी |

कालिदासाच्या काव्यरचनेंतलीं विशेषणें बहुधा उपमेय आणि उपमान या दोघांनाहि सारख्याच समर्पकतेनें लागू पडतील अशीं उभयान्वयी योजलेलीं असतात, याचें हा श्लोक व त्यांतील ' दृप्त ' शब्द हें एक उत्कृष्ट उदाहरण होय. असो. हल्लींचा मानीव चित्रकूट उंच नसून ठेंगू आहे. त्यांत गुहा नाहीं, पाणी नाहीं, शिखर नाहीं आणि म्हणूनच याला ढग ओथंबण्याचा संभव नाहीं. हा दृप्त म्हणजे दाट अरण्यानें वेढलेलाहि नाहीं. उलटपक्षीं हें सर्व वर्णन रामगडला व त्यांतील हाथिफोड गुहेला आणि निर्झराला कसें तंतोतंत व चपखल लागू पडतें. हें सुज्ञ वाचकांना वेगळें सांगावयास नको. कालिदासाचा चित्रकूट म्हणजे रामगड

हरणाचें धाडस रावणानें केलें असावें असें दिसतें.[1] ही जनस्थानाची दिशा आणि पुढील कथाभाग व प्रारंभींचा रामाचा दक्षिण दिशेकडे रोख आणि पूर्ववृत्तान्त या दोहोंच्यामध्यें प्रयाग-पंचवटीच्या मार्गाचा सांधा किती बेमालूम बसतो पहा. भारताच्या सुपीक भूमींत दंतकथांचें व अंधपरंपरेचें पीकहि भरपूर येतें. एखाद्या तत्त्वाचें किंवा स्थळाचें खोटें नाणें लोकाच्या बाजारीं चालूं झालें कीं दीर्घकाळ मान्यता पावतें. त्याचेंच हें उदाहरण होय. परंतु रामचंद्र बुंदेलखंडातल्या चित्रकूटाहून नाशिककडे गेले, ही समजूत चुकीची व निराधार आहे. राम प्रयागहून निघाला तो विंध्यांतल्या रामगडमार्गें गोंडवनांतून राजमहेंद्रीजवळ पूर्व गोदावरीकांठच्या पंचवटींत आला. हाच रामाचा खरा मार्ग. कालिदासानें मेघाला सांगितल्याप्रमाणें कोणताहि मार्ग 'प्रयाणानुरूप' हवा. म्हणजे कसा? निघण्याचें स्थळ पोंचण्याचें ठिकाण, वाटेंतले मुक्काम यांना धरून; शक्य तितका सरळ म्हणजे जवळचा निसर्ग-अविरोधी, कारणाखेरीज वांकडा किंवा आडवळणें न घेणारा; सापेक्षतेनें बिनधासाचा, संकटें, अडचणी कमी येतील असा; शक्य तर शुभ, रमणीय, सुखावह; सत्प्रवृत्त व आतिथ्यशील लोक रहात असतील असा; संचाराचा हेतु पूर्ण होण्यासारखा असेल असा. या अटी जुळतील असा एवढाच मार्ग. रस्ता कल्पनेतून निघत नाहीं, गरजेंतून निघतो. उतार शोधणाऱ्या नदीप्रवाहाप्रमाणें. रामचंद्राचा मार्ग जितका ध्येयानुसारी तितकाच नैसर्गिक. प्रयाग ते रामगडद्वारा पूर्वगोदावरी हाच रामाचा खरा रस्ता. तो दर्शविण्याकरिता वाल्मीकि व कालिदास यांनीं लिहून लावलेल्या पाट्या आपण वाचल्या. कालगतीनें कांहींचीं अक्षरें उडालीं आहेत, कांहीं ठिकाणीं खाडाखोड आहे, कांहीं जणानीं त्यांत स्वतःची 'दुरुस्ती' दडपली आहे! तथापि

---

१ किंबहुना या बाबतींत अनुमान करण्याचीहि जरूर नाहीं. कारण येथें आलेला रावण सीतेला चक्क बोलूनच दाखवितो—'राक्षसाणां अयं वासः। इकडे देव-गंधर्व सुद्धा फिरकत नाहींत. तुम्ही कशाला आलात?' पुराणांतील पाल्हाळ सोडून द्या पण ऐतिहासिक दृष्टीनें रावणाचा राग का होता, हें यावरून नेमकें दिसून येतें. आर्य-अनार्यांचा संघर्ष हें मूळ. रामायण हा त्याचाच आविष्कार व विस्तार—कांहीं काल्पनिक, बराचसा ऐतिहासिक याविषयीं आणखी एक पुरावा पहा. श्री. आबा चांदोरकर यांनीं गोंडवनांत तीन महिने मुक्काम करून तेथील वन्य लोकांच्या चालीरीतीचें निरीक्षण केलें. त्यासंबंधीं सांगतांना ते म्हणाले—"तेथील लोक स्वतःला रावणाचे वंशज मानतात. महाराष्ट्रांत प्रत्येक खेड्यांत जसें मारुतीचें देऊळ असतें, त्याप्रमाणें त्या जमातीच्या प्रत्येक खेड्यांत रावणाची मूर्ति असते. विजयादशमीला तिची सार्वजनिक पूजा करण्यांत येते." (सकाळ, ता. २६-७-५२) यावरून गोंडवन भागांत म्हणजे विंध्यापर्यंत राक्षसांची वसति व वर्चस्व होतें, असें स्पष्ट दिसतें. शिवाय रामगडावर रावणाची मूर्ति कशी आली या कोड्याचाहि उलगडा वरील माहितीमुळें काहीं अंशीं होतो.

आजहि गोंडवन भाग म्हणजे मध्यप्रदेश व ओरिसांतील जिल्ह्यांना दंडकारण्य म्हणतात, ही गोष्ट सूचक आहे. आता तेथील जंगल तोडून निर्वासितांची वसति करण्याची सरकारी योजना हल्लीं चालू आहे.

त्यांतील मूळाक्षरें व संकेत स्पष्ट आहे. तो हाच मार्ग दाखवितो. कालिदासानें रघुवंशाच्या १० ते १५ या सर्गांतून रामकथा वर्णिली आहे. त्यांतील सर्व तपशील व रामाचा मार्ग वाल्मीकीवरून घेतलेला आहे, ही गोष्ट सहज प्रस्थापित होण्यासारखी आहे. प्रकरणारंभीं रामायण व रघुवंश यांतील एतद्विषयक अवतरणें दिलीं आहेत. त्यांवरून कालिदासाचा राम-मार्ग चित्रकूट सोडल्यानंतर ऋक्षपर्वतांतून दक्षिणेकडे असा स्पष्ट आहे. म्हणजे कालिदास रामगडला चित्रकूट समजत होता, आणि पंचवटी राजमहेंद्रीजवळ पूर्वगोदावरीच्या कांठीं मानीत होता, याबाबत शंका रहात नाहीं. अर्थात् वाल्मीकीचा म्हणजे रामाचा वनवासांतील मार्ग तोच असला पाहिजे, हें उघड आहे.

राम राहिलेला मेघदूतांतील रामगिरि रामायणांतील रामाच्या वाटेवर सांपडणार म्हणून आपण राम-मार्ग शोधला. रामाच्या वाटेंतूनच मेघाची वाट फुटते. म्हणजेच रामाचा चित्रकूट तो यक्षाचा रामगिरि. तो या दोन मार्गांच्या संगमावर उभा आहे. हा संगम हल्लींच्या रामगड पर्वतावर झालेला दिसतो. म्हणून आतां त्याच्याकडेच वळूं.

* * *

# झोत ५ वा

# ऋक्षविल हीच हाथिफोड गुहा

अहो नवनवाश्चर्यनिर्माणे रसिको विधिः ।

—कथासरित्सागर

मागाल प्रकरणांत ऐतिहासिक चित्रकूटाचा शोध करतां करतां आपण राम-सीताच्या मागोमाग रामगडापाशीं येऊन थडकलों आहोंत. कारण अयोध्येहून निघालेल्या वनवासप्रस्थित रामाच्या 'रघुपतिपदा' चा माग आपल्याला प्रयाग ते भद्राचलम् म्हणजे पूर्वगोदावरी या वाटेवर सांपडतो. त्यामुळें हल्लींचा तथाकथित 'चित्रकूट' आपल्या मार्गांतून आपोआप दूर झाला, म्हणजेच चुकीचा ठरला. प्रस्तुत संशोधनाचा केंद्रबिंदु, रामाच्या वनवासाचा मध्यबिंदु आणि मेघदूत काव्याचा प्रारंभबिंदु असा जो रामगडपर्वत तोच प्राचीन चित्रकूट हें आतां सहजच निष्पन्न होतें. तथापि मध्यंतरींच्या दीर्घ काळांत इतिहासाची सांखळी तुटली. एकमेकांत अडकविलेले दुवे पांगले. चालत आलेली पूर्वपरंपरा व माहिती मध्येंच गडप झाली. त्यामुळेंच कीं काय, नवीन परंपरा कल्पनेंतून शोधून काढल्या गेल्या आणि मनुष्यस्वभावानुसार त्या अंधश्रद्धेवर पोसल्या जाऊन बद्धमूल झाल्या आहेत! अशा प्रक्रियेनें व पद्धतीनेंच बुंदेलखंडांतील चित्रकूट, नाशिकाची पंचवटी, पश्चिमेकडची अगस्त्यपुरी व इतर कित्येक ठिकाणें सहेतुक चुकांतून निर्माण झालीं आहेत. पूर्वी गतानुगतिकत्वामुळें आणि आतां अगतिकत्वामुळें तीं मान्य करावीं लागत आहेत. पण हीं खरीं नाहींत. रामगड हाच खरा चित्रकूट हें आपण दिशेवरून (Location) पाहिलें. पण हे उभय पर्वत एकच आहेत. याची खात्री पटविणारी एक स्थानिक जबरदस्त खूण या प्रकरणांत सांगावयाची आहे. ती म्हणजे रामायणात वर्णिलेली विख्यातली अद्भुत, विस्तीर्ण व आरपार अशी ऋक्षविल गुहा होय. उत्तुंग चित्रकूटावरच्या माथ्यावरची ही विलक्षण गुहा म्हणजेच उंच रामगडवरची हल्लींची हाथिफोड गुहा. वाल्मीकि व कालिदास या उभयतांनीं केलेलीं चित्रकूट व त्यावरील गुहेचीं रेखीव वर्णनें रामगडाशीं आजहि तंतोतंत जुळतात. विशेषत: या रमणीय गुहेचें वैशिष्ट्य पाहिल्यानंतर हेंच तें ऋक्ष-बिल आणि हाच तो चित्रकूट याचा प्रत्यय आल्यावाचून रहात नाहीं. संशोधकाच्या संशयी मनाचेंहि समाधान होतें. इतके दिवस शापग्रस्त दुष्यंताप्रमाणें समोर दिसत असतांहि या स्थलीची व पूर्ववृत्ताची आपल्याला विस्मृति झालेली होती शचीतीर्थावस्था

मायाच्या पोटांत दुष्यंत अशी नामाक्षरें कोरलेली खुणेची अंगठी सांपडल्यावर राजाला शकुंतला आठवली व ओळख पटली. रामगड पर्वताच्या पोटांतली, रामपदचिन्हें कोरलेली प्रचंड गुहा ही चित्रकूटाचें अभिज्ञान पटविणारी मुद्रिकाच होय, असें वाटल्याखेरीज रहात नाहीं. गुहा असलेलें हें पर्वतशिखर म्हणजे प्रस्तुत सिद्धान्ताचा कळस होय ती आतां पाहूं.

## ऋक्ष-बिल

ऋक्ष-बिल म्हणजे ऋक्षपर्वतांतली आरपार गुहा. बिल किंवा बिल याचा अर्थच तो. या गुहेचें रामायणांतलें वर्णन पहा. दुर्लंघ्य, लांबलचक व विस्तीर्ण (दुर्ग, योजनायत), ही विश्वकर्मा मयानुरानें निर्मिली म्हणून अद्भुत. विच्या आसपासचा भाग डोंगरी झाडझुडपांनीं व रानवेलींनीं गजबजलेला. गुहा अरण्यांतील लता-वृक्षांनीं वेढलेली. तिच्यांतून क्रौंच, हंस, सारस व चक्रवाक पक्षी जलार्द्र असे बाहेर पडत होते. चक्रवाकांचीं अंगें पद्मरेणूंच्या संयोगानें तांबडीं दिसत होतीं. ती गुहा घोर, दुरतिक्रम व सुगंधित होती. ती पाहून हनुमान् प्रभृति वानरवीर विस्मयव्यग्र झाले. गुहेच्या द्वाराजवळ थोरे व हिरवेगार वृक्ष होते. यावरून व बाहेर पडणाऱ्या पक्ष्यांच्या भिजलेल्या अंगांवरून आंत पाण्याची विहीर किंवा जलाशय असावा असा तर्क कांतारवनकोविद हनुमानानें गुहाप्रवेशापूर्वीच केला होता. त्या अंधाऱ्या गुहेत चंद्रसूर्यांच्या किरणांना प्रवेश नव्हता (अचंद्रसूर्य). वानर आंत गुदमरल्या-सारखे झाले. तेथें अनेक तऱ्हेचे (साल, ताल, तमाल, पुन्नाग, चंपक, नाग इ. इ.) चकाकणारे प्रचंड 'कांचनवृक्ष' होते. वेलींनीं व फुलांच्या गेंदांनीं सचित असल्या-मुळें त्या वृक्षांनीं सोन्याचे दागिने अंगावर घातले आहेत, असा भास होत होता (हेमाभरणभूषितान्). तेथील प्रसन्नसलिलांत कमळें फुललेलीं होतीं. निळ्या व सोनेरी रंगांच्या कमलिनीभोंवतीं पक्षी पोहत होते. सोनेरी भूमीवर (वेदिका) सोनेरी वृक्ष (हिरण्मय). पुन्हा बालरवीप्रमाणें (म्हणजे तांबूस-सोनेरीच) भासणारे कांचनवृक्ष. पुष्प-फलांनीं डवरलेले वृक्ष. भुंगे पिवळ्या रंगाचे (कांचनभ्रमर). पुन्हा पुढच्या सर्गांत (किष्किंधा ५१) या गुहेला विवर म्हटलें असून त्यांत कांचनवृक्ष, विमलजलांत सोनेरी कमळें आणि मासेसुद्धां सोनेरी. अशा या ऋक्षां-तल्या अजब गुहेचें ठिकाण (location) नेमकें रामगडाजवळ येथें, हें मागील प्रकरणांत दाखविलें आहे. सबंध रामायणांत दोनच गुहांचें वर्णन आहे आणि त्याहि राम ज्या दोनच पर्वतांवर राहिले त्यांतल्या आहेत. एक ऋष्यमूक आणि दुसरा चित्रकूट. म्हणजेच ऋक्ष किंवा विंध्य. ऋष्यमूक निर्विवादपणें गोदावरीच्या दक्षिणेस असल्यामुळें त्याचा प्रश्न येत नाहीं. तेव्हां चित्रकूटांतली (= किंवा मलयवनांतली) एकच गुहा राहिली. 'विंध्यकाननांत', 'विंध्याच्या भोंवतींभोंवतीं', 'दक्षिण

दिशेला' 'गिरिजालावृत प्रदेशांत' 'सागराच्या जवळच्या महेंद्रपर्वतासमीप व त्या पर्वतरांगेच्या नैर्ऋत्य टोकावर' असलेलें हें ऋक्षविल अथवा 'विवर' आहे. यासारखी किंवा या वर्णनाची दुसरी कोणतीहि सनिर्झर साडेचारशेंफूटी गुहा किंवा नैसर्गिक बोगदा अरण्या विध्यरांगेंत किंवा परिसरांत नाहीं. भारतांतहि नाहीं. ती फक्त रामगडावरच आहे. रामायणांतलें ऋक्षविल म्हणजे रामगडपर्वतावरची हाथिफोड गुहा असली पाहिजे यांत शंका नाहीं. या चित्रकूटांतून व ऋक्षविलांतून अतिशयोक्तिपूर्ण वर्णनांचा भाग वजा केला म्हणजे रामगड व हाथिफोड गुहा यांच्याशीं त्यांचें एकरूपत्व सहज प्रत्ययाला येतें.

शिवाय ऋक्षविलाचें हें 'सोनेरी' वर्णन पाहिलें म्हणजे बौद्ध प्राचीन जातक ग्रंथांनीं चित्तकुड (=संस्कृत चित्रकूट) पर्वतावर एक 'सुवर्णगुहा' किंवा golden cave होती, असें ठिकठिकाणीं कां म्हटलें आहे, हें कूट आतां सहज उलगडतें.

> It was a pleasant spot ... ... ... It (Chitrakut) had a golden cave and a natural lake (जातक ३·१७६ व ३·२०८.)
>
> *This beautiful mountain was the abode of many geese* living in the golden cave which it contained, (जातक ५·३३७, २·१०७, ५·३८१) some of which were swift and some golden (जा. ४·२१२ व ४२३।४).[1]

असो. जलयुक्त ऋक्षविल, कालिदासाचा धारास्वनोद्गारिदरीमुख चित्रकूट, रामायणांतलि 'गुहागिरि' चित्रकूट[2] (अयोध्याकाड सर्ग १०३·४९) आणि हाथिफोड गुहा असलेला आधुनिक रामगड एकच. म्हणून हें ऋक्षविल अर्थात् हाथिफोड गुहा म्हणजे रामगड-चित्रकूट सिद्धान्ताचा कणा आहे, असें आम्हीं म्हटलें आहे.

याखेरीज-वनस्पति व पशुपक्षी यांबाबत या स्थलत्रयीचें एकत्व दर्शविणारी सामुग्री शिल्लक आहे तथापि ती मांडण्याइतकी जागा नसल्यामुळें पुढें जाऊं.

---

१ चित्रकूट पर्वत हिमालयांत आहे, असें जातकग्रंथांतून लिहिलेलें सापडतें. परंतु रामायणकथा फिरवून आपल्याला हवी तशी जुळती करून घेण्याची बौद्ध वाङ्मयाची ही ठराविक लकब आहे. प्रसिद्ध दशरथ जातकात हेंच केलें आहे. अयोध्येच्या ऐवजीं काशी व वनवासाचें स्थळ दंडकारण्याऐवजीं हिमालय हे प्राचीन बौद्धाचे ठरीव व आवडते फेरफार आहेत. म्हणून बौद्ध प्राचीन ग्रंथांतून वर्णिलेला चित्रकूट दक्षिणेतल्या दंडकारण्यातला असें म्हणता येतें. ही 'उलटी खूण' आमच्या चित्रकूट-सिद्धान्ताला उलट उपकारक अशीच आहे.

२. रामायणात गुहा असलेल्या चित्रकूटाचें राम वर्णन करतो. (अयो० ९४·१४)

गुहासमीरणो गंधान् नानापुष्पसमुद्भवान्
घ्राणतर्पणमभ्येत्य कं नरं न प्रहर्षयेत् ॥

येथील गुहेंतून येणारा सुगंधित वारा कुणाला हर्षित करणार नाहीं ? असें राम म्हणतो. जेथून असा गुहा-समीरण येतो ती गुहा आरपार असली पाहिजे हें स्पष्ट आहे. एरवीं गुहेंतून वारा वहाणार कसा ?

सर्व प्रमाणांमध्यें नवलाची व नावीन्याची गोष्ट असेल तर ती ऋक्षबिल ही होय. तिचें वैशिष्ट्य व महत्त्व हें कीं, अशी आरपार गुहा अन्यत्र सांपडत नाहीं. ही खूण तिच्या अनन्यसामान्यत्वामुळें निर्णायक व संशयोच्छेदक ठरते. कालिदासाचे सगळे ग्रंथ बुडाले आणि एक मेघदूत मागें राहिलें तरी तेवढ्यावरून त्याच्या कविश्रेष्ठत्वाची साक्ष पटेल असें म्हणतात. त्याचप्रमाणें बाकीचीं प्रमाणें नसतीं तरी एकट्या ऋक्षबिल गुहेच्या एका अचूक साक्षीवर प्रस्तुत प्रकरणाचा निकाल द्यावा लागेल, इतका हा सांधा मजबूत आहे. ही आरपार गुहा म्हणजे चित्रकूट व रामगड या 'दोन' पर्वतांना जोडणारा जणूं बोगदाच आहे असें वाटल्याखेरीज रहात नाहीं.

## ही अद्भुत गुहा विंध्यांतलीच

या ऋक्षबिलाचें ठिकाण नेमकें रामगडापाशीं कसें येऊन भिडतें तें पहा.

१. ऋक्ष किंवा ऋक्षवान् पर्वत अतिप्राचीन असून तो विंध्यराजीचाच एक भाग. रामगडपासून थेट पूर्वेपर्यंत पसरलेल्या डोंगरांना ऋक्ष[1] हें नांव होतें यांत शंका नाहीं. महाभारतांत ऋक्षपर्वत शोण आणि महानदी यांच्या दरम्यान आहे, असें स्पष्ट म्हटलें आहे. डॉ. नंदलाल डे यांनीं तर गोंडवनांतील पर्वतराजीलाच फक्त ऋक्ष हें नांव होतें, असें मत व्यक्तविलें आहे. तात्पर्य, छत्तीसगड तालुक्यांतील (पूर्वींचें सिरगुजा संस्थान) रामगडपर्वत हा ऋक्षपर्वतराजींत मोडत होता हें निश्चित.

२. रामायणांत या गुहेचें नांवच ऋक्षबिल आहे. त्यामुळें तें ऋक्षपर्वतांत होतें हें निर्विवाद आहे. या ठिकाणीं हनुमान् प्रभृति वानर सीताशोधार्थ आले ते दक्षिणेकडे-अगस्त्याचरित दिशेकडे आले होते, असे उल्लेख आहेत. त्यामुळेंहि हें ठिकाण निश्चित होतें. शिवाय हा ऋक्षपर्वत सबंध विंध्याचाच भाग असल्यामुळें 'विंध्ये, विंध्यकानने, विंध्ये पर्वतसत्तमे' असे ठिकठिकाणीं उल्लेख आहेत. एक नमुना पहा:

विंध्यकाननसंकीर्णां विचेरुर्दक्षिणां दिशम्
विंध्यमेवादितः कृत्वा विचेरुश्च समंततः ॥
(किष्किंधाकांड सर्ग ४९)

पुढें विंध्यांतल्या या ऋक्षपर्वतावर त्यांना हें आरपार विवर अथवा ऋक्षबिल दिसलें—

गिरिजालावृतान्देशान्मार्गित्वा दक्षिणां दिशम् ।
विचिन्वन्तस्ततस्तत्र ददृशुर्विवृतं बिलम् ॥
दुर्गमृक्षबिलं नाम दानवेनाभिरक्षितम् ।
क्षुत्पिपासापरीतास्तु श्रान्तास्तु सलिलार्थिनः ॥
अवकीर्णं लतावृक्षैर्ददृशुस्ते महाबिलम् ।
तत्र क्रौञ्चाश्च हंसाश्च सारसाश्चापि निष्क्रमन् ॥

१. वराह, मार्कंडेय व विष्णु पुराण.

जलार्द्राश्चक्रवाकाश्च रक्ताङ्गाः पद्मरेणुभिः ।
ततस्तद्बिलमासाद्य सुगन्धि दुरतिक्रमम् ॥

ही अद्भुत गुहा पाहून वानर 'विस्मयव्यग्र' झाले. त्यांतून हंस, सारस, क्रौंच इत्यादि पक्षी जलार्द्र होऊन बाहेर पडत होते.

तत्र क्रौंचाश्च हंसाश्च सारसाश्चापि निष्क्रमन् ॥
जलार्द्राः चक्रवाकाश्च रक्तांगाः पद्मरेणुभिः ।
नलिनीस्तत्र ददृशुः प्रसन्नसलिलायुताः । ( कि. सर्ग ५० )

नंतर स्वयंप्रभा नामक तापसीनें त्यांना गुहेच्या बाहेर आणून मार्गदर्शन केलें, तें स्थलनिश्चयाच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे.

एष विंध्यो गिरिः श्रीमान्नानाद्रुमलतायुतः
एष प्रस्रवणः शैलः सागरोऽयं महोदधिः ॥

म्हणजे हा विंध्य, हा प्रस्रवण आणि त्याच्यापुढें हा सागर. हा सबंध विंध्य पर्वत हें आधीं सांगितलें, नंतर प्रस्रवण (म्हणजे चित्रकूट किंवा त्याच्याजवळचा जलप्रवाहयुक्त डोंगर) आणि नंतर (म्हणजे पूर्वकडे) समुद्र लागेल हे सांगितलें. पुढें समुद्रालगतच्या महेंद्र पर्वतावरूनच (पूर्वींच्या कालिंग देशात किंवा हल्लींच्या ओरिसांत) हनुमानानें लंकेकडे उड्डाण केलें. यावरून ऋक्षबिल व तो पर्वत नेमका छत्तीसगडांत रामगडपाशीं येतो, हें उघड आहे. एरवीं समुद्राच्या व महेंद्र पर्वताच्या जवळचें दुसरें ठिकाण कोणते असूं शकणार ?

शिवाय रामाच्या आदेशानुसार सीताशोधार्थ पाठविण्यांत आलेले हे वानर विंध्यांत आणि ऋक्ष पर्वतांत आणि त्यांतल्या त्यात या ऋक्षबिलाच्या भागांतच कां आले ? वानरांच्या अनेक टोळ्या निरनिराळ्या दिशांना गेल्या होत्या. पण हनुमान्,

---

प्रस्रवणः— पानीय निपत्य बहुलिभवति तस्य स्थानस्य। प्रस्रवति अस्मिन् प्रस्रवणम्। अशी प्रस्रवण शब्दावर अमरकोशांत टीका आहे. म्हणजे हा पाझरणारा व नदीझरे वहाणारा डोंगर असला पाहिजे, हें नावावरूनच सूचित होतें. यावरून प्रस्रवण हे जलप्रवाहयुक्त किंबहुना त्याकरिता प्रसिद्ध असलेल्या चित्रकूटाचेंच दुसरें वर्णनात्मक नाव असलें पाहिजे, असा तर्क संभवतो. अर्थात् किष्किंधेंतला म्हणजे हंपीजवळचा प्रस्रवण किंवा माल्यवान् (ज्यावर रामानें पावसाळ्याचे चार महिने घालविले असें वर्णन आहे) तो वेगळा. प्रस्रवण नावाचे हे दोन पर्वत असले पाहिजेत. दोन किंवा अधिक सदृश स्थानांना एकच नाव (विशेषत वर्णनात्मक असल्यास) मिळाल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. चित्रकूट-वर्णनाच्या रामायणांतील (अयो० ९४·१२) खालील श्लोक पहा—

जलप्रपातैरुद्भेदैर्निष्पन्दैश्च क्वचित्क्वचित् ।
स्रवद्भिर्भात्ययं शैलः स्रवन्मद इव द्विपः ॥

यावरून खूप जलप्रवाहयुक्त व पाण्याने पाझरणारा डोंगर अभिप्रेत आहे, हें स्पष्ट आहे. सदरील गुहा असलेल्या भगर लगतच्या डोंगराला प्रस्रवण नाव असावें असें दिसतें.

अंगद, तारा, जांबुवंत इत्यादि प्रमुख मंडळी असलेली टोळीच या दक्षिण दिशेकडे धाडण्यांत आली होती, ही गोष्ट सूचक आहे. **पूर्वी राम सीतेसह येथें रहात होते म्हणून** या कांतारकोविदांची योजना या भागाकरितां केली असली पाहिजे, हें उघड आहे. यावरूनहि हा रामगड म्हणजे चित्रकूट याला पुष्टि मिळते.

३. आतां खुद्द कालिदासाच्या वर्णनावरून काय निष्कर्ष निघतो तें पाहूं. 'धारास्वनोद्गारिदरीमुखः' इत्यादि चित्रकूटाचें वर्णन केलेला श्लोक मागें दिलेलाच आहे. त्यांतील सनिर्झर गुहेचें वर्णन या ऋक्षविलालाच उद्देशून असलें पाहिजे. कारण ऋक्षविलाशीं व कालिदासाच्या चित्रकूटवर्णनाशीं जमणारा दुसरा डोंगर विंध्यांत नाहीं. असा हा चित्रकूट सोडल्यानंतर राम ऋक्षपरिसरांत रहात रहात दक्षिण दिशेला गेला, असें रघुवंशांत स्पष्ट वर्णनच आहे. (सर्ग १२-२४ व २५)

यावरून कालिदास चित्रकूट हा विंध्याचा व ऋक्षपर्वताचा भाग मानीत होता असें स्पष्ट दिसतें.[1]

४. ऋक्षविलासारखी विस्तीर्ण आरपार गुहा ऋक्षपर्वतांत अगर विंध्यराजींत अन्यत्र कोठेंहि नाहीं (भारतांतही नाहीं).

म्हणून रामायणांतलें ऋक्षविल, रामायणांतच उल्लेखिलेली चित्रकूटावरची गुहा आणि कालिदासानें वर्णिलेली चित्रकूटावरची गुहा एकच असली पाहिजे. आणि वरील प्रमाणांवरून तीच रामगडवरची हाथिफोड गुहा होय. सुप्रसिद्ध संशोधक डॉ. नंदलाल दे यांनींहि ऋक्षविल म्हणजेच हाथिफोड गुहा असें ठरविलें आहे.

आतां पुढील पानावर छापलेलें कोष्टक पाहा. हें कोष्टक पाहिल्यानंतर अधिक स्पष्टीकरणाची गरज रहात नाहीं. विशेषतः कालिदासाला रानबैलाच्या उघडलेल्या तोंडाची उपमा सुचली व हलदार यांना प्रचंड अजगराच्या उघडलेल्या जबड्याची कल्पना सुचली, हें पाहून दोघांचेंहि वर्णित स्थळ एकच असलें पाहिजे, याचा सहजच प्रत्यय येतो. वरील तीनहि वर्णनांचीं बोटें एकच ठिकाण दाखवितात आणि तें म्हणजे रामगड होय.

## हाथिफोड गुहा (Hathiphor Tunnel)

रामगड पर्वताचें व त्याच्या माथ्यावरील हाथिफोड गुहेचें[2] वर्णन कलेक्टर मि. कॉयडेल रॅमसे I. C. S. यांनीं केलेलें येथें देतों. (पृष्ठ १५१ पहा)

१. चित्रकूटा ही नदी ऋक्षपर्वतांत उगम पावणारी आहे असा उल्लेख मार्कंडेय पुराणांत सांपडतो. (Also see B. C. Law : Rivers in India.) ऋक्षांतल्याच चित्रकूट पर्वताशीं या नदीचा संबंध असावा असें दिसतें व त्यामुळें चित्रकूट ऋक्षांतला म्हणजे विंध्यराजींतला या सिद्धांताला पुष्टि मिळते.

२ या हाथिफोड गुहेचें अहोच पण सविस्तर वर्णन हंटरसाहेबांनीं केलें आहे. तें जिज्ञासूंनीं पहावें. (Statistical Account of Bengal, Vol. XVII) पासेीज अधिक

## प्रस्तुत गुहेच्या वर्णनाचें तौलनिक कोष्टक

| | वर्णन | आकार | ठिकाण |
|---|---|---|---|
| रामायणांतलें ऋक्षबिलः | आरपार, लांबलचक (योजनायत) जलयुक्त | अद्‌भुत, विस्मयकारक (:[२]मायण) | विन्ध्यांत-ऋक्षपरिसरांत (दण्डकारण्यांत) |
| कालिदासाची **चित्रकूट-गुहा**: | आरपार, प्रचंड, जलयुक्त | रानबैलाचें उघडलेलें तोंड | ऋक्षपरिसरांत (दण्डकारण्यांत) |
| [२]हल्लींची हाथिफोड गुहाः | आरपार, प्रचंड, जलयुक्त | [१]अजगराचा उघडलेला जबडा | गोंडवन [छत्तीसगड, मध्यप्रदेश] म्हणजेच विंध्यांत (पूर्वीचा ऋक्ष) |

1 The tunnel was so wide and dark that it might be likened to the **open mouth of a gigantic dragon** ready to devour it's prey. There, right away in a corner, the water from a spring was constantly dripping on a stone. The gentle dripping sound of the spring resounded between the caves and hill sides and produced a loud roaring sound. (हलदार, पा. ३८४)

२ हत्तींनीं फोडून काढलेली म्हणून 'हाथिफोड' गुहा असें आसपासचे लोक समजतात. तथापि या हाथिफोड गुहेच्या पलीकडे पर्वतात प्राचीन काळीं मोठा जलाशय अथवा सरोवर असलें पाहिजे. पण या खोऱ्यात पाण्याला दुसरीकडून जाण्याला मार्ग नसल्यामुळें पाण्याच्या प्रवाहानें व वेगाने ही नैसर्गिक वाट म्हणजे आरपार बोगदा पडला असें बेगलर साहेबांनीं तेथील भूरचनेवरून व गुहेच्या प्रस्तरस्थितीवरून अनुमान केलें आहे. तें बरोबर असावें. प्रस्तुत ह्या निर्झरगुहेला उद्देशूनच कालिदासानें मेघदूतांत (श्लोक ४२) याला स्रोतोरंध्र असें म्हटलें असावें, असा आमचा तर्क आहे. तो येथें नमूद करतो. 'सरसानिचुलस्थान' या शब्दप्रयोगात खासच या गुहेचा निर्देश आहे.

( Central Provinces Gazetters : Chhattisgarh Feudatory States, p-p. 230.6 ) :—

The Ramgarh hill was visited by Mr. L. E. B. Cobden Ramsay, I. C. S. in 1905, and he gives the following description of its present appearance.

" The Ramgarh hill rises abruptly from the surrounding plains of Rampur tappa of the Surguja State. It consist of a long steep ridge rising over a thousand feet from the plains. This ridge at the South-western extremity is capped by a sheer perpendicular mass of rock, rising more than a thousand feet obove the main ridge. At the northern end of the lower ridge is the vast tunnel known as " Hathphore " ...Above the tunnel are two fair-sized caves hidden over by thick jungle. These are known respectively as "Sita Bengra" and "Lakshman Bengra". I managed to scale the rock and enter the former cave; the rock inside has been hollowed out into two fair-sized dwelling rooms. Connectiag these two rooms is a kind of a hall with a stone platform...

Ascending the ridge a small level ledge of rock some fifty yards long by thirty yards wide is met with at the base of a lotfy pinnacle of rock which rises sheer from the main ridge. At the southern extremity of this ledge a stream of crystal clear and icy-cold water gushes forth from the rock, flowing over a board seam of coal. It is said that this stream is supplied from a huge cavern of water situated in the heart of the lofty mass of rock towering above. On this small ledge a mela is annually held in Chait when pilgrims from all partscome to drink the water of this spring.

...This boulder is known the "Vashistha Gupha" where the spiritual adviser of Ramchandra is supposed to have lived. Worshippers wending their way to the temples on the summit are alleged to have been mystified by the supernatural utterances proceeding apparently from this solid rock.

...On the summit of the hill there is a small temple more or less intact. The temple is not remarkable in any way for architectural beauty, but is remarkable for the enormous blocks of stones used in construction. Outside the temple are images of Mahadeo and Hanuman, and within images of Ramchandra, in the centre, of Lakshman on the right hand side of Ramchandra, and of Janaki, wife of Ramchnaddra. On his left hand there are

images also of Bharat and Vishnu Bhagwan with four hands. The hill cannot be discended on the western side, but it is possible to make one's way some two hundred feet down to a small cave in the face of the rock. **In the cave is found moist chalk, and the** cave has, by the removal of this chalk by devotees **to make the sacred mark on the forehead** after worship of the temple above, *been hollowed to a great distance, showing* number of *worshippers* who have in times gone by resorted thither. Just below the cave is a pool of *transparent water which is said never to vary in depth.*

रॅम्सेसाहेबांच्या वर्णनांतील हा उतारा लांब असला तरी रामगड पर्वताचें इहींचें प्रत्यक्ष चित्र डोळ्यांपुढें उभें रहावें, एवढ्याकरितां तो मुद्दाम दिला आहे, *यांतील मजकूर इतका बोलका आहे कीं, त्यावर आणखी भाष्य करण्याची गरज* नाहीं. सदरील वर्णन वाचीत असतांनाच हाच रामाचा चित्रकूट असला पाहिजे, याची प्रचीति आल्याशिवाय रहात नाहीं. उंच शिखर, गुहा, निर्झर, तिलकमाती, रामादिकांच्या प्रतिमा इत्यादि गोष्टी तर आहेतच; पण तेथील भरताची मूर्ति फार महत्त्वाची व सूचक आहे.

या हाथिफोडलगतच्या सीतागुंफा गुहेंत अशोककालीन शिलालेख कोरलेला आहे, हें पूर्वी सांगितलेंच आहे. शिलालेख कुठें कोरतात? पावित्र्य अगर पराक्रम यांमुळें प्रसिद्धि पावलेलें स्थळच पूर्वी पसंत करीत. मान उंचावलेला हा उंच पर्वत *प्राचीन व पवित्र तर होताच. पण इतिहासप्रसिद्ध आणि राम-संबंधित अशी त्याची* लोकात ख्याति होती, म्हणून हा पर्वत शिलालेख कोरण्याकरितां निवडण्यांत आला असला पाहिजे, हें उघड आहे.

त्याचप्रमाणें जैनांच्या पद्मपुराणांत राम-लक्ष्मण हे निर्वासित राजपुत्र चित्र-कूटाच्या पायथ्याशीं आले व त्यांना वर माथा गांठायला तीन दिवस कां लागले, यांतलें रहस्य व कारण आतां लक्षांत येईल. इल्दारकृत रामगड-सफरीचें वर्णन *याच्याशीं तुळून पहावें. त्यांना चंद्रा रोडपासून माथ्यापर्यंत जाण्यास एकूण आठ-*वडा लागला. पायथ्यापर्यंत हत्तीवरून हेलकावे खात, नंतर बांबूच्या डोलींतून आणि नंतर प्रत्यक्ष पहाडावर अर्थातच पायांनीं चढतांना सर्वांची, युरोपिअन साहेब लोकांची देखील तिरपीट उडाली. प्रवासाची व जंगल तुडविण्याची संवय नसलेल्यांची स्थिति तर काय विचारतां? अर्थातच माथा गाठल्यावर मात्र तेथील[1] *रमणीय देखावा व प्राचीन अवशेष दृष्टीस पडतांच त्यांच्या परिश्रमाचें चीज झालें.* त्यांच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. 'क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते !' एकेक पाहून त्यांनीं नवल केलें. नक्षीचें दगडांत कोरलेलें प्रवेशद्वार, रामगडच्या

१ बेगलर व डिस्ट्रिक्ट गॅझेटीयर यांनी केलेलीं वर्णनें पुढील प्रकरणांत दिलीं आहेत, तीं पहावीं.

अगदीं शेवटल्या टोंकावरचें प्राचीन देवालय, त्यांतील राम-लक्ष्मण-सीता-हनुमान-रावण इत्यादींच्या मूर्ति, रामादिकांच्या नांवाच्या गुहा, त्यांत गुंजत राहिलेल्या दंतकथा, शिळेवर कोरलेली रामचंद्रांची पावलें, अशोकाच्या पूर्वीचा शिलालेख आणि गुहेच्या छतावर रंगविलेलीं प्राचीन चित्रें वरून समोंवतालचीं दिसणारीं अनेक सरोवरें, माथ्यावरच्या पठारकडेनें वहाणारा निर्मळ नागमोडी झरा व त्याचा जलप्रपात किंवा धबधबा सारेंच अद्भुत होतें आणि. ती हायिफोड गुहा! तो एक भव्य निसर्गचमत्कार! डोंगराला एवढें सुमारें ४० × ४५० फूट लांबीचें आरपार भोंक आढळत नाहीं. पुन्हा त्यांत स्फटिकासारखा शुभ्र थंड क्लेशहारक व निर्मळ पाण्याचा कपारींतून पाझरून खालीं टपकणारा निर्झर व प्रतिनिनादित होणारा त्याचा निनाद. सगळें डोंगराचें माथें त्या आवाजानें भरून टाकलें! आहे. कालिदासानें—काव्यांतरिक्षांतल्या त्या वहिरीससाम्यानें—या वैशिष्ट्यपूर्ण-दृश्यावर अचूक झडप घातली आणि आपली चित्रकूट-वर्णनाची शिकार साधली.

धारास्वनोद्गारिदरीमुखोऽसौ ।
शृंगाग्रलग्नांबुदवप्रपंकः ॥

वर्ण्य वस्तु ( = रामगड ) थोड्या, मोजक्या शब्दांत डोळ्यांपुढें उभी करण्याचें यांतलें कविकौशल्य वाखाणण्यासारखें आहे. अशा वेंचलेल्या कणाकणांनींच कालिदासाची जादूची पोतडी अखेर कांठोकांठ भरली आणि जगाच्या बाजारांतील रत्नपारख्यांनीं त्यांची किंमत अमोल ठरविली. ज्या काव्यबिंदूंचा सिंधु झाला त्यांतलाच हा एक थेंब होय. रामगडचें हें भव्य व गूढरम्य दृश्य पाहून चित्रकार हलदार, गॅझिटीयरचे संपादक किंवा कालिदासच काय पण कोणाच्याहि तोंडून—

अहो नवनवाश्चर्यनिर्माणे रसिको विधिः

असे उद्गार नकळत बाहेर पडल्यावांचून रहाणार नाहींत. पहाणाऱ्याला उच्चवेर नेणाऱ्या उच्च पर्वताचें तें उच्च दृश्य आहे. तेथें कितीक ज्ञात-अज्ञात लोक आज-पर्यंत येऊन गेले! तज्ज्ञांच्या तर्काप्रमाणें गेल्या ४९०० वर्षांपासून तर ह्या स्थानाची प्रसिद्धि व प्राचीनता आहेच; त्याहीपूर्वी तेथें कोणता इतिहास घडला हें काळालाच माहीत. गौतमबुद्ध देखील या स्थळीं आला असला पाहिजे, असें अनुमान करतां येतें. कारण अलीकडच्या महादेव आणि पलीकडच्या माकुल अशा दोन्ही बगलेच्या डोंगरांवर तो जाऊन राहिला होता. असा बौद्ध ग्रंथांतील प्राचीन इतिहास आहे. एकांतप्रिय व प्रचारक बुद्धाला हा मधलाच डोंगर वगळण्याचें कारण दिसत नाहीं. उलट राम-संचारित पर्वतशिखराला त्यानें भेट देणें व वास्तव्य करणें हें संभवनीयच नव्हे तर सुसंगत दिसतें. अनेक महर्षि येथें राहून स्वर्गाला गेले, रामाचे पाय वर याला लागलेच; पण त्या निमित्तानें कौसल्यादिक राण्या, वसिष्ठादि मुनि आणि अयोध्येची सेनानुद्धां येथें लोटली. सुप्रसिद्ध ऐतिहासिक भरत-भेट येथेंच

होऊन आधींच पुण्यक्षेत्र म्हणून नांवाजलेलें हें स्थान अधिकच पुण्यपावन झालें. येथील जलप्रवाहांत जनकतनयेनें स्नान केलें. काल्पनिक यक्ष येथें नसेल पण खरा यक्ष-यक्षाची कांडी फिरवणारा जो कालिदास-तो तर येथें खात्रीनें आला असला पाहिजे. यांत शंका कसली ? 'धारास्वनोद्गारि' हा श्लोक रामगड पर्वत व हाथिफोड गुहा समक्ष पाहिलेला असल्याशिवाय रचणें अशक्य आहे. **हें वर्णन प्रत्यक्ष पाहिलेल्या माणसाचें आहे.** कालिदासानें किती कौतुकानें आणि भक्तिभावानें तीं सर्व दृश्यें व ऐतिहासिक स्थळें अनिमिष लोचनांनीं आणि अतृप्त अंतःकरणानें पुन्हा पुन्हा पाहिलीं असतील ! त्याच्यापुढें क्षणांत सगळें रामायण चित्रपटासारखें फिरून गेलें असेल ! तें उंच शिखर, ती रमणीयता, तीं रामाचीं पदचिन्हें, ते छाया तरु, ती गुहा आणि त्यांतून निनाद करीत वहाणारा तो शुद्धतरंगांचा आणि अंतरंगाचा निर्झर ! अरे बापरे, त्या झऱ्यानें कितीक आले-गेलेले पाहिले, पण अनंत कालौघाप्रमाणें तो अद्याप वहातोच आहे. तो वर्ड्स्वर्थच्या निर्झराप्रमाणें--

*Men may come and men may go*
But I go on for ever.

हाच आवाज जणूं डोंगरभर उठवतो आहे कीं काय कोण जाणे !

वरील कोष्टकावरून व वर्णनसाम्यावरून कक्षविल-(=) हाथिफोड गुहा हें समीकरण स्पष्टपणें सिद्ध होतें. याच अपूर्व गुहेचें वर्णन कालिदासानें आपल्या चित्रकूट वर्णनांत केलेलें आहे, हें मागें दाखविलें आहे. ही गुहा म्हणजे एक अद्भुत, अद्वितीय व भव्य असा निसर्गचमत्कार आहे. हें या पर्वताचें अनन्यसाधारण वैशिष्ट्य आहे. म्हणूनच विस्मृतीच्या अंधारांत रामगड व चित्रकूट या दोन पर्वतांचें एकत्व दाखविणारा हा झगझगीत दिवा होय. प्रथम रामगड हाच रामगिरि हें मेघदूतांतील अंतर्गत पुराव्यावरून दाखविलें. आतां रामगड हाच चित्रकूट हें रामायणातील व कालिदासाच्या वर्णनावरून सिद्ध होत आहे. याचाच अर्थ रामगिरि म्हणजे प्राचीन चित्रकूट होय. गणित कोणत्याहि रीतीनें सोडविलें तरी उत्तर तेंच !

* * *

## झोत ६ वा

# रामगड, रामगिरि आणि चित्रकूट एकच

रामगिरिः अत्र चित्रकूटः । न तु ऋष्यमूकः
तत्र सीतायाः वासाऽभावात् ।
—वल्लभदेव ( दहावें शतक )

पहिल्या दोन प्रकरणांत रामगड हाच मेघदूतांतील रामगिरि याचें प्रतिपादन केलें. वस्तुतः हा कालिदासाचा रामगिरि म्हणजेच प्राचीन चित्रकूट हें त्या विवेचनावरूनहि कळून येण्यासारखें आहे. जनकतनयास्नान आणि रघुपतिपदैः अंकितम् या दोन खुणांनी चित्रकूटच दर्शविला जातो. शिवाय सर्व प्राचीन संस्कृत टीकाकारांनी (थेट दहाव्या शतकापासून) रामगिरि म्हणजे चित्रकूटच, असा आपल्या टीकांतून निर्वाळा दिला आहे. एवढीं दोन प्रमाणें देखील हा सिद्धान्त प्रस्थापित करण्याइतकीं प्रबळ आहेत. रामायण रचलें गेलें त्या काळांत व त्यानंतर कालिदासाच्या काळांतहि राम सीतेसहवर्तमान राहिले असा एकच पर्वत लोकप्रसिद्ध होता. आणि तो म्हणजे चित्रकूट. त्याखेरीज सीतारामांनी दुसऱ्या कोणत्याहि पर्वतावर वास्तव्य केल्याचा उल्लेख कोणत्याहि वाङ्मयांत चुकून देखील आलेला नाहीं. अशा स्थितींत मेघदूतांतील पूर्वोक्त दोन उल्लेख चित्रकूटाशिवाय दुसऱ्या कोणाला उद्देशून असणार? तसेंच कालिदास-काळाला अधिक जवळचे, पूर्वपरंपरा माहीत असलेले व चिकित्सक टीकाकार सगळेच आंधळ्यांच्या माळेप्रमाणें एकाच चुकीच्या खड्ड्यांत पडतील, असें वाटत नाहीं. त्या मार्मिकांच्या मताला महत्त्व आहे. म्हणून एवढा पुरावा हा सिद्धान्त मान्य करण्याला पुरेसा होता यांत शंका नाहीं. परंतु त्यांत रामगड चित्रकूट ठरत होता तो रामगिरीच्या मध्यस्थीनें. यास्तव प्रस्तुत प्रमाण-प्रपंचावर अन्योन्याश्रयाचा दोष येऊं नये म्हणून आणि आमच्या प्रतिपाद्य प्रमेयाला स्वयंभू व दुहेरी बळकटी यावी एवढ्याकरितां आम्हीं रामगिरीमार्फत बनविलेली दोघांची सोयरीक-एकता बाजूला ठेवली. आणि स्वतंत्रपणें वनास जातांना रामगड हाच रामायणांत उल्लेखिलेला चित्रकूट होय, हें दाखविण्याची खटपट चवथ्या प्रकरणापासून आरंभिली. त्यासाठीं आपण अयोध्येहून निघालों आणि चित्रकूटावर जाणारा राम कोणत्या दिशेनें आणि कोणत्या डोंगरावर जातो, हें पहात असतांना सदर प्रकरणाच्या शेवटीं आपण रामगडवर येऊन धडकलों. हाच रामगड म्हणजे चित्रकूट याचा पुरावा होय. शिवाय त्याच्या वरील हा सिद्धान्त दृढमूलपणें व अधिक दृढतेनें प्रस्थापित करणारी कांहीं

| | रामगिरि | चित्रकूट | रामगड |
|---|---|---|---|
| १ ठिकाण (Location) | नर्मदेच्या व अमरकंटकच्या पूर्वेस, विंध्य-ऋक्ष ( महेंद्र पर्वताजवळ ) दंडकारण्यांत रामाच्या मार्गावर ( प्रयाग ते पंचवटी ) | नर्मदेच्या व अमरकंटकच्या पूर्वेस, विंध्य-ऋक्ष ( महेंद्र पर्वताजवळ ) दंडकारण्यांत रामाच्या मार्गावर ( प्रयाग ते पंचवटी ) | नर्मदेच्या व अमरकंटकच्या पूर्वेस, विंध्य-ऋक्ष ( महेंद्र पर्वताजवळ ) दंडकारण्यात रामाच्या मार्गावर ( प्रयाग ते पंचवटी ) |
| २ वर्णन | भव्य, उत्तुंग, उंच शिखरें<br>मुळकेवजा, सर्व बाजूंनीं दिसेल इतका उंच<br>रमणीय व दर्शनीय; पवित्र<br>नदी, जलप्रवाह, जलप्रपात, झरे<br>हरिणांचे कळप, मोर, हत्ती व नानाविध पक्षी<br>अरण्य : विशिष्ट, विविध व विशाल वृक्ष<br>सोसाट्याचा वारा<br>मेघ टकरा मारण्याचें दृश्य<br>एकांत स्थळ | भव्य, उत्तुंग, उंच शिखरें<br>मुळकेवजा सर्व बाजूंनीं दिसेल इतका उंच<br>रमणीय व दर्शनीय; पवित्र<br>नदी, जलप्रवाह, जलप्रपात, झरे<br>हरिणांचे कळप, मोर, हत्ती व नानाविध पक्षी<br>अरण्य : विशिष्ट, विविध व विशाल वृक्ष<br>सोसाट्याचा वारा<br>मेघ टकरा मारण्याचें दृश्य<br>एकांत स्थळ | भव्य, उत्तुंग, उंच शिखरें. मुळकेवजा सर्व बाजूंनीं दिसेल इतकें उंच शिखर<br>रमणीय व दर्शनीय; पवित्र<br>नदी, जलप्रवाह, जलप्रपात, झरे<br>हरिणांचे कळप, मोर, हत्ती व नानाविध पक्षी<br>अरण्य : विशिष्ट, विविध व विशाल वृक्ष<br>सोसाट्याचा वारा<br>मेघ टकरा मारण्याचें दृश्य<br>एकांत स्थळ |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ स्थल-माहात्म्य | रामसीतांचें वनवासांत वास्तव्य<br>जनकतनयास्नान<br>रामाचीं पावलें<br>पुण्यप्रद<br>ऋषींचे आश्रम, तपोभूमि | रामसीतांचें वनवासांत वास्तव्य<br>जनकतनयास्नान<br>रामाचीं पावलें<br>पुण्यप्रद<br>ऋषींचे आश्रम, तपोभूमि | रामसीतांचें वनवासांत वास्तव्य<br>(परंपरा, दंतकथा, रामाचें देऊळ-मूर्ति)<br>सीतास्नानाची आख्यायिका<br>रामाचीं पावलें<br>पुण्यप्रद<br>ऋषींचे आश्रम, तपोभूमि |
| ४ वैशिष्ट्यें (Distingwishing features) | निचुल + (स्रोतो) रंध्र-ध्वनित<br>स्रोतोरंध्र<br>'स्निग्धछायातरु' (गर्द झाडी)<br>धातुराग | आरपार गुहा + निर्झर + प्रतिध्वनि<br>ऋक्षबिल<br>'स्निग्धछायातरु' (गर्द झाडी)<br>धातुराग | आरपार गुहा + निर्झर + प्रतिध्वनि<br>ऋक्षबिल<br>'स्निग्धछायातरु' (गर्द झाडी)<br>धातुराग |

टीप : अमरकंटक म्हणजे नर्मदेचा उगम कलिंगांत असे प्राचीन उल्लेख आहेत (म० पु०) कलिंगदेश नर्मदेच्या दक्षिणेला येऊं शकत नाहीं. अर्थात अमरकंटक (आम्रकूट) व पर्यायानें रामगिरि विंध्यांतलेच ठरतात. शिवाय मंदाकिनी ही ऋक्षांतली नदी (भा० ऐ० कोश २९५ पहा.)

किंवा हाथिफोड गुहेची जबरदस्त व अनन्यसाधारण खूण आपण गेल्या प्रकरणांत पाहिली. तथापि प्रस्तुत सिद्धान्ताचा बळकट खुंटा आतां इतर प्रमाणांच्या परीक्षणानें हलवून पहावयाचा आहे. वस्तुतः प्रथमपासून अवधान राखलेल्या वाचकांना रामगड = रामगिरि = चित्रकूट हें प्रमेय म्हणजे उकललेलें कोडें होय. सबब आतांपर्यंत विखुरलेल्या विवेचनाचें सार थोडक्यांत एकत्र सांगून नंतर मुद्दाम राखून ठेवलेलीं कांहीं सूक्ष्म पण समाधानकारक नव-संशोधित प्रमाणें पुढें मांडून हा सद्याचा शोध पूर्ण करावयाचा आहे.

रामगड व चित्रकूट एकमेकांशीं कसे जुळतात, हें दाखविण्याची आतां आवश्यकता नाहीं. रामगडचें वर्णन दुसऱ्या व चित्रकूटाचें तिसऱ्या प्रकरणांत विस्तृत दिलें आहे. शिवाय रामगिरीचीं चोवीस वैशिष्ट्यें *प्रारंभींच्याच प्रकरणांत नमूद केलीं आहेत. त्यामुळें हीं तीन ठिकाणचीं वर्णनें मनांत जुळून* वाचकांच्या डोळ्यांपुढें त्यांतला अभिप्रेत असा एकच पर्वत उभा राहिला असेल, यांत शंका नाहीं. नांवें निराळीं, वस्तु एकच. एकाच दृष्टिपातांत तिघांचीं वर्णनवैशिष्ट्यें एकाच वेळीं सहजपणें लक्षांत भरावीं एवढ्याकरितां त्यांचें एक तुलना-दर्शक कोष्टक बनविलें आहे. तें पृष्ठ १५६/१५७ वर दिलेलेंच आहे.

## दंतकथा व आख्यायिका

*आतां दंतकथा व आख्यायिका पाहूं. त्या सर्व रामविषयक आहेत. आम्हीं* इतका वेळ हें प्रमाण मुद्दामच मागें ठेविलें होतें. पण आतां स्वतंत्र विश्वसनीय पुरावा मांडून झाल्यानंतर दंतकथांचें दप्तर सोडून पहाण्याला हरकत नाहीं. अन्यथासिद्ध प्रमेय दृढ करण्याला प्राचीन आख्यायिकासारखा जुना माहितगार फार उपयुक्त. यासाठीं रामगड-चित्रकूट-एकत्व-सिद्धान्ताचा दुय्यम व उपोद्घलक पुरावा म्हणून हा दंतकथांचा दुजोरा खालीं सादर करण्यांत येत आहे. आधीं रामगड नांवांतच मुळीं राम आहे. राम येथें राहिले म्हणून हा रामगड. नांवें पडतात व रूढ होतात त्यांच्यामागें कारणपरंपरा उभी असते. रामगड या दोन शब्दांच्यामध्यें रामाचा संबंध इतिहास भरलेला आहे. या पर्वताच्या उंच शिखराग्रावर प्राचीन *देवालय असून त्यांत राम, लक्ष्मण व सीता यांच्या मूर्ति आहेत, हें पूर्वीं सांगितलेंच* आहे. (पुस्तकांतील फोटो पहावा.) इतर देवळांतल्या रामाच्या प्रतिमा हें रामाचें स्मारक असतें. येथील राममूर्ति रामाच्या वास्तव्याचें स्मारक आहे. एरवीं इतक्या उंचावर दगडावर दगड घालण्याची यातायात कोणीं कशाला केली असती? वास्तविक पर्वतशिखरांवर देऊळ असण्याचा हक्क व वहिवाट शंकराची. पण हा मान रामचंद्राला मिळाला. याचें कारण राम येथें प्रत्यक्ष राहिले होते म्हणून. सदैव सन्निध असणारा हनुमानहि येथें आहेच. पण शिवाय येथें भरताची प्रतिमा आहे ती कशाकरितां? याचें कारण आतां कोणालहि 'अकथितोऽपि ज्ञायते।'

रामगड हाच चित्रकूट म्हणून येथें भरताची प्रतिमा आली. येथेंच सुप्रसिद्ध भरत-भेट झाली, याचें तें प्रतीक व पुरावा होय. राम, लक्ष्मण व सीता यांच्या नांवानें गुहा आहेत. त्याखेरीज जोगिमारा नांवाची व इतर अनेक नैसर्गिक रहाण्या-सारख्या गुहा आहेत. त्यांत ऋषिमुनि रहात असत, अशी आख्यायिका आहे. रामाचीं पावलें शिळेवर उमटलेलीं दाखवितात. त्यांचा फोटो अन्यत्र दिला आहे. एक वसिष्ठ-गुंफा असून तेथें रामाचे गुरु वसिष्ठऋषि रहात असत असें सांगतात. एक दगडी मूर्ति वाल्मीकीची म्हणून दाखवितात. मनशिळा नांवाचा ओलसर लालरंग (धातुराग) विपुल सांपडतो. त्या ठिकाणाला '**तिलक-माती**' असें नांव आहे. चैत्रवैशाखांत येथें यात्रा भरते त्या वेळीं येथील टिळा कपाळीं लावतात. कारण येथेंच रामानें सीतेच्या भाळीं तिलक लावला होता, अशी समजूत आहे. यात्रेकरू डोंगरावरच्या झऱ्यांत स्नान करतात. त्याचें पुण्य **गंगास्नानापेक्षां अधिक** अशी श्रद्धा आहे. कारण वनवासाच्या काळांत तेथें प्रत्यक्ष सीतादेवीनें स्नान केलें आहे. म्हणूनच कालिदासानें याला 'जनकतनयास्नानपुण्योदक' म्हटलें आहे. कोणी डोंगराखालीं लहानशी नदी आहे तेथें सीतेनें स्नान केलें असें समजतात. येथें रामाची आश्रमस्थानें दाखवितात. डोंगरावरच्या एका ठिकाणाला 'रावण-दरबार' किंवा 'रावण-बैठक' असें नांव आहे. येथें पाषाणाच्या प्रतिमा आहेत. त्या रावण, कुंभकर्ण व रावणपुत्र इंद्रजित यांच्या म्हणून सांगतात. डोंगरा-खालीं पर्वताचा एक नैसर्गिक बुरुजाच्या आकाराचा उंच सुळका वर निघालेला आहे. त्याचा माथा कोरून बसण्यासारखी जागा केलेली आहे. वनवासाच्या येथील वास्तव्यांत राम तेथें बसून या भागांतील रहिवाशांचें नृत्य वगैरे पहात बसे, अशी दंतकथा आहे.

रामगडसभोंवतालचीं आजूबाजूचीं ठिकाणेंसुद्धां रामकथेशीं संलग्न झालेलीं आहेत. ही पंचक्रोशी अथवा परिसर राम-विषयक दंतकथांनीं गजबजलेला आहे. येथील भूगोल राममय आहे म्हटलें तरी चालेल. येथील असंख्य स्थळांनीं अद्यापिहि रामनाम सोडलेलें नाहीं! कांहीं उदाहरणें नमूद करतों.

रामगडच्या लगत चित्तलिखनी नांवाचा एक पहाड आहे. (बहुधा हा चित्रलेखन याचा अपभ्रंश असावा.) येथून रावणानें सीताहरण केलें अशी समजूत आहे. या पहाडावर सुमारें शंभर फूट लांबीपर्यंत, अक्षरांच्या चार ओळी कोरलेल्या आहेत. खेदाची गोष्ट ही कीं, या शिलालेखांतील बहुतेक अक्षरें कालप्रभावानें पुसून गेलीं आहेत. रावण या रस्त्यानें सीतेला बळजबरीनें नेत असतांना तिनें रामाकरितां हा संदेश लिहून ठेवला असें सांगतात. एक **रामचबुतरा** आहे. तेथें राम बसत असे. खालील कांहीं बोलकीं नांवें पहा : रामपूर, लक्ष्मणपूर, सीतापूर, विश्रामपूर, रामकोल टप्पा, लक्ष्मणढी (लक्ष्मण रहात असे त्यावरून पडलेलें नांव) इ० इ०.

## पर्वताग्रावरचें अतिप्राचीन देऊळ, रामगड



आंत राम-लक्ष्मण-सीता यांच्या मूर्ति आहेत.

## त्या देवळांतील मूर्ती



रामगडवरील सीता - राम - लक्ष्मण यांच्या वनवासांतील प्रतिमा. सीता रामाच्या उजव्या अंगाला !

चित्रकूट सोडल्यानंतर विश्रामपूर येथें रामानें वनवासाचीं दहा वर्षे वास्तव्य केलें होतें, म्हणून त्याला 'विश्राम'पूर म्हणतात.

असो. येथील राम-आख्यायिका कोठवर सांगाव्या? संशोधक बेगलर-साहेबांचा रामगड-वर्णनाचा एक छोटा उतारा देतों :

"One comes upon a number of large natural open caves. Here it is said Munis and Rishis used to reside-some say Rama himself used to live here...whether Rama did or not, Rama's name certainly resides in these ceves with a vengeance, for the last occupant has completely filled every inch of available spot in and about the caves with the names of Rama and Sita in red and white earth! When the fair is held on this hill, pilgrims visit this place also. It is said this used to be Valmiki's residence. hence the piligrimage. (A. S. I. XIII p. 38-39.)

या गुहांतील अखेरच्या रहिवाशानें तेथें लाल व पांढऱ्या रंगानें काढलेल्या राम व सीता यांच्या नामाक्षरांनीं त्या गुहा आंतून-बाहेरून चितारून ठेवल्या होत्या. तिळभरहि जागा मोकळी ठेवलेली नव्हती! हा राम-वास्तव्याचा पुरावा नव्हे खास. तथापि येथें रामानें वास्तव्य केलें, अशा प्राचीन परंपरागत समजुतीचा व श्रद्धेचा मात्र हा पुरावा आहे हें निश्चित. लोक तोंडानें बोलत होते तेंच त्यानें हातानें लिहून ठेवलें!

रामगड व त्याच्याभोंवतालचा रमणीय भूभाग हुबेहूब वाल्मीकीनें रामायणांत वर्णिल्याप्रमाणें आहे, याची प्रत्यक्ष प्रचीति बेगलरसाहेबांना आली. ती त्यांनीं खालीलप्रमाणें व्यक्त करून ठेवली आहे :

I cannot speak too highly of the natural beauties of the hill-tracts; the swift clear streams leaping in cascader and lying in still, deep pools, of every rich colour from bright emerald green to deep dark reddish-brown fringed by a vegetation so rich, so green and in such charming contrast to the dark black and bright red lines of the weather-beaten rock and freshly exposed earth; the murmur of the streams; the songs of birds; the herds of deer; the more distant hills of a soft blue; and the nearer rocks rugged and tinted with bold dashes of red and yellow and black, make up a charming whole rarely surpassed. The exquisite descriptions of the Ramayana are literally true-all except the hermits' "coats of bark" and their belongings. (A. S. I. XIII p. 66.)

बेगलरसाहेब म्हणतात : या भूप्रदेशाच्या निसर्ग-सौंदर्याचें वर्णन कोठवर करावें? कितीहि प्रशंसा केली तरी ती अतिशयोक्ति होणार नाहीं! ते जलप्रपात, रम्य

व नटलेली वनश्री, झुळझुळ वहाणारे निर्झर, पक्ष्यांचें मंजुळ गान, हरिणांचे कळप, लांबचे निळे दिसणारे व जवळचे तांबूस-पिवळट दिसणारे डोंगर—यापेक्षां अधिक मनोवेधक निसर्गदृश्य क्वचितच असूं शकेल. या स्थळांचीं रामायणांतलीं वर्णनें अक्षरशः खरीं आहेत – समर्पक आहेत.

रामगड हाच प्राचीन चित्रकूट, ही समजूत पूर्वापार चालत आलेली आहेः

Tradition says, Sita used to reside in the cave known as Sita Bengra. The Reur river, which flows not very far off from the foot of the hill, is identified with the Mandakini... and *tradition further says that this (Ramgadh) is the* Chitrakuta Hill rendered immortal by Rama's sojourn.

(A. S. I. XIII. p. 42)

उत्तरेकडची हल्लींची रूहर नदी हीच मंदाकिनी आणि रामगड हाच रामानें वास्तव्य केलेला ऐतिहासिक चित्रकूट पर्वत, अशी प्राचीन परंपरा व समजूत आजतागायत आहे. ती खरी असली पाहिजे. म्हणूनच नि:पक्षपातानें पहाणाऱ्याला रामगड–भूभाग आणि रामायणांतलें वर्णन यांच्यांत विलक्षण साम्य दिसतें. बेगलरसाहेबांनीं म्हटलें तें बरोबर आहे : वल्कलधारी ऋषिमुनींखेरीज बाकीचें रामायण-वर्णन आजहि रामगडभागाशीं तंतोतंत जुळतें !

## गोंड्वनांतील कोल लोकांच्या कथा

### राम-विषयक

शेवटीं एकच महत्त्वाचा निर्देश करून बाकीचें दंतकथांचें उरलेलें दप्तर गुंडाळून ठेवूं. या भागात रहाणाऱ्या गोंडवनांतील कोल या आदिवासी व जंगली लोकांच्यामध्यें ज्या प्राचीन कथा व लोकगीतें चालत आलीं आहेत त्यात राम-विषयकांचाच भरणा बहुत आहे. राम आणि त्याचा सीतेबद्दलचा विरहविलाप हा अनेक गीतांचा विषय आहे. पुष्कळ गाण्यांतून रामाचा सीता-शोध वर्णिलेला आहे. कोल लोकांची वस्ती फार प्राचीनकालापासून विंध्यांत व विंध्याच्या दक्षिणेला आहे. विंदाजलि, विंदवासिनी, विंदवासिनीमाई ह्या त्यांच्या देवतांच्या नांवावरून ही गोष्ट स्पष्ट दिसते. वनवासी रामचंद्र या भागांत रहात होते. तेव्हां स्वर्गांतील देव त्याला साहाय्य व सोबत करण्याकरितां येथें अवतरले. नंतर राम चवदा वर्षांनीं अयोध्येला परत गेला तेव्हां हे देवहि पुन्हा इंद्रपुरीला गेले. आजचे कोल लोक हे त्या वेळीं स्वर्गांतून अवतरलेल्या देवांचे वंशज आहेत, अशी त्यांची समजूत आहे. रामलक्ष्मणांच्या कित्येक दंतकथा प्रचलित आहेत. रामाला कोल लोक भगवान् या नांवानें संबोधतात. त्यांच्या धार्मिक गाण्यांमधून राम आहेच. एकदोन नमुने पहा. पहिल्या गाण्यांत रामनाम घेतात पण दशरथाचें कोणी घेत नाहीं, याबद्दल विषाद आहे.

३. चित्रकूट भागांत यक्ष-किन्नर-विद्याधर-उरग इत्यादिकांची वसति होती, (रामायण) हें तर खरेंच. परंतु इतिहास-कालांतहि यक्ष व नाग लोक तेथें रहात होत असा पुरावा सांपडतो. बौद्धांच्या संयुत्तनिकाय ग्रंथांत अनेक यक्ष-सूत्रें आहेत. हीं सर्व चित्रकूटाच्या किंचित् उत्तरेला अथवा ईशान्येला मगधांतलीं-विहारच्या पश्चिम भागांतलीं आहेत. त्यांत इंद्रक, शक ( = शक्र ), *मणिभद्र*, *प्रियंकर*, *पुनर्वसु* इत्यादि तेथें रहात असलेल्या यक्षांशीं बुद्धाची भेट व संवाद झाल्याचें वर्णन आहे. यावरूनहि ही यक्षभूमि होती हें स्पष्ट दिसतें. या पार्श्वभूमीमुळें यक्षाला नायक करण्याची कल्पना कवीला सहजच स्फुरली असावी. अर्थात् त्याच्या निवासाला चित्रकूटच योग्य होता ! म्हणून कालिदासानें त्याला रहाण्याकरितां रामगिरीवरचें **रामाचे** आश्रम दिले.

४. पावित्र्याच्या जोडीला निसर्ग-रमणीयत्व, भव्यत्व. आदर्श एकांत स्थळ. निसर्गानें नटविलेला हा भूभाग कोणत्या कवीचें मन मोहून टाकणार नाहीं ?

५. कालिदास भव्यतेचा भोक्ता होता. Little things please litte minds अशी म्हण आहे. उंच कवि उंच पर्वत पसंत करीत असतो. मातबर लोक, विफल झाल्या तरी हरकत नाहीं, पण मोठाल्या महत्त्वाकांक्षा बाळगणारे असतात.

मोच्चार्थी विफलोऽपि दूषणपदं दूष्यस्तु कामो लघुः ।

किंबहुना हीच त्यांच्या यशाची गुरुकिल्ली अथवा पराणी म्हणतां येईल. प्रत्यक्षांत देखील ही भरारी, मग 'वचने किं दरिद्रता ?' बोलूनचालून काव्यच रचायचें, मनोरथच चालवायचा, मग पांचशेंफुटी टेकड्या कशाला ? गगनचुंबी शिखर कां नको ?

६. चित्रकूटाच्या वृक्षविलानें निसर्गाच्या नादीं कालिदासाला खासच भुरळ पाडली असेल. उंच पर्वत व शिखरस्थ मेघ यांच्याप्रमाणेंच पर्वतरंध्रें आणि त्यांतून *वहाणारा वारा हीं त्याचीं आवडतीं दृश्यें आहेत. तीं हटकून वर्णन करण्याचा* त्याचा कल व कला झांकत नाहींत.

७. चित्रकूट आणि त्याचा परिसर हा तपोवनानीं पावन झालेला प्रदेश होता.

तीर्थे तीर्थे निर्मलं ब्रह्मवृंदं । वृंदे वृंदे तत्त्वचिंतानुवादः ।

वादे वादे जायते तत्त्वबोधः । बोधे बोधे सच्चिदानंदभासः ।

अशा तऱ्हेचें उदात्त वर्णन लागू पडणाऱ्या योग्यतेचें तें ठिकाण होतें. नदी-पर्वताप्रमाणेंच गतिमान् व अचल अशा परोपकारी मुनिजनानीं तो भूभाग रमणीय झालेला होता. ऋषि, त्यांचे आश्रम, त्यांच्या पर्णकुटिका, त्यांची तपस्या व त्यांचीं तपोवनें हा कालिदासाच्या प्रेमादराचा विषय होता. त्याचा दुष्यंत म्हणतो—

विनीतवेषेण प्रवेष्टव्यानि तपोवनानि नाम ।

राजांनाहि धाक व आदर वाटावा असा त्या तपोभूमीचा महिमा होता, म्हणून हा 'महर्षिसेवित' पर्वत आणि त्यावरचे आश्रम कवीनें आपल्या खंडकाव्याकरितां कायम केले.

८. कालिदासाचा काल निश्चित नाहीं. तथापि तो भासापासून फारसा लांब नाहीं खास. कारण भास आणि त्यांच्या दरम्यान सौमिल्ल व कविपुत्र या दोघांखेरीज तो कोणाचा नामनिर्देश करीत नाहीं. हें दोघांच्या दरम्यान दीर्घकालावधि लोटला असल्याचें चिन्ह नाहीं. एकूण भासकालीन परिस्थितींत कालिदासाच्या वेळीं प्रचंड फरक पडलेला असल्याची शक्यता कमी. पूर्वी सांगितल्याप्रमाणें तत्कालीन आर्यांचें जग – आर्यावर्त – स्थूलमानानें दोन टोंकांच्या आंत होतें. उत्तरेची सीमा हिमालय आणि दक्षिणेची विंध्यांचल ( हिमवद्विंध्यकुंडलाम ). कालिदासाच्या काव्यांत उत्तरेकडील भागाचें वर्णन जसें सरस व रंगलेलें आढळतें तसें दक्षिण दिग्भागाचें म्हणजे विंध्य-नर्मदेच्या अलीकडचें आढळत नाहीं याचें कारण तेंच. कान आणि डोळे यांतलें हें अंतर आहे ! प्रत्यक्ष परिचयाचें एक पाऊल देखील कल्पनेच्या विमान-संचारापेक्षां ठाम व भारी असतें. An ounce of experience is better than a pound of knowledge असें म्हणतात तें उगीच नव्हे. तत्कालीन आर्य जगताचीं दोन उंच टोंकें किंवा सीमा - विंध्याचल ते हिमाचल, कवीनें आपल्या कथानकाचा प्रारंभ बिंदु व अखेरीचा बिंदु म्हणून कल्पिणें स्वाभाविक आहे. त्यांत औचित्य व सौंदर्य होतें. मेघ यक्षाचा प्रतिनिधि पण मुळांत यक्षच कालिदासाचा प्रतिनिधि आहे ! रामगिरि ते हिमगिरि हा मेघदूताचा प्रवास म्हणजे कालिदासाच्या प्रतिमा-सूर्याचें उत्तरायण होय !

९. *हा विंध्यपरिसरांतील भाग जन्मभूमीच्या निमित्तानें किंवा वास्तव्यामुळें* कवीच्या प्रेमाचा व परिचयाचा असला पाहिजे हें पूर्वी सांगितलें आहे. चक्र वांकडी वाट करून त्यानें विदिशा व उज्जयिनीकडे मेघाला ओढलें आहे. उपमा देतांनाहि तो विंध्याला विसरत नाहीं. त्याच्या ऋतुसंहाराचें चक्र तर याच पर्वताभोंवतीं फिरतें आहे. मग याहि ठिकाणीं आपल्या प्रिय विंध्याला काव्यबद्ध करण्याची आयती चालून आलेली संधि कृतशचतुर कालिदास कां गमवील ? शिवाय विदिशा, उज्जयिनी व त्या भूप्रदेशांतील परिचित डोंगर-नद्या विंध्याच्या अनुषंगानें वर्णावयाला मिळणार होत्या तें वेगळेंच.

१०. *मेघदूतांतील कथानकाचें जें केवळ काल्पनिक व गूढरम्य स्वरूप आपण* हल्लीं मानतों तसें त्याच्या रचनेच्या काळीं नसावें. कालिदासपूर्व काळापर्यंत तेथें यक्ष लोकांची वसति होती असें मानण्याला आधार आहे. यक्ष-पूजा मोठ्या प्रमाणावर प्रचारांत आली होती – मौर्यांपासून ते गुप्तकाळाच्या प्रारंभापर्यंत त्या त्या काळांतील यक्ष-यक्षिणींच्या शेंकडों सुंदर शिल्प-मूर्ति अद्यापि सांपडतात. त्यांतील कांहीं नमुने मथुरेच्या वस्तुसंग्रहालयांत ठेवलेले आहेत, ते पाहून मन प्रफुल्ल होतें. सुर-असुर-देव-राक्षस-वानर ही जरी इतिहास व कल्पना या आईबापांची संयुक्त प्रजा, तीच स्थिति यक्ष या जातीची असली पाहिजे. असो कवीनें मेघदूत रचतांना निघण्याचें स्थळ आधीं ठरविलें कीं अखेरचा मुक्काम आधीं निश्चित केला ! त्याच्या

डोक्यांतल्या नकाशांत कल्पनेनें आधीं कोणता बिंदु टिपला – हिमालयांतली अलका कीं विंध्याचलांतील रामगिरि ? कल्पित काव्यांतला व्यवहार प्रत्यक्षाच्या उलट असतो. काव्यमंदिर उभारतांना प्रायः आधीं कळस मग पाया अशीच बांधणी असते. शापित यक्षाच्या निर्वासनाची तयारी पक्की झाली तेव्हां कालिदास त्याला रहाण्याकरितां जागा शोधूं लागला. मनांत बिंबलेला चित्रकूट सहजच सुचला. तो थोड्या विचाराअंतीं त्यानें यक्षाकरितां लगबगीनें पक्का करून टाकला. तेथें सगळी ‘ सोय ’ होती. त्याच्या सर्व गरजा तेथें भागल्या, हें आपणांस माहीतच आहे.

यक्ष अलकेहून इकडे आला म्हणून तर तो मेघाला इकडून तिकडे पाठवूं शकतो आहे. मेघदूतांतील जो पहिला श्लोक म्हणून आपल्याला दिसतो त्यांतलें स्थळ किंवा कल्पना मात्र पहिली नव्हे. नाटकांतल्याप्रमाणेंच मेघदूत काव्यांतहि रामगिरीवरचा प्रारंभींचा यक्ष-प्रवेश कवीच्या मनोभूमीवरचा नंतरचा प्रवेश होय. नदीवर घाट बांधतात तद्वागत मेघदूताच्या श्लोकांच्या पायऱ्या अगदीं क्रमवार रचल्या असतील, असें वाटत नाहीं. काव्यांत गणित असलें तरी त्याच्या रचनेला गणितशास्त्राचे नियम लागू नाहींत. आम्हांला तर या खंडकाव्याचा थाट असा वाटतो कीं, उत्तरमेघ किंवा निदान त्यांतील बराचसा भाग ऊर्मीसरशीं प्रथम स्फुरला तसा पुरा केला आणि मागाहून त्याला पूर्वमेघ आरंभाकडून जोडला. भारतांत वस्ती केलेल्या मूळ आर्यांप्रमाणें कालिदासहि मेघदूतांत उत्तरेकडून पूर्वेकडे आलेला असावा असें दिसतें. चित्रकार तरी काय करतो ? कामुकाप्रमाणें त्याचीहि नजर मुद्द्यावर असते ! तो प्रारंभींच चित्रमध्यगत मूर्ति आणि त्यांतूनहि तिचें मुख प्रथम हस्तगत करतो आणि मागाहून आजूबाजूची आवश्यक पण दुय्यम पार्श्वभूमि चितारीत बसतो. कवीची रीत तद्वीच. यक्षप्रश्नाचें उत्तर जी उत्तरेकडील अलका व तत्रस्थ यक्षपत्नी-ती आधीं रंगवून घेतली आणि भौंवतालची चित्रकूटाची चौकट रामगिरीच्या नव्या नांवाखालीं मागाहून आंखली. पडद्यामागचा प्रतिभेचा उफराटा प्रवास बाहेरून मुलटा दिसूं लागला !

११. हिमालय व कैलास हें आर्यांचें प्राचीन कालापासून आदराचें व श्रद्धेचें स्थान आहे. हें शिखर प्रत्यक्ष शंकराचें निवासस्थान होय. हा नगाधिराज ‘देवतात्मा’ आहे. उंच हिमालय हें जणूं आर्यांचें व त्यांच्या संस्कृतीचें प्रतीक व ध्येय-बिंदु आहे. हा हिमशुभ्र गगनचुंबी पर्वतराज विरागतेचा, आध्यात्मिक उच्चतेचा, सांस्कृतिक श्रेष्ठत्वाचा व उन्नत वृत्तीचा द्योतक समजला जातो. म्हणूनच कालिदासाच्या बहुतेक प्रसंगांची व कथानकांची परिसमाप्ति या उच्च पातळीवर झालेली दिसून येते. शाकुंतलाचा शेवटला प्रवेश कालिदासानें हिमालयाच्या पवित्र व उन्नत भूमीवर योजलेला आहे. पहिला अंक पायथ्याशीं होता. सातवा अंक माथ्यावर

आहे. कालिदासाच्या कथानकाप्रमाणें त्याचीं पात्रेंहि चढत जावात हें त्याचें वैशिष्ट्य-नायक-नायिकांनीं जणूं आपल्या खडतर तपश्चर्येनें माणूस आणि देव यांतलें अंतर तोडलें. वैषयिक रंग-भूमि सोडून त्यांनीं आतां आध्यात्मिक उन्नत भूमिकेंत प्रवेश केला, असा त्यांतील ध्वनि आहे.

सारांश, हिमालय नक्की ठरला. आतां त्याला शोभेल असा सामनेवाला हवा होता. उत्तरेकडील समाप्तीचें किंवा पर्यवसानाचें टोंक निश्चित झालें. तथापि दक्षिणेकडील आरंभींचें टोंक ठरविण्याचें स्वातंत्र्य व सवड मेघदूताच्या कार्याला होती. पण हिमालयाशीं टक्कर कोण देणार? त्यांतल्या त्यांत विंध्यच. हिमाचलाच्या खालोखाल विंध्याचलच डोळ्यांत भरण्यासारखा होता. विशेषतः त्यांतील चित्रकूट पर्वत. रामायणानें तर त्याला प्रत्यक्षच हिमालयासारखा, त्याच्या तोडीचा[1] म्हणून गौरविलेलें होतें. त्याचा पूर्वेतिहास व लौकिकहि बरा होता. महर्षींशीं व रामादिकांशीं त्याचा संबंध होता. हिमालयाशीं अनुरूप म्हणून कालिदासानें चित्रकूट पसंत केला.

१२. आणि या दोन स्थळांची कालिदासाची आवड व निवड किती योग्य होती, हें त्यांच्यांतील भव्य व मोहक सादृश्य पाहिलें म्हणजे कळून येतें. विंध्यांतला चित्रकूट आणि हिमालयांतील कैलास दोघेहि उंच, विस्तीर्ण, दुर्लंघ्य. दोन्ही आर्यभू-देवीच्या कानांतील जणूं कुंडलेंच. एक रामगिरि तर दुसरा हिमगिरि. एक उत्तरसीमेवरचा मानदंड तर दुसरा दक्षिणसीमेचा पहारेकरी. दोघेहि महर्षिसेवित. दोघेहि निसर्गरम्य, दर्शनीय, भव्य. दोघांचीं उत्तुंग शिखरें गगनोदराला टोंचणारीं. दोघांकडे तापसजनांचे आश्रम. दोघेहि पवित्र, पुण्योदक. जणूं ते स्वर्ग-पथच (रामा॰). दोघेही तुल्यबल, निदान तुलनीय. एकाला रामाचे पाय लागलेले, दुसऱ्याला शंकराचे. चित्रकूट रघुपतिपदांनीं अंकित तर हिमालयावर हरचरणन्यास! रामगिरीवर कक्षबिल किंवा स्रोतोरंध्र तर हिमालयावर हंसद्वार अथवा क्रौंचरंध्र! (मे. ५७) एकाचें नांव चित्रकूट तर दुसऱ्याचें[2] हंसकूट!

१३. पावसाळ्याच्या प्रारंभापासून चार महिनेपर्यंत वाऱ्यांची एक दिशा असते. मेघांचा नैसर्गिक प्रवास अर्थातच या वाऱ्यांच्या सोबतीनें व साहाय्यानें चालतो. भारतीय हवामानखात्यांतील एक प्रमुख अधिकारी व तज्ज्ञ डॉ. सेन यांनीं या दृष्टीनें मेघदूताचें संशोधन करून Kalidas, the Great Materiologist या नांवाखालीं एक प्रबंध लिहिला होता. तो कलकत्त्याच्या बंगाली मासिकांत प्रसिद्ध झाला होता, अशी माहिती मिळते. तथापि सदरील लेख प्रस्तुत लेखकाला

१. गंधमादनसंनिभः, गिरिराजसमः (अयो॰ का॰ ५४ २९ व ९८.१२) गिरिराज म्हणजे हिमालय. गंधमादन हें कैलासाचें एक शिखर.

२. हिमालयाच्या शिखरांना हंसकूट हें नांव आहे.

मिळूं शकला नाहीं. मिळाल्यास त्यांतील माहिती इंग्रजी आवृत्तींत दाखल करूं. त्यात डॉ. सेन यांनीं कालिदासाच्या मेघाचा मार्ग हवामानशास्त्राच्या म्हणजे निसर्गाच्या नियमांना अनुसरून आहे, असें सिद्ध केलें आहे. तात्पर्य, हिमालयाकडे



पर्जन्यधारी मेघ कोणीकडून येतात हें स्थूलमानानें निरीक्षण करून त्याला जुळणारा चित्रकूट कवीनें कायम केला असावा. दरवर्षी पावसाळा सुरू होण्याच्या आरंभीं नैर्ऋत्य मान्सून वाऱ्यांची एक शाखा बंगालच्या उपसागरांत शिरते व याच सुमारास त्या उपसागरांत जोराचीं वादळें उत्पन्न होतात. त्यामुळें त्या वाऱ्यांची गति पश्चिमाभिमुख होऊन तो महानदीचें खोरें, छोटानागपूरचा डोंगराळ प्रदेश व माळव्याचें पठार या भागांत घुसतो व याच वेळीं या नैर्ऋत्य मान्सून वाऱ्यांची दुसरी शाखा कोंकणपट्टींतून वर येऊन ती तापी, नर्मदा यांच्या खोऱ्यांत शिरते. माळव्याच्या पठारावर हे दोन वारे एकत्र झाले म्हणजे ते आपला उत्तरेकडचा मार्ग सुरू करतात.

## कालिदास रामगडवर आला होता

रामगडचें रामगिरि या नांवाखालीं कालिदासानें जें वर्णन केलें आहे त्यावरून हाच रामाचा चित्रकूट याबाबत शंकेला जागा रहात नाहीं. त्याहीपेक्षां त्यानें केलेलें चित्रकूटाचें रघुवंशांतलें रेखीव वर्णन पाहिलें म्हणजे तें हल्लींच्या रामगड-पर्वताचें आहे, हें स्पष्टतेनें प्रतीत होतें. 'धारास्वनोद्गारिदरीमुखोऽसौ' हें वर्णन निःसंशयपणें रामगडच्या गगनचुंबी शिखराचें, हाथिफोड गुहेचें आणि त्यांतील आवाज करणाऱ्या जलप्रपाताचें आहे. एवढेंच नव्हे तर हा देखावा प्रत्यक्ष पाहिलेला, अनुभविलेला असल्याखेरीज असें शब्दचित्र रेखाटणें शक्य नाहीं. हें **न पाहिलेल्या माणसाचें वर्णन नव्हे.** कालिदास रामगडवर आला होता, व त्यानें कांहीं काळ तेथें वसति केली होती, हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट आहे. फार काय, पण मेघदूत व रघुवंशांतील कांहीं भाग त्याला येथेंच स्फुरला. त्या लघुमहाकाव्याचा पायाच नव्हे, तर कांहीं मजले त्यानें येथेंच–याच उंच स्थळीं रचले. रामायणातला राम वनवासांत येथें आला होता, ही घटना जितकी निःसंदिग्ध तितकीच कालिदास येथें आला होता ही गोष्ट निश्चित. रामगड या दोघांच्या पदस्पर्शानें पावन झालेला पर्वत आहे. जगांत दोन प्रकारचे लोक यशाचे धनी होतात :

ते धन्याः ते महात्मानः तेषां लोके स्थितं यशः
यैर्निबद्धानि काव्यानि ये वा काव्येषु कीर्तिताः ॥

कविश्रेष्ठ कालिदास धन्य आणि त्याच्या काव्याला विषय पुरविणारा धनुर्धारी राम त्याहून धन्य! अशा दोघांना आपल्या अंकावर खेळविल्याचें भाग्य ज्याला लाभलें, तो उंच पर्वतहि धन्य नव्हे काय?

## रामाचा चित्रकूट तोच यक्षाचा रामगिरि

सारांश, चित्रकूट पर्वत प्राचीन, पवित्र, राम-संबंधित, लोकांत प्रसिद्ध, उंच, रमणीय व दर्शनीय आणि कैलास-शिखराशीं तुल्यबल अथवा शोभन्यासारखा म्हणून कालिदासानें पसंत केला. अर्थात् परिचित व राम-संचारित हीं कारणें सर्वांत प्रबळ. पण हा प्राचीन चित्रकूट कांहीं एकदम रामगड बनलेला नाहीं. दरम्यान पुष्कळ पायऱ्या आहेत. काळाच्या धुक्यामुळें त्या लांबून दिसत नाहींत. कालभेदानें व कारणपरत्वें या पर्वताला अनेक नामांतरांतून व अवस्थांतरांतून जावें लागलें आहे.

**विंध्य→ऋक्ष→चित्रकूट(=प्रस्रवण)→गुहागिरि (अयो० १०३४९) →रामगिरि→रामगड** अशी त्याच्या नामांतराची वंशावळ किंवा परंपरा मांडून दाखवितां येईल.

चित्रकूटावर ऋक्षबिल गुहा असल्यामुळें रामायणांत त्याला गुहागिरि म्हटलें आहे. पुढें रामाच्या वास्तव्यामुळें त्याला रामगिरि हें नांव लोकांत मिळालें असलें तर त्यांत नवल तें काय? तें स्वाभाविकच आहे. नावें-विशेषतः प्राचीन काळीं वर्णनात्मक व त्या त्या स्थळांच्या वैशिष्ट्यांवरून पडलेलीं असतात. नांव ठेवणें आणि नांव पडणें यांत फरक आहे. जीं नांवें आपोआप पडतात व लोकांत रूढ होतात त्यांमध्यें वस्तूचें नेमकें वैशिष्ट्य प्रकट झालेलें असतें. ठिकाणाची चटकन् ओळख पटविण्याची शक्ति त्यांत असते. किंबहुना त्यासाठींच त्यांचा जन्म होतो. हेंच पद-पदार्थसंबंधांतील रहस्य होय.

लोकमुखाच्या हलत्या पाळण्यांत पडलेलें नांव म्हणींप्रमाणें सार्थ, वैशिष्ट्य-दर्शक व सर्वसंमत असतें. डोंगरांतल्या पाऊलवाटेप्रमाणें तें सहज रूढ होतें व अंगवळणीं पडतें. 'पुष्पसंगें मातीस वास लागे' या न्यायानें प्रसिद्ध व्यक्तींच्या सह-वासामुळें त्या त्या भूमीला त्यांचीं नांवें मिळतात, हा नेहमींचा अनुभव आहे याच चालीनें चित्रकूटाचा गुहागिरि व नंतर रामगिरि झाला. विचित्र शिखर किंवा गुहा यांपेक्षां राम-संबंधाचें वैशिष्ट्य कितीतरी पटीनें अधिक. ओळख पटविणें, हा जो नामाभिधानाचा किंबहुना शब्दांचा व भाषेचा जन्महेतु, तो या नवीन नाम-करणानें कशा सहजसुंदरतेनें साधला पहा. म्हणूनच लोकांनीं स्वयंस्फूर्तीनें स्वतःच्या सहस्रमुखांनीं अगर लोकमुख असा जो कवि त्याच्या तोंडानें चित्रकूटाचें 'रामगिरि' असें नवीन नांव उद्घोषित केलें व प्रचारांत आणलें. **राम येथें राहिले तो**

**रामगिरि असा हा मध्यमपदलोपी समास आहे. 'येथें राहिले' या मधल्या पदाचा व्याकरणानें लोप केला आणि येथें राहिले, या मधल्या इतिहासाचा काळानें लोप केला.**

पुढें रामगिरीचा रामगड असा अपभ्रंश झाला. असा होतो. मेघदूतांतल्याच देवगिरीचा नाहीं का हल्लीं देवगड झालेला ? ( मे० श्लोक ४२ ).

**पार्श्वाभ्युदयाची साक्षः**—आतां रामगिरि म्हणजेच चित्रकूट या सिद्धप्राय प्रमेयाला जर आणखी पुराव्याची आवश्यकताच असेल, तर एक छोटेंसें उपोद्बलक प्रमाण येथें दाखल करतो. सातव्या शतकांत होऊन गेलेला जैनांचा आचार्य व कवि ( राष्ट्रकूट नृपति अमोघवर्ष याचा गुरु ) जिनसेन यानें पार्श्वाभ्युदय नामक काव्य रचलें आहे. तें मेघदूतावर समस्यापूरणाच्या पद्धतीनें रचलेलें आहे. म्हणजे तीन ओळी स्वतःच्या व एक ( अगर दोन ) ओळी मेघदूताच्या, असा हा प्रकार आहे. रामगिरीवरील रामचरणांचा उल्लेख आलेल्या चरणांवरील जिनसेनाचा हा श्लोक पहाः—

भूयश्चानुस्मर सिषिधुषः कार्यसिद्धयै प्रयत्य
प्रायेणेष्टा महति विधुरे देवताऽनुस्मृतिर्नः ।
सिद्धिक्षेत्रं शरणमथवा गच्छ तं रामशैलं
वन्द्यैः पुंसां रघुपतिपदैरङ्कितं मेखलासु ॥ ४६ ॥

आतां या श्लोकावरील जैनांचीच पारंपरिक टीका पहा :

सिद्धिक्षेत्रम् श्रेयस्थानम् । तं रामशैलम् ।
रामगिर्यपराभिधानं चित्रकूटम् । शरणं शरण्यम् ।
गच्छ याहि । संग्रामभीरुश्चेत् तत्पृष्ठगतो भव इत्यर्थः ।

यावरून सातव्या शतकापासून रामगिरि म्हणजे रामाचा चित्रकूट अशी समजूत होती, याबाबत शंका रहात नाहीं. ( विशेषतः सिद्धिक्षेत्र हा शब्द पहा. ) रामशैल शब्दावरून मात्र रामगिरि हें विशेषनाम म्हणून तत्पूर्वी रूढ नव्हतें, असा तर्क होतो. हें वैशिष्ट्यदर्शक, बोलकें सुंदर नांव कालिदासानें प्रथम योजलें असें दिसतें.

असो. मध्यंतरींच्या काळांत इतिहास-परंपरा तुटली. नांवें बदललीं. पण शिखर तेंच आहे ! बाकी बदलतें परंतु ही न बदलणारी खूण आहे. उत्तररामचरितात राम दीर्घकालानंतर पुन्हा पंचवटींत येतो. त्या वेळीं त्याला तो पूर्वपरिचित प्रदेश ओळखूं येईना. इतका बदल त्यांत झाला होता. तेव्हां डोंगराच्या मुळक्यांनीं त्याची खात्री करून दिली कीं, हेंच तें वन. त्याप्रमाणेंच चित्रकूटाच्या बाबतींत झालें आहे. पुष्कळसें बदललें आहे – नावसुद्धा. बदलण्यासारखें आहे ते बदललें – बदलणारच. अंतर, दिशा, समजुतीदेखील बदलल्या, चुकल्या; म्हणून पर्वत इकडला

तिकडे जाणार आहे योद्धाच! तो जागच्या जागीं आहे; आपण फिरतों आहोंत. बुंदेलखंड आणि नागपुराजवळ यांची स्थापना चालू आहे!

राम आणि कालिदास यांनीं इतक्या सुंदरशा टेकड्यांना आपल्या वास्तव्यांत व काव्यांत स्थान यारा दिलेला नसेल. मणि टाकून आपण कांचा जमा करीत आहोंत. तथापि त्या भिन्नशिखराच्या बुटक्या टेकड्या किती वेळ भ्रांति उत्पन्न करूं शकतील? रामगडचें समुद्रानिर्झर गगनचुंबी शिखर जोंपर्यंत आकाशांत उंच घुसून राहिलें आहे तोंपर्यंत तोतये चित्रकूट आणि चुकीचे रामटेक फार काळ तग धरतील असें वाटत नाहीं. तें रामगडचें अर्थात् चित्रकूटाचें उत्तुंग पर्वतशिखर म्हणजे दिशा चुकलेल्या संशोधनाला रामाची जागा दाखविणारा उंच दीपस्तंभच होय, यांत शंका नाहीं. बाकीचें बदलेल पण शिखर बदलत नाहीं. म्हणून भवभूतीच्या रामाप्रमाणें हें उंच पर्वताग्र पाहून आपण म्हणूं शकतों कीं—

वहोर्दृष्टं कालादपरमिव मन्ये वनमिदं
निवेशः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति

योगायोग असा विचित्र कीं, या पर्वताची अशी त्रिस्थळी यात्रा झालेली आहे! बिचाऱ्याची ओढाताण होऊन त्याला हल्लीं तीन ठिकाणें संभाळावीं लागत आहेत! पराक्रमी हनुमानानें जसा द्रोणागिरि सर्वच इकडचा तिकडे नेला त्याप्रमाणें संशोधन-वीरांनीं याला उचलून नेऊन अन्यत्र स्थापन केला आहे. चित्रकूट नेला बुंदेलखंडांत, तर रामगिरि स्थापला नागपूरजवळ. रामगड बिचारा जागच्या जागींच उभा आहे. रामपदांचा धनी असून तो चोरासारखा कानकोंडा झाला आहे. त्याला कोणी पुसत नाहीं! रामगिरि हाच चित्रकूट नसेल ना, अशा संशयानें संशोधकांना मधूनच अस्वस्थता वाटे, हें खरें. पण त्या संशयाचें त्यांनीं निरसन करून टाकलें! कसें? बुंदेलखंडांतील म्हणजे हल्लींचा चित्रकूट रामगिरीशीं जमत नाहीं असें ठरवून! चुकीच्या रामगिरीशीं (म्हणजे रामटेकशीं) खरा चित्रकूटसुद्धां जुळायचा नाहीं मग चुकीचा चित्रकूट जुळून जमणार! यामुळें कुणाचा कुणाला मेळ नाहीं, अशी वेदंदशाहीची व असमाधानकारक स्थिति माजून राहिलेली आहे. म्हणतात ना : तुझें आहे तुजपाशीं, परि तूं जागा चुकलासी. अशी वेदान्तशास्त्रांतील आत्म्याप्रमाणें संशोधनक्षेत्रांत या पर्वताची अवस्था झाली. तथापि बारकाईनें व अंतर्मुखतेनें शोधलें कीं या तीन नामरूपांतलें एकतत्त्व खात्रीनें दिसल्यासारखें आहे. हा पर्वत शोधायला दुसरीकडे जावयाला नको. तो तेथेंच आहे – तीन आहे – एकच आहे.

* * *

## स्रोत ७ वा

# यक्षकथानक रामायणांतून घेतलें

कवेः यक्ष-वृत्तान्ते सीताराघववृत्तान्तसमाधिः अस्ति इति केचित्।
—पूर्णसरस्वती ( १४ वें शतक )

मेघदूताचें कथानक काल्पनिक कीं ऐतिहासिक? कवीनें स्वतःच्या डोक्यांतून काढलेलें कीं कशाच्या तरी आधारानें रचलेलें? या काव्यांत कांहीं लोक तर्क करतात त्याप्रमाणें कवीनें स्वानुभवाचें चित्र रेखाटलेलें आहे कीं काय? मेघदूत स्वतंत्र मसलें तर त्याचे मूलाधार कोणते? त्यांतील मध्यवर्ती कल्पना कशी व कशावरून सुचली? हा विरही नायक कोण? यक्षच कशाकरितां? यक्ष-कथानकाचा बाकीचा तपशील कोठून आणला? हा यक्ष प्रिया-विरहाच्या शापकालात रहाण्याकरितां नेमका 'रामगिरी' वरच कसा आला? हा उपटसुंभ रामगिरि कुठला? ( कारण त्याचा उल्लेख दुसरीकडे कोठेंच आलेला नाहीं ) हें नांव नवीन योजलें असलें तर तें रामगिरीच कां? शिवाय या पर्वताशीं राम आणि सीता यांचा संबंध कवीनें जोडला आहे त्यांतलें रहस्य काय? या रामगिरीवर आश्रम कोठून आले? आणि एका आश्रमानें भागण्यासारखें असतांना हा यक्ष अनेक आश्रमांत कां वसति करीत होता? त्याला जो शाप मिळाला होता तो वर्षभोग्यच कां? कमी किंवा अधिक मुदतीचा कां नाहीं? आणि ही एक वर्षाची मुदत पावसाळ्याच्या अखेर शरद् ऋतूच्या संधानांतच संपावी, यांतलें इंगित काय?

हे अनेक प्रश्न असले तरी त्या सर्वांचें उत्तर एकाच वाक्यांत देतां येण्यासारखें आहे। मेघदूत काव्य रामायणावरून रचलेलें आहे हें तें उत्तर होय. म्हणूनच बारकाईनें पाहिलें, कीं मेघदूतात रामायणांतील कथाप्रसंगांचें प्रतिबिंब स्पष्ट दिसूं लागतें. वर्णनें, कल्पना, शब्दप्रयोग, एवढेंच नव्हे तर कथानक देखील जसेंच्या तसें उचललेलें आढळतें तें क्रमानें पाहूं.

कालिदास महाकवि असला तरी वाल्मीकि आद्यकवि आहे. म्हणून तर त्याचा महिमा अ-पूर्व पहिली काव्य-'श्री' काढली वाल्मीकीनें. तो धडा इतरांनीं गिरविला. पण वळण तेंच होतें. *काव्यांत प्रथम राम आणला वाल्मीकीनें.* हें रहस्य रामरक्षेच्या सुंदर उपमेंत पहावयास सांपडतें.

कूजन्तं राम रामेऽति मधुरं मधुराक्षरं
आरुह्य कविताशाखां वंदे वाल्मीकिकोकिलम्

त्या वाल्मीकिकोकिळानें वाङ्मयरूपी उंच वृक्षाच्या कविताशाखेवर चढून रामगुणानुवादाचे पहिले स्वर आपल्या निसर्गमधुर व सुसंस्कृत कंठांतून काढले. याच राम-संगीताची शेवटली गोड ललकारी पुढें मजभार्षेत तुळशीदासजींनीं मारली. ही कोकिल-कूजनाची उपमा आणखी एका दृष्टीनेंहि अन्वर्थक होऊं शकते. कोकिळाचा ध्वनि मूळ धरून त्यावर संगीतांतील षड्जादिक स्वर बसविले व गायनशास्त्राचा विस्तार झाला. त्याचप्रमाणें भास-कालिदासादि सर्व उत्तरकालीन लेखकांच्या काव्यप्रपंचाची उभारणी आद्यकवीच्या पायावर झालेली आहे. या अर्थानें कोकिळाची उपमा अधिक सार्थ आहे. वाल्मीकि कविताशाखेवर चढला. मागाहून आले ते वाल्मीकीच्या खांद्यावर चढले आणि गाऊं लागले !

भगीरथाप्रमाणें काव्य-गंगा प्रथम आणली ती वाल्मीकीनें. कालिदास प्रभृति हे मागाहून आलेले आर्य वसाहतवाले होत. त्यांना ही गंगा आयती सांपडली— रहायला, पिकें काढायला, क्रीडा करायला. पण तिचा मूळ उगम वाल्मीकीच्या वारुळांत आहे. म्हणूनच जुन्या म्हणीला न जुमानतां या नदीचें मूळ व या ऋषीचें कूळ शोधलें पाहिजे. कालिदासाच्या काव्यजलाचे कालवे आद्यकवीच्या मूळ झऱ्यांतून काढलेले आहेत. ते वृक्षमूळाला फुटलेले फांटे व धरलेलीं फळें. तें वाल्मीकि-युग होतें. छंदोबद्ध रचनेची पहिली वसाहत त्यानें स्थापली. निःशब्दतेच्या अथवा गद्याच्या रुक्ष रानांत काव्याची पहिली ललकारी त्यानें मारली. कवितेच्या छंदाचा मूळ ऋषि वाल्मीकि. सैरावैरा धावणाऱ्या व वाऱ्यावर विरणाऱ्या अचपळ गद्याला पद्य-बंधांनीं बांधून स्मृतीच्या चौकटींत स्थिर केलें वाल्मीकीनें. निरपराधी क्रौंचपक्ष्याची हत्या पाहून मा निषाद प्रतिष्ठां त्वम् हा जगांतील पहिला श्लोक त्यानें रचला — अथवा अक्षरशः त्याच्या मुखांतून बाहेर पडला— कळवळून सहजस्फूर्तीनें. कालिदास वर्णन करतो—

निषादविद्धांडजदर्शनोत्थः
श्लोकत्वमापद्यत यस्य शोकः ॥

वाल्मीकीच्या शोकानें श्लोकाचें रूप धारण केलें. हीच रसवंतीची जन्मकथा. काव्याची उत्पत्ति, स्थिति व लय भावनाशोभांतच. काव्य किंवा प्रतिमा-विलास ही केवळ क्रीडा नसून माणुसकी हा तिचा आत्मा आहे, हें त्यांतलें रहस्य आहे. हा वाल्मीकीचा पहिला श्लोक काव्यनिर्मितीचा केवळ श्रीगणेशा नसून त्याचें प्रात्यधिक होय. म्हणूनच या आद्य काव्यरचनेवर सरस्वतीचें रूपक रचलें गेलें (बृहद्धर्मपुराण अध्याय २९·६४)

कवितारूपिणी च विद्यारूपा सरस्वती
तस्य शोकापनोदाय महर्षेर्मुखमापयौ ॥

ब्रह्मदेवानें सरस्वतीला कविशक्ति बनण्याचें वरदान दिलेलें होतें (भव त्वं कविताशक्तिः कवीनां वदनेषु ह।) क्रौंचवधानें शोकाकुल झालेला हा महर्षि पाहून सरस्वती त्याच्या जिव्हाग्रीं जाऊन बसली. अभिप्राय असा कीं, वाल्मीकीची काव्यरचना ही साक्षात् सरस्वतीची सृष्टि होय.

## रामायणाचें ऋण

वाल्मीकीनंतर झालेले संस्कृत कवि त्याच्याच छायेंतले-परंपरेंतले. ते रामायणाच्या सावलीतच वाढले. आद्यकवीच्या रामराज्यांतलेच ते प्रजाजन. भासापासून भवभूतीपर्यंतचें कविमंडळ म्हणजे वाल्मीकीचा विस्तारलेला वेशवेल होय. वाल्मीकीचें लाण अलीकडच्या काळापर्यंत येऊन पोंचलेलें आहे. रामकथेवांचून कवींचें भागण्यासारखें नव्हतें. प्रसन्नराघवांतील हें आरंभींचें संभाषण पहा.

**नट** : कथं पुनरमी कवयः सर्वे रामचंद्रमेव वर्णयन्ति ?

**सूत्रधार** : न अयं कवीनां दोषः । यतः ।

स्वसूक्तीनां पात्रं रघुतिलकमेकं कलयतां
कवीनां को दोषः स तु गुणगणानामवगुणः
....................सोयंकविल्वद्रुमः
किं वंध्यः क्रियते विना रघुकुलोत्तंसप्रशंसाफलम् ॥

सूत्रधार समजावून सांगतो : सर्व कवि रामाचेंच वर्णन करीत रहातात. हा त्यांचा दोष नव्हे, हा रामाच्या गुणांचा दोष आहे! रामप्रशंसारूपी फळाशिवाय कवित्वरूपी वृक्ष महत्त्व पावत नाहीं, त्याला काय करणार? सारांश, वाल्मीकीच्या रामायणाची छाप व छाया त्याच्यानंतर झालेल्या सर्व कवींवर कमीअधिक प्रमाणांत पडलेली आहे, यात संशय नाहीं.

तथापि वाल्मीकीच्या वाङ्मयीन वंशाचा खरा वारस व कुलदीपक म्हणजे कालिदास. प्राचीन संस्कृत साहित्याच्या नाण्यावर एका बाजूला वाल्मीकीचा छाप आहे तर दुसऱ्या बाजूवर कालिदासाची मुद्रा आहे. काव्यप्रांताचा मूळ राज्यसंस्थापक वाल्मीकि असला तरी त्याचा साम्राज्यांत विस्तार करून जगभर पताका मिरविली कालिदासानें. पहिला जणूं चंद्रगुप्त, तर दुसरा सम्राट् अशोक. या सवाई वाल्मीकीनें काव्यरचनेंत सफाईदारपणा, वैचित्र्य, बांधेसूदपणा व अलंकार यांची भर घालून आद्यकवीच्याहि वर झेंप टाकली. वल्कलधारिणी शकुंतलेप्रमाणें वाल्मीकीच्या कवितेंतहि अनलंकृत सौंदर्याची एक नैसर्गिक मोहिनी आहे. तथापि यथोचित अलंकारांनीं नटलेली कालिदासाची कविताकामिनी कांकणभर सरस म्हणावयास हवी.

*झणत्कार जीच्या करीं कंकणांचा*
*रुणत्कार जीच्या पदीं नूपुरांचा*

अशी कालिदासाची नादवती नाट्य-कविता नदीप्रमाणें जेव्हां रसिकांपुढें प्रथम अवतीर्ण झाली असेल त्या वेळीं त्यानें तर आद्यकवीवर कडी केली, असे उत्स्फूर्त उद्गार धन्य रसिकांच्या मुखांतून बाहेर पडले असतील, यांत शंका नाहीं.

त्या काव्योज्ज्वल युगाचा कालिदास हा पराक्रमी प्रतिनिधि असला तरी त्याचा मूळ प्रवर्तक वाल्मीकीच. कोणी मोठा कवि झाला तरी आकाशांतून पडत नाहीं. तो परंपरेच्या उदरांतून जन्माला येतो. त्या गर्भवासांत पूर्वजांचें संचितज्ञान शोषून त्यावर त्याचा पिंड वाढत असतो. अखिल वस्तुजाताप्रमाणें काव्योत्पत्तीलाहि उत्क्रांतीचें तत्त्व लागू आहे. संस्कृत कवितेनें विकासक्रमानें चढतां चढतां उच्च बिंदु गांठला. तोच कालिदास. वाल्मीकीची रामकथा ही चढणाऱ्या कालिदासाची शिडी होती. रामायणाच्या ऋणावर त्यानें मेघदूताचा यशस्वी काव्यव्यापार केला, हें प्रस्तुत प्रकरणांत दाखवावयाचें आहे.

त्याच्या महाकवित्वाचा व कवितेचा प्रारंभींचा सूक्ष्म तंतु कसा व कशांतून निघाला हें शोधण्यांत मौज आहे तसाच बोधहि आहे. राजशेखर म्हणतो तेंच खरें : **सर्वः परेभ्य एव व्युत्पद्यते.** नवा ग्रंथकार मांगल्याचें मांडवल घेऊनच पुढें जात असतो. सगळेंच नवीन कोण व कोठून आणूं शकणार? ज्ञानाच्या ईश्वरानें नाहीं का 'पूर्वाचार्यांना वाट पुसत' ज्ञानेश्वरी लिहिली? कालिदासानें तेंच केलें. मेघदूताच्या बनावटीला लागणारा सगळा कच्चा माल त्यानें रामायणाच्या उतारपेठेंतून आणला. विशेषतः काव्याच्या प्रांतांत विषय जुना पण मांडणी नवीन, अशा गुंफणीच्या तऱ्हेनें काव्यतत्वाचा विकास झालेला आढळतो. धागे तेच रंग वेगळाले, असा हा काव्याचा गोफ प्राचीन काळापासून विणला गेला आहे. मेघदूताच्या काव्यव्यापारांतलें मूळचें मांडवल वाल्मीकीचें. कालिदासानें तें चातुर्यानें वापरून शतगुणित केलें. कालिदास समजला जातो त्यापेक्षां किती पटींनीं तो रामायणाचा ऋणी आहे! पण त्यामुळें त्याचें श्रेय यत्किंचितहि कमी होत नाहीं.

तीं तीं पदें नित्य फिरोनि येतीं
त्या त्याच अर्थाप्रति दावितातीं

पण 'चातुर्य आहे रचनेंत मोठें' हें कवित्वाचें मर्म होय. वनवासी रामाच्या आकृतींतून विलासी यक्षाची कलाकृति त्यानें कोरून काढली ही कालिदासाची किमया. बाहेरून प्रकाश पडला तरी चमकावयाला स्वतःचे पैलू लागतातच. रेषा वाल्मीकीच्या रंग कालिदासाचे, असा हा दोन प्रतिमांचा प्रीतिसंगम आहे.

त एव पदविन्यासा त एवार्थविभूतयः
तथापि नव्यं भवति काव्यं ग्रथनकौशलात्

कथावस्तु तीच, विषय तोच, शब्द तेच, त्यांचा अर्थहि तोच. पण रचना-चातुर्यानें त्यांत नवें काव्य व सौंदर्य कसें निर्माण होतें याचें मेघदूत हें एक उत्कृष्ट प्रात्यक्षिक होय. वाल्मीकीचा मेघ होता. त्यांत वीज खेळविली कालिदासानें.

## मेघदूताचे मूलाधार

महाभारतांतील नलोपाख्यानांत हंसाला दूत म्हणून धाडल्याची कथा आहे. त्यावरून मेघाची कल्पना कालिदासाला सुचली, असा कांहीं विद्वानांनीं तर्क केला आहे. मेघदूतांतील—

इत्याख्याते पवनतनयं मैथिलीऽवोन्मुखी सा

या उल्लेखावरून मेघाला दूत म्हणून पाठविण्याची कल्पना काय ती रामकथेंतून घेतलेली असण्याची शक्यता आहे; तथापि बाकी सर्व सजावट मात्र कालिदासाची स्वतंत्र निर्मिति आहे, अशी सर्वसाधारण समजूत आहे. परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. या समजुतीपेक्षां रामायणाचा कितीतरी अधिक उपयोग कालिदासानें करून घेतला आहे. किंबहुना मेघदूताच्या कथानकांतील सर्व प्रमुख अंगोपांगांचा उगम व बीजें रामायणांत सांपडतात, हें पुढील दिलेल्या रामायणांतील उताऱ्यांवरून दिसून येईल. विशाल रामायणांत विखुरलेल्या विविध प्रसंगांतील व कल्पनांतील मधुर सौंदर्य गोळा करून कालिदासानें मेघदूताच्या मधाचें पोळें बनविलेलें आहे.

रामायणांतून कित्येक कल्पना कालिदासानें उचललेल्या आहेत, ही गोष्ट सम्यक् प्रस्थापित व सर्वविश्रुत आहे. शब्द शैली व कल्पना या बाबतींतल्या दोघांतील साम्य-स्थलांच्या स्थूल समालोचनानेंहि हें रामायणाचें ऋण सहज लक्षांत येण्यासारखें आहे. याचीं असंख्य उदाहरणें देतां येतील. कित्येकांनीं तीं दिलींहि आहेत. तथापि कालिदासाचें रामायणोपजीवित्व एवढ्यावर थांबत नाहीं. आपल्या मेघदूताचा **सबंध सांगाडा** त्यानें रामायणांतून निवडलेल्या प्रसंगांनीं बनविलेला आहे, हें आम्हांला येथें दाखवावयाचें आहे. नुसत्या कल्पना-हरणानें लोलुप कालिदासाची तृप्ति झाली नाहीं. त्या मधुकरानें वाल्मीकीच्या प्रफुल्ल शतपत्रांतील रामकथारसावर झडप घातली. ते सारे प्रसंग उचलून आपल्या प्रयोगाच्या सोयीसाठीं त्यांत हवे ते फेरफार करून त्यानें ते मेघदूतांत वापरले, असें स्पष्ट दिसतें. रामायणांतले ते प्रसंग व कथाभाग खालीं दर्शविण्यांत येत आहेतः—

१. पंपासरोवराच्या कांठीं (ऋष्यमूकाजवळ) राम-लक्ष्मणांचा शोकगर्भ संवाद. नदी, प्रवाह, वृक्ष, प्राणी व पक्षी पाहून रामाला दूरस्थ विरहांतरित प्रियेचें वारंवार स्मरण व शोकसंतापप्रादि. (कि. सर्ग १ ला)

२. किष्किंधेजवळ 'गिरिगुहें'त रहात असतांना सीतेची आठवण होऊन राम-लक्ष्मणांचें शोकाकांतत्व. नंतर रामाचें प्रस्रवण पर्वतावर वास्तव्य. त्यांतील

माल्यवान् शिखराच्या शोभेचें वर्णन, रामाची विरहविव्हलता. लक्ष्मणानें केलेलें सांत्वन. पावसाळ्याचे चार महिने कंठून शरत्कालापर्यन्त धीर धरण्यासंबंधी लक्ष्मण रामाला सुचवितो. चार महिने क्षोभ आवरून काढ, अशी त्याला प्रार्थना. (किष्किंधाकांड सर्ग २७)

३. प्रस्रवणावरील पावसाळ्याचें वर्णन. पावसाळ्यांचीं दृश्यें पाहून शारखी प्रियेची आठवण. पुनर्मीलनाविषयींची चिंता व व्याकुलता. (कि. सर्ग २८).

४. त्याच ठिकाणीं शारदीय रजनी पाहून पुन्हा रामाचा सीता-विलाप. 'कामशोकाभिपीडित' रामाचे करुण उद्गार :

कथं सा रमते बाला पश्यन्ती मां अपश्यती
एवमादि नरश्रेष्ठः विललाप नृपात्मजः ॥

रामाची विषण्ण व विसंज्ञ स्थिति. पावसाळ्याचे ते चार महिने शंभर वर्षांसारखे भासतात.

चत्वारो वार्षिका मासा गता वर्षशतोपमाः

रामाच्या खालील विशेषणांत यक्षवर्णनाचीं बीजें दिसतात—
अनाथो हृतराज्योऽयं रावणेन च धर्षितः
दीनो दूरगृहः कामी...
अहं तु हृतदारश्च राज्याच्च महतश्च्युतः
शोकश्च मम विस्तीर्णो वर्षाश्च भृशदुर्गमः (कि सर्ग ३०)

५. 'पवनपुत्र' 'वायुमार्गानुसारी' असा जो रामदूत हनुमान् त्याचें रामसंदेश सीतेला पोंचविण्याकरितां लंकागमनार्थ आकाशमार्गानें उड्डाण. गगनमार्गाचें व उडणाऱ्या मारुतीचें वर्णन. गगनपथसंचारी मारुतीला चारपांच ठिकाणी मेघाची उपमा. लंकेंत प्रवेश करण्यापूर्वी महामेघतुल्य दिसणाऱ्या 'कामरूप' हनुमंतानें मेघाप्रमाणेंच सौम्य रूप धारण केलें तो प्रसंग. मारुतीला लंका इंद्रपुरीसारखी आणि पुढील सर्गांतून कुबेर-नगरी म्हणजे अलकेसारखी दिसली. मारुतीचीं विशेषणें पहा. विद्रुमणविभूषित, वायुसूनुः, पवनात्मयोनि, चारुनाना विधरूपधारी, कामरूप, महामेघसंकाशः इ. इ. (सुंदरकांड सर्ग १ ला)

६. संपन्न लंकानगरी, त्यांतील उंच चित्रविचित्रित प्रासादांचें वर्णन. राक्षसललनांचा क्रीडारस, संगीत, सुरापान व शृंगारिक लीलांचा सुरस वृत्तांत. रावण-गृह कुबेरभवनासारखें. रावणाची शयनभूमि, अंतःपुर व पानभूमि यांचें वर्णन. रावण-प्रासादांतल्या जिंकून आणून ठेवलेल्या गंधर्वस्त्रियांचें व त्यांच्या सौंदर्याचें वर्णन. (सुं. सर्ग २ ते ११)

७. अशोकवनिकेंतील सीता. तिचीं विशेषणें पहाः—'मलिनसंवीता', दुःखसंतप्ता, परिक्षीणा, तपस्विनी, अश्रुपूर्णमुखी, तन्वी, कृशांगी, दुःखपरायणा, शोक-

ध्यानपरा, पूर्णचंद्रानना, निःश्वसन्ती पुनः पुनः, अनिंदिता, अनलंकृता इ. इ. (सुं. सर्ग १५ व १९ इ.)

८ मारुतीचें दूतत्व. सीतेला रामसंदेशकथन. सीतेचें व त्याचें संभाषण. हनुमान्, रामाची मदनदाहानें झालेली व्याकुल मनःस्थिति व शारीरिक दशा वर्णन करतो. सीतेचा रामाला उलट निरोप. त्यांतील खुणेच्या गोष्टी सांगण्याची कल्पना. (सुं. ३२ च्या पुढील सर्ग)

९. चित्रकूट पर्वतावरील राम-सीतांचें वास्तव्य. चित्रकूटाच्या वनाचें, शिखराचें, निसर्गशोभेचें वर्णन. समीप वहाणाऱ्या मंदाकिनी नदींत सीतेचें स्नान. (अयोध्याकांड ५२ च्या पुढचे व ९४ च्या पुढील सर्ग)

१०. ऋक्षविल : विंध्य पर्वतांतील ऋक्षविल गुहेचें वर्णन (ही चित्रकूट पर्वतावरचीच, हें मागें दाखविलें आहे). या गुहेजवळचे वृक्ष, त्यांतून निघणारे हंस, चक्रवाक् इ. नानाविध पक्षी. शिवाय प्रस्रवण पर्वतावरील पावसाळ्यांत गर्भार्थ बलाकमालांचें मेघांकडे उड्डाण; मानससरोवराकडे प्रस्थान ठेवून निघालेले चक्रवाक पक्षी यांचें वर्णन.

मेघदूतांतील राजहंस व बलाका तुला मानससरोवरापर्यंत सोबत करतील इत्यादि वर्णनाचा भाग वरील रामायण-प्रसंगावरून सुचलेला आहे. (किष्किंधा. ५० ते ५२)

वाल्मीकीच्या ग्रंथराजांतलीं वरील वर्णनें वाचलीं, कीं कालिदासाचा ग्रंथ लागतो. यक्षाची प्रेम-कहाणी म्हणजे वेषांतरित रामकथा होय. वरील प्रसंग हेच कालिदासाच्या काव्याचे मूलाधार याबाबत शंका रहात नाहीं.

## यक्ष म्हणजे वेषांतर केलेला राम

त्याकरितां रामायणाच्या मूळ संहितेकडेच वळलें पाहिजे. मेघदूताच्या काव्य-भूमीवर मुख्य स्थळें दोन आणि पात्रें इन मीन तीन. यक्ष, यक्षपत्नी आणि मेघ. हे तिघेहि जण अनुक्रमें राम-सीता-हनुमान् यांच्यातून कसे निघाले, हें त्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे मार्मिक निरीक्षकांना मुळांत सहज दिसेल. जिज्ञासूंनीं वर नमूद केलेले रामायणाचे ते ते भाग पहावे.

वरील विवेचनावरून मेघदूत व रामायण यांच्यांतील जन्य-जनक-संबंध सहज लक्षांत येईल. परंतु मेघदूत ही बहुतांशीं कालिदासाच्या प्रतिभेची स्वतंत्र निर्मिति आहे, अशी प्रचलित समजूत आहे :

> "रामायण व मेघदूत यांत किंचित् प्रसंगसाम्य व कल्पनासाम्य दिसत असलें तरी इतर ठिकाणीं कालिदासाची प्रतिभा स्वतंत्रपणें मनोहर सृष्टि निर्माण करीत आहे. अलकेच्या मार्गावरचीं नगरें, ग्राम, पर्वत, नद्या

वगैरेंच्या, तसेंच अलकेच्या व यक्षगृहाच्या वर्णनांत आणि यक्षपत्नीच्या विरहावस्थेचें शब्दचित्र रेखाटण्यांत कालिदासाची प्रतिभा सर्वस्वीं अनृणी होती, यांत संशय नाहीं."

(कालिदास, पृष्ठ १२५)

ही समजूत व विधान वस्तुस्थितीला धरून नाहीं. रामायण व मेघदूत यांच्यांतील प्रसंगसाम्य व कल्पनासाम्य 'किंचित्' नसून जबरदस्त आहे. एवढेंच नव्हे तर अलकेच्या व यक्षगृहाच्या वर्णनांत आणि यक्षपत्नीच्या विरहावस्थेचें शब्दचित्र रेखाटण्यांतहि कालिदासाची स्फूर्ति 'सर्वस्वी अनृणी' नसून सर्वस्वीं ऋणी होती, असें स्पष्ट दिसून येतें.

राम-कथानकावरून कालिदासाला फक्त मूळ कल्पना सुचली असें नसून सगळी कच्ची सामुग्री किंवा शिधा त्यानें रामायणांतून घेतला हें लक्षांत घेतलें पाहिजे. उगीच नव्हती लोकांत वदंता पसरली कीं, कालिदास कवीनें आपलें नवकाव्य रामावरून केलें आहे म्हणून. त्या लोक-समजुतीचा पुरावा आपल्याला मल्लिनाथावरून लागतो:—

सीतां प्रति रामस्य हनुमत्संदेशं मनसि निधाय मेघसंदेशं कविः कृतवान् इति आहुः ।

पण परंपरेची सांखळी तुटली. खड्डा पडला. इतिहासाचे मधले मधले दुवे दिसेनासे झाले. त्यामुळें आज मेघदूताच्या रामायणोपजीवित्वाचा 'शोध' लावावा लागत आहे! रामायण हें एखाद्या नैसर्गिक विस्तीर्ण वनासारखें आहे. मेघदूत आटपशीर पण नीटनेटकें उद्यान आहे. पहिल्यांत भव्यता तर दुसऱ्यांत प्रमाणबद्धता आहे. पहिल्यांत विविधता भरपूर, दुसऱ्यांत योजनेवर कटाक्ष. रामायण हा 'आवो जावो घर तुम्हारा' अशा जुन्या थाटाचा जहागिरदारी पद्धतीचा टोलेजंग राजवाडा. मेघदूत सर्व जिथल्या तिथें असलेला टुमदार रेखीव बंगला–चित्राक्षारसा. वाल्मीकीच्या खाणींतून द्रवें तेवढेंच सोनें घेऊन कालिदासानें त्यावर कलाकुसर करून हातांत घालण्याजोगी, वापरतां येण्यासारखी एक चमकदार अंगठी बनविली. तिलाच आपण मेघदूत म्हणतों. एखादा कल्पक मुलगा मेकॅनोच्या पेटींतले निरनिराळे तुकडे निवडून व जोडून पूल अथवा मनोरा तयार करतो, त्याप्रमाणें कालिदासानें रामायणांतील शब्दांचे, कल्पनांचे व प्रसंगांचे विखुरलेले तुकडे वेंचून, वदलून, रंगवून सांधे मोडून व जुळवून मेघदूताचें 'स्वतंत्र' व सुंदर घर उभारलें. या बांधकामांत दुतर्फी काम सुरू होतें: स्मरणशक्ति व प्रत्युत्पन्नमति रामायणाच्या गुदामांतून कच्चा माल वाहून आणीत होती व योजकता सारासारिरीनें त्यांतले उपयोगी नग निवडून बाजूला काढण्याच्या कामांत गुंगली होती. आराखडा (प्लॅन) काढून त्याबरहुकूम जुळणी व मांडणी करण्याचें तंत्र अर्थात् चतुर

शब्द आणि त्याच्या वापरांतलें इंगित स्वच्छ दिसूं लागलें. ज्या चित्रकूटाचा कालिदासानें रामगिरि केला त्यांतील ऋक्षबिलाच्या वर्णनाचा जो किष्किंधा-कांडांतील ५० वा सर्ग त्यांत तो नेमका सांपडला. तो एका श्लोकांत सामील होऊन अंग चोरून सावासारखा कळे न कळेसा बसलेला होता. हिरव्या पानांवरच्या हिरव्या किड्यासारखा. पण माझ्या अधाशी दृष्टीतून आतां तो सुटण्यासारखा राहिलेला नव्हता.

तथा चेऽमे बिलद्वारे **स्निग्धाः** तिष्ठन्ति पादपाः

सीताशोधार्थ तेथें आलेल्या हनुमान्-प्रमृति वानरांना त्या गुहेच्या तोंडाशीं ओले झालेले जलार्द्र वृक्ष दिसले. कशामुळें ते वृक्ष ओले होत होते? अर्थात् गुहें-तील जलप्रवाहामुळें. एवढेंच नव्हे तर त्या गुहेंतून जे हंस, क्रौंच, सारस इत्यादि पक्षी बाहेर पडत होते तेसुद्धां जलार्द्र होऊनच. पाण्यानें भिजलेले पक्षी व झाडें पाहूनच 'कांतारवनकोविद' हनुमानानें या गुहेंत जलाशय असला पाहिजे असें अनुमान केलें व तृषाक्रांत वानरांना सांगितलें.

क्षुत्पिपासापरीतास्तु श्रान्तास्तु सलिलार्थिनः ।
वयं सर्वे परिश्रान्ता न च पश्याम मैथिलीम् ।
अस्माच्चाऽपि बिलात् हंसाः क्रौंचाश्च सह सारसैः ॥ १५ ॥
**जलार्द्राः** चक्रवाकाश्च निष्पतन्ति स्म सर्वशः ।
नूनं सलिलवान् अत्र कूपो वा यदि वा ह्रदः ॥ १६ ॥
तथा चेऽमे बिलद्वारे **स्निग्धा** स्तिष्ठन्ति पादपाः ।
इत्युक्तास्तद्बिलं सर्वे विविशुस्तिमिरावृतम् ॥ १७ ॥

यांतील स्निग्ध (=जलार्द्र) शब्द याच अर्थानें कालिदासानें मेघदूतांत उचलून नेला आहे यावद्दल आतां अधिक स्पष्टीकरण नको. जेथून स्थळ (चित्रकूट अर्थात् रामगिरि) घेतलें तेथूनच त्याचें वर्णन घेतलें! जागेवरोवर तदंगभूत वस्तु यावयाच्याच! कालिदासानें रामगडच्या सफरींत हाथिफोड गुहा व त्यांतील जल-प्रवाह प्रत्यक्ष पाहिला असला पाहिजे, हें पूर्वीच दाखविलें आहे. त्या जलप्रवाहानें गुहाद्वारापासले भिजणारे ओले वृक्ष पाहून त्याला रामायणांतील स्निग्धास्तिष्ठन्ति पादपाः या वस्तुस्थितिदर्शक वर्णनाचा प्रत्यय आला. म्हणून कालिदासानें 'स्निग्ध-च्छायातरुषु' हा औचित्यपूर्ण शब्दप्रयोग बुद्धिपुरःसर केला, यांत शंका कसली!

सारांश, स्निग्ध हा दोन अक्षरी शब्द म्हणजे रामगिरीचें रहस्य उकलणारा एक पंचाक्षरीच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या लहानशा दिव्याचा प्रकाश

टीप:—हंससारसादि पक्षी गुहेंतून बाहेर उडण्याचें रामायणांतील वरील वर्णन वाचून पुढें हंस, बलाक इ० पक्षी मेघाशीं सोबत करतील ही कल्पना सुचली असावी. शिवाय हें दृश्य कवीनें रामगडवर प्रत्यक्ष पाहिलेंच असणें अगदी स्वाभाविक आहे.

मोठा आहे. ज्या रस्त्यानें कवीनें वाल्मीकीचा माल वाहून नेला तो दाखविणारी ही एक चाकोरीची खूणच आहे. हा शब्द ज्याप्रमाणें कालिदासाच्या रामायणोप-जीवित्वाचा द्योतक, तितकाच तो चित्रकूट म्हणजे रामगिरि या सिद्धान्ताचा अचूक पुरावा होय.

## २. 'छायातरु' देखील रामायणांतून आणले

अयोध्याकांडाच्या ९४ व्या सर्गांत चित्रकूट पर्वताचें वर्णन आहे. त्यावरील वृक्षांची यादी देण्यांत दोन सबंध श्लोक खर्ची पडले आहेत. सुमारें पंचवीस वृक्षांचीं नांवें त्यांत आहेत. या लांबलचक नामावळीनंतर छायावद्भिः असें एक विशेषण घातलेलें आहे.

पुष्पवद्भिः फलोपेतैः छायावद्भिः मनोरमैः ।
एवमादिभिराकीर्णः श्रियं पुष्यत्ययं गिरिः ॥ १० ॥

बाकीचा फापटपसारा आपल्या भावकाव्याला अनावश्यक आहे हें हेरून स्निग्ध व छायावद्भिः ही नेमकीं दोन वैशिष्ट्यपूर्ण लक्षणें कालिदासानें वेंचली व 'स्निग्ध-च्छायातरु' या एकाच शब्दप्रयोगानें आपलें वर्णनाचें काम साधलें. यावरून त्याची अल्पाक्षररमणीयता तर दिसून येतेच. शिवाय रामायणाचें ऋणहि स्पष्ट दिसतें. त्यांतल्या शेलक्या फळांवर त्यानें टोंच मारली आहे. वाल्मीकीच्या स्निग्धच्छाया-तरूंच्या सांवलींत कालिदास वाढला आहे.

## ३. आषाढस्य प्रशमदिवसे (श्लोक २)

यक्षानें मेघ आषाढांतल्या कोणत्या दिवशीं पाहिला?
पहिल्या कीं शेवटल्या?

या श्लोकांत प्रथमदिवसे असा प्रयोग सर्वत्र स्वीकारला जातो. परंतु तो बरोबर नाहीं, हें येथें दाखवावयाचें आहे. प्रथम म्हणजे पहिला व प्रशम् म्हणजे शेवटला. यक्षानें जो मेघ पाहिला तो आषाढाच्या आरंभीं कीं शेवटीं? तात्पर्य, थ कीं श असा हा वाद आहे. तथापि तो केवळ शाब्दिक व शुष्क असता तर येथें त्याचा ऊहापोह करण्याचें कारण नव्हतें. ध कीं मा या [१]पेशवाईतील प्रभाप्रमाणेंच तो मनोरंजक व महत्त्वाचा आहे. कारण शब्द बदलला कीं अर्थ बदलतो आणि त्यामुळें त्याच्यामागची परिस्थितीची सबंध बैठकच बदलून जाते! वर्णमालेंत थ आणि श यांच्यांत बाराच अक्षरांचें अंतर असेल, पण अर्थतः त्यांच्यांत दोन हजार वर्षांचें अंतर आहे! कसें तें पुढें सांगितलें आहे. शिवाय या शब्दाच्या किंवा खरें पाहिलें असतां या अक्षराच्या निश्चितीमुळें निराळीं अनुमानें निघूं लागतात. प्रस्तुतच्या

१. राघोबादादांनी सुमेरसिंग गारद्याला जे पत्र दिलें होतें त्यात नारायणराव पेशव्याला धरावें असा मजकूर होता. आनंदीबाईनें त्यातील ध चा मा केला व म्हणून नारायणरावाच्या खुनाचा अनर्थ ओढवला, असा प्रवाद आहे.

श्लोकांत आषाढस्य प्रथमदिवसे असाच कालिदासाचा मूळचा पाठ असला पाहिजे, असें म्हणतां येतें. त्याचीं सहा कारणें थोडक्यांत खालीलप्रमाणेः—

(प्र) पुढच्याच श्लोकांत प्रत्यासन्ने नभसि म्हणजे श्रावण डोक्यावर आला आहे. त्यावरून आषाढाचा प्रशम म्हणजे शेवट सूचित होतो. जवळ येऊन ठेपलेल्या श्रावणमासाशीं आषाढाचा 'प्रथमदिवस' वितकासा जमत नाहीं.

(श) मेघदूतकाव्याचा प्रारंभ व पार्श्वभूमि तपासली तर त्यांत वृष्टि आधींच सुरू झाली असल्याचे स्पष्ट उल्लेख आहेत. ते मागें विस्तारानें नमूद केले आहेत. इंद्रधनुष्य दिसतें आहे. नद्यांचे प्रवाह तांबडे. शिवाय पावसाळ्याच्या प्रारंभीं फुलणाऱ्या[1] कुड्यांचीं फुलें ताजीं फुललेलीं (प्रत्यग्र) होतीं, हें विसरतां कामा नये.

सारांश, पर्जन्यवृष्टीला आरंभ व्हावयाचा नसून झालेला होता.

(म) पूर्वी रामायणकाळांत वर्षाऋतुचा प्रारंभ श्रावणांत होत असे. पावसाळ्याच्या चार महिन्यांतला श्रावण हा पहिला महिना समजला जाई.

पूर्वोऽयं वार्षिको मासः श्रावणः सलिलागमः

(दि) खुद्द कालिदासहि पावसाळ्याचा प्रारंभ श्रावणापासून समजत होता (रघु. १२·२९ व १८·६) श्रावणांत नद्यांना पाणी येतें परंतु भाद्रपदांत तर अधिकच पूर येतो, या कालिदासाच्या आणखी एका उपमेवरून (रघु. १७·४१) तर याबावत शंकाच रहात नाहीं.

(व) प्रथम आणि प्रशम असे दोन पाठभेद आहेत. यांपैकीं एक मूळचा आणि दुसरा मागाहूनचा हें उघड आहे. समजा, कवीचा मूळपाठ प्रथम असा

---

१. रामायणांतील पावसाळ्याच्या वर्णनांतील खालील श्लोक (कि. २८·१४) पहा.

कच्चिदाप्याभिसंरुद्धान् वर्षागमसमुत्सुकान्
कुटजान् पश्य सौमित्रे पुष्पितान् गिरिसानुषु ।

असता, तर मग तो कोणीं बदलून तेथें प्रशम करण्याचें कारण नव्हतें ! कारण प्रथम हा पाठ उत्तरोत्तर मार्गे येणाऱ्या पावसाळ्याला अधिकाधिकच जमूं लागत चालला होता उलट प्रशम हा जो कालिदासाचा मूळचा व खरा पाठ तो मात्र चांगलासा जमत नाहीं व बदलत्या काळाशीं विसंगत दिसल्यामुळें चुकीचा आहे अशा कल्पनेनें मागाहून कोणीतरी प्रशमच्या ऐवजीं प्रथम अशी स्वतःची दुरुस्ती केली असली पाहिजे, यांत शंका नाहीं.

( से ) मेघदूताच्या तिबेटी भाषांतरांत प्रशम दिवसे असेंच आहे.

मेघदूताचा सर्वांत प्राचीन टीकाकार दहाव्या शतकांतील वल्लभदेव यानेंहि प्रशमदिवसे हाच पाठ स्वीकारलेला आहे. पण त्याचेहि आधीं कोणीं कोणीं प्रथमदिवसे हा पाठभेद मानूं लागले होते असें दिसतें. लिपिसारूप्यमोहामुळें कांहींजण श चा थ करीत आहेत असें कारण वल्लभदेवानें दिलें आहे. परंतु बदलत्या ऋतुमानाशीं प्रथम हा पाठ अधिक जमत चालला होता हें मुख्य कारण या अदलाबदलीच्या मुळाशीं असलें पाहिजे.

शिवाय प्राचीन काळीं पौर्णिमान्त महिने मोजण्याची प्रथा होती चातुर्मास म्हणजे पावसाळ्याचे चार महिने. आषाढी पौर्णिमा हा आषाढाचा शेवटचा दिवस समजला जाई आणि श्रावणापासून पावसाळा व चातुर्मास सुरु होई. हल्लीं देखील चातुर्मास्यारंभ आषाढी पौर्णिमेपासून धरतात, हें लक्षात घेण्याजोगें आहे. पूर्वी पावसाळा व चातुर्मास श्रावणांत सुरू होत असे, याची ही अवशिष्ट खूणच शिल्लक राहिली आहे ! तात्पर्य, या दृष्टीनें पहातां आषाढाचा प्रथम दिवस म्हटला तर तो आणखी पंधरा दिवस अलीकडे म्हणजे ज्येष्ठी पौर्णिमेला येऊं लागेल ! म्हणजे प्राचीन काळीं श्रावणांत पडणारा पाऊस ज्येष्ठांत पडूं लागावयाचा ! उलटपक्षीं आजची आषाढी पौर्णिमा म्हणजेच पूर्वीचा आषाढाचा प्रशमदिवस हा मेघ दिसूं लागण्याला व पडूं लागण्याला किती दोरीसूत जमतो, हें सांगावयास नको.

वरील मीमांसेवरून आषाढाचा शेवटला दिवस हा मेघदूतकाव्याचा प्रारंभबिंदु सुप्रतिष्ठित होतो. कुठून आणला कवीनें हा प्रशमदिवस ? आषाढच कां ? आणि त्याची अखेर कशाकरितां ? रामायणांत प्रस्रवण पर्वतावर सीताविरहामुळें रामाचा उन्मत्त विलाप[1] वर्णिला आहे. रामाच्या या उन्मादावस्थेचा काल

१ शक्यमंबरमारुह्य मेघसोपानपंक्तिभिः ।
कुटजार्जुनमालाभिः अलंकर्तुं दिवाकरः ॥ (कि. २८·४)

राम म्हणतो : मेघाच्या पायऱ्यावरून आकाशांत चढून जाणे आणि येथील कुटजार्जुनांच्या पुष्पमाला सूर्याच्या गळ्यात घालणें सहज शक्य आहे ! उन्मादांतसुद्धा केवढी भव्यता आहे ! या श्लोकावरून मेघाला कुटजकुसुमें अर्पण करून त्याचे स्वागत करण्याची कल्पना कालिदासाला सुचली असावी, असा तर्क सहजच सुचतो.

वर्षाऋतूच्या आरंभाचा म्हणजे आषाढाच्या अखेरीचा व श्रावणाच्या सुरवातीचाच आहे. तोच काल किंबहुना तोच दिवस कालिदासानें मेघदूताकरितां उचलला. रामायणांतला नायक घेतला, त्याचा प्रियाविरह घेतला, उन्मादावस्था घेतली, त्याबरोबर त्याचा कालहि पकडला ! उद्यानांतून एखादें रोपटें मुळासकट काढून दुसऱ्या एखाद्या फुलबागेंत लावलें तरी त्यावरची पानेंफुलें तशींच त्याबरोबर जातात. तद्वत् रामायणांतले प्रसंग उचलून नेतांना रामायणांतले ते ते शब्द व कल्पना त्यांना चिकटून जशाच्या तशा मेघदूतांत गेल्या आहेत ! हे शब्द नसून अंधारांत लुकलुकणारे दिवे आहेत आणि त्या कल्पना नसून रहस्य उकलणाऱ्या किल्ल्या आहेत यांत शंका नाहीं.· वाल्मीकींचें ऋण ध्वनीत करण्याकरितां शिल्लक राहिलेल्या त्या कालिदासाच्या हातच्या जणुं पावत्याच आहेत !

निचुल व स्रोतोरंध्र (मे० श्लोक १४ व ४२): हे दोन शब्द देखील वपासण्याजोगे आहेत. त्यांचे हल्लीं घेतात ते अर्थ समर्पक व समाधानकारक नाहींत. निचुल याचा वेत असा एक अर्थ आहे. तथापि रामगिरीहून उड्डाण कर असें मेघाला सांगतांना त्या पर्वतावर वेताचीं झाडें आहेत हें सांगण्यांत (स्थानात् अस्मात् सरसनिचुलात् उत्पत) फारसें स्वारस्य आहे असें वाटत नाहीं. वेताचीं झाडें हिरवीगार असतांना आल्हाददायक दिसतात यांत शंका नाहीं. त्यचा हिरव्या मखमलीसारखी. आणि त्याचीं अरुंद लांबट पानें वाऱ्यानें हलूं लागलीं कीं चवऱ्या ढाळल्यासारखा भास होतो हेंहि खरें. तथापि या ठिकाणीं विशिष्ट वृक्षांचें माहात्म्य सांगावयाचें नसून स्थानाचें माहात्म्य वर्णावयाचें आहे. सरसनिचुल हें पद येथें गौण, विशेषणात्मक आहे. 'स्थान' हें नाम, त्याला प्राधान्य आहे. हें स्थान कोणतें ? या श्लोकांत स्थान शब्दाचा अर्थ काय ? संदर्भावरून पहातां स्थान म्हणजे रामगिरीचा डोंगर इतका अतिव्याप्त अर्थ समर्पक होत नाहीं. स्थान म्हणजे तें विशिष्ट स्थळ, भूभाग (spot किंवा beauty-spot) हा अर्थ कवीच्या मनांत आहे. रामगिरीवर अनेकविध जागा तर असतांना त्यांतील एकाचाहि नामनिर्देश कवीनें केलेला नाहीं. (अर्थात् तें योग्यच आहे कारण त्याची जरूर नव्हती) मग हा एकच उल्लेख कशाकरितां ? सरस म्हणजे जलप्रवाहयुक्त आणि निचुल म्हणजे रामगिरीवरची अद्‌भुत रूपवील गुहा कवीला अभिप्रेत असली पाहिजे, असा आमचा तर्क आहे. कालिदासकाळीं हा गुहेचा भूभाग त्यांतील निर्झरानें आर्द्र होणाऱ्या हिरव्यागार नयनरम्य वेतांनीं वेढलेला असावा हें त्या काळीं त्या स्थळाचें कोणाच्याहि डोळ्यांत भरण्यासारखें दृश्य असलें पाहिजे. असें असेल तर रामगिरीवर गुहा हें जें रामगिरीचें वैशिष्ट्य त्याचा उल्लेख सरस-निचुल या पदांत कवीनें केलेला असणें किती स्वाभाविक आहे ! तथापि निचुलाबाबतचा तर्क दर्शं अशाच अनिर्णित स्थितींत सोडून देणें भाग आहे.

स्रोतोरंध्र याचाहि अर्थ तोच असला पाहिजे. निसर्गानुसार पर्वतांच्या पोटांत पाण्यानें पोखरलेलें रंध्र, हा या शब्दाचा सरळ अर्थ. (रामगडवरची आरपार हाथिपोड गुहा पाण्याच्या प्रवाहामुळें नैसर्गिक रीत्या बनलेली आहे हें तज्ज्ञांचें मत पूर्वी नमूद केलें आहे.) परंतु हल्लीं स्रोतोरंध्र याचा अर्थ हत्तीची सोंड असा करतात. वस्तुतः असा अर्थ कोणत्याहि कोशांत सांपडत नाहीं. अनुमानानें म्हणजे गोळाबिरजेनें व मल्लिनाथ देतो म्हणून तसा बसविला आहे. असो. रामगिरीवर म्हणजे चित्रकूटावर हत्ती विपुल. त्याचप्रमाणें सदर गुहेंत वहाणाऱ्या झऱ्याचा मोठा निनाद आजहि चालतो. या आवाजाचें खुद्द कालिदासानेंहि वर्णन केलें आहे (रघु १३·४७) म्हणून

स्रोतोरंध्रध्वनितसुभगं दंतिभिः पीयमानः

या ओळीचा अर्थ, त्या स्रोतोरंध्राच्या नादांत व आनंदांत हत्तींकडून ग्रहण केला जाणारा वारा असा होतो. याप्रमाणें या दोन शब्दांचे अर्थ समर्पक म्हणून ग्राह्य मानले तर प्रस्तुत सिद्धांतांना आणखी पुष्टि मिळते.

## कथानक–सादृश्य

वरील शब्दांच्या अचूक खुणा पाहिल्यानंतर आतां कथानकाकडे वळूं. मेघदूताचें कथानक तें केवढेंसें. पण त्याचाहि सर्व तपशील रामायणावरून सुचलेला व घेतलेला आहे. तो आतां पाहूं.

मेघदूत काव्यांतल्या नायक जो यक्ष त्याला विरहाची शिक्षा एकाच वर्षाची कां? आतां बाकी चार महिने उरले असें तो म्हणतो हे चार महिने कवीनें कोठून आणले? चारच महिने कां? जास्त किंवा कमी कां नाहींत? हे शेवटले चार महिने नेमके पावसाळ्याचेच कां घेतले? इतर ऋतूंतले कां नाहींत? बरें, ही शापकालाची मर्यादा कार्तिकांतच कां संपाची? आणि यक्षाच्या शापान्ताचा सुमार सुचित करताना विष्णु भुजगशयनावरून उठण्याची खूण सांगण्याचें कारण व औचित्य काय? हीच कल्पना सुचण्यांतलें प्रयोजन काय? विरहकाळ संपल्यानंतरच्या शरदृतूकडे (परिणतशरच्चंद्रिकासु इ.) यक्ष डोळे लावून बसला आहे तो कां? विरहामुळें खंडित व अतृप्त राहिलेले शृंगारिक अभिलाष मीलनानंतर द्विगुणिततेनें पूर्ण करावयाचे तर त्याला शरद ऋतूंतल्या चांदण्या रात्रीच कशाला हव्या होत्या? शापान्तानंतर मीलनसुख कायमचेंच अनुभवावयाचें होतें. शारदीय ज्योत्स्ना व रात्री यांच्यांत रम्यता असते हें रसिकांना माहीत आहे. तथापि वर्षाच्या विरहानंतर होणाऱ्या उत्सुक मीलनांत आकर्षण व गोडी उत्पन्न होण्याकरितां शरदांतील स्वच्छ चांदण्याची मोठीशी जरूर आहे असें नाहीं.

अभ्यास्वो हि नारीणां अकालज्ञो मनोभवः।

असा कालिदासाचाच न्याय आहे. उद्दाम काम काळवेळ जाणतो थोडाच! मग यक्षाला–अर्थात् कालिदासाला येथें शरत्काल आठविण्याचें व योजण्याचें काय कारण!

या सर्व प्रश्नांचें उत्तर रामकथेच्या तपशिलांत दडलेलें सांपडतें. पहा :

विरही राम प्रस्रवण पर्वतावर जाऊन एका गिरिगुहेंत राहिला. तें गिरिशृंग उंच व रम्य दिसत होतें. कृष्णमेघ आकाशांत उत्पन्न व्हावा त्याप्रमाणें.

गिरिशृंगमिदं रम्यं उच्चनं पार्थिवात्मज
इयं गिरिगुहा रम्या विशाला युक्तमारुता॥

या स्थळीं चार महिने (वर्षारात्रम्) काढावयाचे रामानें ठरविलें. तो वर्षा-ऋतूचा प्रारंभकाळ होता. आकाश पर्जन्यधारी कृष्णमेघांनीं व्यात होऊं लागलें—

अयं स कालः संप्राप्तः समयोऽद्य जलागमः
संतस्व त्वं नभो मेघैः संवृत्तं गिरिसंनिभैः
आपाण्डुजलदं भाति कामातुरमिवाम्बरम्

पावसाच्या पहिल्या सरी सुरू झाल्या. मग मेघांचा गडगडाट व विजांचा चकचकाट. कुटज फुलले. भिजणारी पृथ्वी जलस्पर्शानें बाष्पबिंदु सोडूं लागली—

१

रामायण : अन्तस्तनितनिर्घोषं सवेदनमिवांबरम्
नीलमेघाऽश्रिता विद्युत् स्फुरन्ती प्रतिभाति मे
मेघदूत : स्निग्धगंभीरघोषम्

२

रामायण : क्वचित् बाष्पाभिसंरुद्धान् वर्षागमसमुत्सुकान्
कुटजान् पश्य सौमित्रे पुष्पितान् गिरिसानुषु
मेघदूत : स प्रत्यग्रैः कुटजकुसुमैः

३

रामायण : एषा धर्मपरिक्लिष्टा नववारिपरिप्लुता
सीतेव शोकसंतप्ता मही बाष्पं विमुंचति
मेघदूत : मुंचतो बाष्पमुष्णम्
आतां हीं पावसाळ्याच्या प्रारंभींचीं लक्षणें किंवा घटना—

४

रामायण : प्रवासिनो यान्ति नराः स्वदेशान्
मेघदूत : यो वृंदानि त्वरयति पथि श्राम्यतां प्रोषितानाम् इ०

५

रामायण : संप्रस्थिता मानसवासलुब्धाः
प्रियान्विताः संप्रति चक्रवाकाः

मेघदूत : मानसोत्काः संपत्स्यन्ते नभसि भवतो राजहंसाः सहाया.

मूळच्या ओळींत चक्रवाकांच्याऐवजीं राजहंस घातले एवढाच फरक.

६

रामायण : विद्युत्पताकाः सबलाकमालाः
गर्जन्ति मेघाः समुदीर्णनादाः
मत्ता गजेंद्रा इव संयुगस्थाः

मेघदूत : सेविष्यन्ते नयनसुभगं खे भवन्तं बलाकाः

७

रामायण : मेघाभिकामा परिसंतपन्ती । संमोदिता भाति बलाकपंक्तिः
(या श्लोकावरील टीका : गर्भार्थं मेघेषु अभिकामो यस्याः सा बलाकपंक्तिः।)

मेघदूत : गर्भाधानक्षणपरिचयात् नूनमाबद्धमालाः

८

पुढें पावसाळ्याचें वर्णन. त्यांतील हा मेघांचा प्रवास पहा—

रामायण : समुद्वहन्तः सलिलातिभारं
बलाकिनो वारिधरा नदन्तः
महत्सु शृंगेषु महाधराणां
विश्रम्य विश्रम्य पुनः प्रयान्ति

मेघदूत : खिन्नः खिन्नः शिखरिषुपदं न्यस्य गन्ताऽसियत्र
(शिवाय) ककुभसुरभौ पर्वते पर्वते; ते

९

रामायण : आविष्कृतं मेघमृदंगनादैः । वनेषु संगीतमिव प्रवृत्तम्

मेघदूत : संगीताय प्रहतमुरजाः

आतां अधिक कल्पना-सादृश्यें दाखवीत न बसतां मेघदूतांतील शापाची मुदत चारच महिने कां व ती नेमकी कार्तिकांत म्हणजे शरदृतूंतच कां संपावी याचें मूल-कारण पाहूं.

वर्षाऋतूचे चार महिने कामोद्दीपक. (किष्किंधाकांड) त्यामुळें राम विशेषच अस्वस्थ. लक्ष्मण रामचंद्राला वारंवार समजावितो कीं कसे तरी हे पावसाळ्याचे चार महिने काढ—सहन कर. आणि शरत्कालाची वाट पहा. त्यानंतर सर्व इच्छे-प्रमाणें घडून येईल.

### किष्किंधाकांड सर्ग २७ वा

पूर्वोऽयं वार्षिको मासः श्रावणः सलिलागमः ।
प्रवृत्ताः सौम्य चत्वारो मासा वार्षिकसंज्ञिताः ॥

कार्तिके समनुप्राप्ते त्वं रावणवधे यत ।

इत्युक्त्वा न्यवसत्तत्र राघवः सहलक्ष्मणः ।
बहुदृश्यदरीकुंजे तस्मिन्प्रस्रवणे गिरौ ॥

शरत्कालं प्रतीक्षस्व प्रावृट्कालोऽयमागतः ।
ततः सराष्ट्रं सगणं रावणं तं वधिष्यसि ॥

शरत्कालं प्रतीक्षिष्ये स्थितोऽस्मि वचने तव ।

शरत्प्रतीक्षः क्षमतामिमं भवान् जलप्रपातं रिपुनिग्रहे धृतः

नियम्य कोपं परिपाल्यतां शरत्क्षमस्व मासांश्चतुरो मया सह ।

### किष्किंधाकांड सर्ग २८ वा

अयं स कालः संप्राप्तः समयोऽद्य जलागमः ।
संपश्य त्वं नभो मेघैः संवृत्तं गिरिसंनिभैः ॥

तस्मात्कालप्रतीक्षोऽहं स्थितोस्मि शुभलक्षण ।
शरत्प्रतीक्षः क्षमतामिदम् भवान् जलप्रपातं रिपुनिग्रहे धृतः ॥

पावसाळ्याचे चार महिने कसेतरी कंठून शरत्कालाची म्हणजे कार्तिक महिन्याची प्रतीक्षा करण्याचा उल्लेख ( कि. २६-२७-२८ ) या तीन सर्गांत अकरा ठिकाणीं पुन्हा पुन्हा आलेला आहे.[1] पावसाळ्यानंतर शरदृतूंत सीतेचा शोध लागून पुनर्मीलन होईल या अपेक्षेत असणाऱ्या रामायणांतल्या रामाचेंच चित्र कालिदासानें आपल्या यक्षाकरितां निवडून घेतलें आहे. त्यामुळें कालिदासाचा शापान्ताबाबतचा श्लोक या काळाशीं कसा सुसंगत जमतो पहा.

[2]शापांतो मे भुजगशयनात् उत्थिते शार्ङ्गपाणौ

---

१. शिवाय, चत्वारो वार्षिका मासाः गता वर्षशतोपमाः। मम शोकाभितप्तस्य तथा सीता अपश्यतः ॥ असे चार महिन्यांचे उल्लेख कित्येक आहेत.

२ या श्लोकांत उल्लेखिलेल्या कार्तिकी म्हणजे प्रबोधिनी एकादशीचा उपयोग प्रथमदिवसे की प्रशमदिवसे या वादाच्या निर्णयाकरितां करीत असतात. कार्तिकी एकादशीच्या आधीं चार महिने पाहिजेत म्हणून आषाढाचा प्रथम दिवस असा कुकिवाद कोणी करतात. पण तरीहि त्यांचे १० दिवस चुकतातच । शिवाय भुजगशयनाद् उत्थिते या शब्दसमूहाचा अर्थ एकादशी-लाच असा नसून त्यानंतर केव्हांतरी कधीहि होऊं शकतो. सारांश, कालिदासानें हे 'चार महिने' मोजून घातलेले नसून सरासरीनें, पर्जन्यकाळ या अर्थानें घातलेले आहेत, हें आमच्या वरील प्रतिपादनावरून कळून येईल. त्यामुळें प्रथम या पदाचा बोध येत नाहीं. उलट पुष्टि मिळते.

रामायणांतील प्रिया-मीलनाबाबतच्या गद्य व अविकसित कल्पना कालिदासानें अधिक सुंदर व काव्यपूर्ण केल्या इतकेंच. कार्तिकांत हें नष्टचर्य-विरहशाप संपेल असें म्हणण्याऐवजीं भगवान् विष्णु शेषनिद्रेंतून जागे होतील तेव्हां असा काव्यसुंदर प्रयोग कवीनें वापरला आहे. पण विष्णूची शेषनिद्रा तरी कवीला अवचित कां सुचावी ? त्याचेंहि कारण रामायणच असलें पाहिजे. पावसाळ्याच्या वर्णनाचा किष्किंधाकांडांतील ( २८.२५ ) हा श्लोक पहा.

निद्रा शनैः केशवमभ्युपैति । द्रुतं नदी सागरमभ्युपैति
हृष्टा बलाका घनमभ्युपैति । कान्ता सकामा प्रियमभ्युपैति ॥

विष्णूला निद्रा येणें ही पावसाळ्याच्या आरंभाची खूण रामायणानें वर्णिली होती. त्याचें दुसरें टोंक-विष्णु निद्रेंतून जागा होणें ही पावसाळ्याच्या समाप्तीची खूण कालिदासानें उचलली !

## रामकथेच्या मायपोटांतून मेघदूताचा जन्म

कथानकाखेरीज शब्दसाम्यें व कल्पना-सादृश्यें तर कितीक आहेत. सबंध विस्तार या प्रकरणाच्या ओंजळींत मावण्यासारखा नाहीं. फक्त कांहीं निवडक उदाहरणें येथें नमुना म्हणून दिलीं आहेत. तथापि या शितावरून भात शिजलेला आहे एवढेंच नव्हे तर त्याचा शुभ्र व सुवासिक तांदूळ वाल्मीकीच्या कोठारांतून आणलेला आहे हें सहज समजून येईल. रामायणाच्या मायपोटांतून मेघदूताचें बालक जन्मलेलें आहे एवढेंच नव्हे तर तें *त्याच माउलीच्या* दुधावर पोसलेलें व *अंगा-खांद्यावर* वाढलेलें आहे. तोंडावळा झाकत नाहीं. प्राचीन टीकाकारांना हें रहस्य माहीत होतें. मल्लिनाथाचा अभिप्राय वर दिलाच आहे. पूर्णसरस्वती या मार्मिक दाक्षिणात्य पंडिताच्या विद्युल्लता नामक टीकेंतलें अवतरण प्रकरणारंभीं दिलें आहे. त्यांत यक्षवृत्तांत हें सीताराघववृत्तांताचें प्रतिबिंब होय हें मत किंवा ही माहिती स्पष्टपणें नमूद आहे. इति केचित् या पदावरून त्याच्याहि पूर्वींचे टीकाकार असेंच समजत होते असा दाखला मिळतो. जुना टीकाकार दक्षिणावर्त ( सुमारें १२ वें शतक ) यानें आपल्या टीकेंत असाच अभिप्राय जागोजाग प्रकट केला आहे. सारांश, मेघदूतांतील कथानक व सामुग्री सर्वस्वीं रामायणांतील आहे. त्यामुळें कालिदासाचा कमीपणा होतो असें नाहीं. त्या सामुग्रीवर त्यानें जे काव्यसंस्कार केले त्यांत त्याचें स्वतंत्र कर्तृत्व दिसून येतें, याबद्दल वाद असण्याचें कारण नाहीं. त्याचें रामायणोपजीवित्व जें या ठिकाणीं कटाक्षानें प्रस्थापित करण्यांत येत आहे तें येवढेंच दर्शविण्याकरितां कीं मेघदूतकाव्यांतील कथानकाची चौकट जर रामकथेंतील आहे, तर स्थळहि त्याच चौकटींतलें नसेल काय ?

मेघदूतावर रामायणाचें ऋण केवढें मोठें आहे याची कल्पना येण्याकरितां खालील कोष्टक बनवून दिलें आहे.

**मुख्य समीकरणें**

राम = यक्ष
सीता = यक्षपत्नी
मारुति = मेघ
रामाचा संदेश = यक्षाचा निरोप
चित्रकूट = रामगिरि
दक्षिण = उत्तर
रावणनगरी लंका = कुबेरनगरी अलका
हनुमानाचें उड्डाण = मेघाचा प्रवास

आतां कथानकाचा तपशील पहा :

| | |
|---|---|
| रामचंद्रावर कैकेयीचा कोप | →यक्षाला कुबेराचा शाप |
| रामाच्या नशिबीं वनवास | →यक्षाच्या नशिबीं वनवास |
| रामाचें एकांतस्थळीं गमन | →यक्षाचा एकांतवास |
| सीता-विरह | →प्रिया-विरह |
| सीता-वियोगाचें एक वर्ष | →यक्षपत्नीवियोगाचें एकच वर्ष |
| त्यांतले शेवटले चार महिने पावसाळ्याचे | →शेवटले चार महिने पावसाचे. |
| पावसाळा संपल्यानंतर शरत्कालांत रावणवध करून सीता-प्राप्तीची अपेक्षा | →पावसाळी चार महिने कसेबसे कंठून शरदृतूंत प्रियामीलनाची अपेक्षा |
| रामाचा विलाप, अधीरता व उन्मादावस्था | →यक्षाचा विलाप, अधीरता व उन्मादावस्था |
| रामाची विकलता, विरहकृशता व अनुकंपनीय स्थिति | →यक्षाची तीच स्थिति |
| राम मारुतीला मुद्रिकेची खूण देतो | →यक्ष मेघाला गुप्त गोष्टीची खूण सांगतो. |

**रामदूत →मेघदूत**

काव्य-कर्जाचा हा खातें-उतारा पाहून शंका उरत नाहीं. हें काव्य-ऋण लवकर उमगत नाहीं याचें कारण तें कालिदासानें स्वतंत्रपणानें, आत्मसात् करून व चातुर्यानें वापरलें आहे म्हणून. अर्थक्षेत्राप्रमाणें काव्यक्षेत्रांत देखील भांडवल नुसतें पडून राहून त्याचा काय उपयोग! भांडवल खेळतें पाहिजे. तें उत्पादनाकरितां आणि सर्वांच्या हिताकरितां वापरलें गेलें पाहिजे. कालिदासानें जेव्हां रामचरित्राचें

मांडवल मेघदूताकरितां अद्भुत रीतीनें वापरलें, त्यावेळीं त्या आद्यकवीच्या आत्म्याला आनंदच झाला असेल. उदात्त व उदारधी लोकांच्यामधील असली देवघेव प्रेमाची असते—'निर्व्याज' असते. कर्ज देण्यांत धनकोचा मान आणि कर्ज घेण्यांत ऋणकोला भूषण असा हा व्यवहार आहे. असली कर्जे देणारे धन्य व घेणारे धन्य. कालिदासाच्या एका मार्मिक उपमेची येथें आठवण होते :

सहस्रगुणमुत्स्रष्टुं आदत्ते हि रसं रविः

कालिदासानें रामायणांतला ऐवज उचलला तो वाढवून-खुलवून रसिकांना परतफेड करण्याकरितां.

कालिदासानें यक्षाला अनामिक कां ठेवला याचें कारण आतां कळतें. रामाचाच यक्ष केलेला. त्याला दुसरें नांव देण्यांत राम काय राहिला ? यक्षाचें नांव गुलदस्तांत ठेवणेंच भाग होतें. तेंच कालिदासानें केलें. त्यानें सुरवातच अशी केली—

कश्चित् कांताविरहगुरुणा स्वाधिकारात् प्रमत्तः

हा मेघदूताचा नायक शेवटपर्यंत 'कश्चित्'च राहिला! मात्र त्यामुळें काव्याची गूढरम्यता वाढली खास. त्याचप्रमाणें या काव्याचें खरें नांव कोणतें ? मेघदूत कीं मेघसंदेश ? दुसरें नांवहि प्रचलित आहे–विशेषतः दक्षिणेंत. पहिलें नांव अधिक समर्पक, *अधिक अर्थपूर्ण यांत शंका नाहीं. या काव्याच्या मुळाशीं दौत्याची* प्राणभूत कल्पना असल्यामुळें त्याचें मुळांतलें खरें नांव 'मेघदूतम्' हेंच असलें पाहिजे, असें आतां निश्चयानें म्हणतां येतें. या काव्याच्या मागोमाग व चालीवर जीं कित्येक दूतकाव्यें रचलीं गेलीं त्यांच्या नामकरणावरूनहि हाच निष्कर्ष दृढ होतो.

## मेघदूत हें आध्यात्मिक रूपक नाहीं

एक उत्तरीय पंडित वासुदेवशरण अग्रवाल ( काशी विश्वविद्यालय ) यांनीं मेघदूतकाव्यांत गूढ आध्यात्मिक अर्थ भरलेला आहे असा अभिनव सिद्धान्त मांडला आहे. [ मेघदूत : एक अध्ययन–राजकमल प्रकाशन ]

मेघदूत काव्य क्या है ? भारत की देवमातृक भूमि पर शृंगार और आत्मा के चैतन्य की परिपूर्ण भाषा है।...उनके (कालिदासके) हाथोंमें मेघदूत जहां एक ओर शृंगार और यौवन का परिपूर्ण काव्य है वहीं वह शिवात्मक चैतन्य की प्रतिका भी संकेत देता है।... मेघदूत काव्यमें कविने *स्थूल भोगप्रधान जीवन और सूक्ष्म अध्यात्मसाधन इन दोनों अभिप्रायों का* साथ-साथ उल्लेख किया है। इत्यादि.

सारांश, मेघदूत हें जीवात्मा व शिवात्मा यांच्या भेटीचें एक रूपक आहे, असें त्यांचें म्हणणें आहे. सदरील ग्रंथांत पांडित्याचा प्रकर्ष आहे यांत शंका नाहीं. तथापि हा पंडित लेखक कालिदासावर एक प्रकारें अन्याय करीत आहे, असें

घातल्यावांचून रहात नाहीं. कालिदास स्वतः शिवभक्त किंवा तत्त्वज्ञानी होता कीं नाहीं हा मुद्दा स्वतंत्र आहे. तथापि त्यानें आपल्या ललितकाव्याची उभारणी अध्यात्माची बैठक मनांत ठेवून केली असेल असें म्हणण्याला मन धजत नाहीं. कुमार-संभवांत प्रत्यक्ष शंकरपार्वतींच्या परिणयकथेंत जो कवि आत्यंतिक शृंगाराचीं वर्णनें करण्यांत रंगतो तो कवि बोलूनचालून विलासप्रिय यक्षदांपत्याच्या विप्रलंभ-शृंगारांत अध्यात्माचे डोस पाजीत बसेल, अशी कल्पना करवत नाहीं. किंबहुना कामातुर यक्ष-जोडप्याच्या विरहमीलनाची ब्रह्मानैक्याच्या कल्पनेशीं सांगड घालण्याइतका कालिदास क्लिष्ट किंवा अरसिक कवि नव्हता, असें म्हणतां येईल.

प्रस्तुत प्रकरणांत मेघदूताची कथा, प्रसंग व मांडणी रामायणावरून केलेली आहे हें सप्रमाण दाखविलें आहे. त्यामुळें तर या 'आध्यात्मिक' सिद्धान्ताला अधिकच धक्का बसतो, हें स्पष्ट होईल. एखाद्याच्या विरहव्याकुल मनोवस्थेचें रम्य, हृदयस्पर्शी व रसभरित भावचित्र रेखाटून त्या त्या भावना जागृत करणें एवढाच कालिदासाचा उद्देश होता. मेघदूतांत अध्यात्म पहाणें समर्थनीय ठरणार नाहीं. तसें कोणाला मानावयाचें असल्यास त्यानें मानावें. पण कालिदासाचा तो हेतु नव्हता, हें मेघदूताच्या वर सिद्ध केलेल्या रामायणोपजीवित्वावरून स्पष्ट होण्यासारखें आहे.

### मेघदूत 'आत्मानुभवी' काव्य नव्हे

त्याचप्रमाणें मेघदूतकाव्य हें कवीनें स्वचरित्रांतील तत्सदृश घटनेवर आधारून म्हणजे आत्मानुभवावरून लिहिलेलें आहे, असे तर्क कित्येकांनीं केले आहेत. परंतु प्रस्तुत प्रकरणांत अमर मेघदूत रामकथामृतावर पोसलेलें आहे, हें उलगडून दाखविलें आहे. रामायणावरूनच तें सुचलें व रचलें, हें पाहिल्यानंतर आत्मानुभवासंबंधीचे तर्क निर्बल वाटूं लागतात. वर्णिलेल्या सर्व घटनांचा अनुभव कवीला यथातथ्यतेनें आलेला असतो असें नाहीं! थोडीशी चुणूकनुदां पुरेशी होते. कल्पनाशक्ति परचित्तप्रवेशाची पात्रता हें कवीचें मुख्य भांडवल होय.

## मेघदूताची 'काल्पनिकता' रचनेंत आहे, कथानकांत नाहीं

अशा रीतीनें कविपरंपरा व काव्यतत्त्वाचा विकास या दृष्टिकोनांतून मेघदूताचा इतिहास व भूगोल यांची छाननी आवश्यक आहे. कार्यकारणभाव हें जें कोणत्याहि शास्त्राच्या प्रगतीचें मर्म तें त्यामुळें उलगडतें. साहित्य अकादमीतर्फे मेघदूताची अधिकृत सरकारी आवृत्ति नुकतीच प्रसिद्ध झाली आहे (डॉ. सुशील कुमार डे यांनीं संपादित केलेली). त्यांत स्थल-निश्चयाच्या भौगोलिक प्रभावर खालील येरा आढळतो :

> Some scholors have concerned themselves with the identification of the Yaksas Asrama and the route prescribed for

the cloud; but the question is one of historical or Geographical rather than *Literary interest*, and *has only an Indirect* bearing on the appreciation of the poem itself. The predominantly imaginary character of the poem should not also be forgotten.

—Introduction p. XXX

संपादकांनीं मेघदूतांतील स्थळांचा व मेघमार्गाचा निश्चय करूं पहाणाऱ्या *संशोधकांना दिलेला हा टोला वापूर्वी कितपत योग्य असेल तो असो; तथापि प्रस्तुत* संशोधनांत मेघदूताची जी पूर्वपीठिका दाखविली आहे त्यावरून अशा तऱ्हेची टीका खासच योग्य ठरणार नाहीं. भौगोलिक, ऐतिहासिक व वाङ्मयीन असे मेघदूताचे तीन अलग तुकडे पाडणें जितकें अशक्य तितकेंच अनुचित. स्थलनिश्चयाचा प्रश्न जितका भौगोलिक-ऐतिहासिक तितकाच तो काव्यविषयक बाजूशीं संबद्ध आहे. या काव्याचा आस्वाद घेण्याकरितां त्याची भौगोलिक व ऐतिहासिक भूमिका कळली पाहिजे. त्यांतील स्थळांचा काव्यविकासाशीं व रसास्वादाशीं निकटचा व जिव्हाळ्याचा संबंध आहे, हें आतांपर्यंतच्या विवेचनावरून स्पष्ट दिसण्यासारखें आहे. तसेंच संपादक वरील उताऱ्यांत म्हणतात त्याप्रमाणें मेघदूत मुख्यतः काल्पनिक आहे हें म्हणणें बरोबर नाहीं हें आतां वेगळें सांगावयास नकोच. दक्षिणावर्तानें तर स्पष्ट अभिप्राय दिला आहे.

**इह खलु कविः सीतां प्रति हनूमता हारितं संदेशं**
**हृदयेन समुद्वहन् तत्स्थानीय नायकनायिकायुत्पादनेन संदेशं करोति।**

सारांश, आधुनिक टीकाकारांची प्रचलित समजूत आहे त्या अर्थानें हें काव्य '*काल्पनिक*' नाहीं. तें *रामायणावर आधारित, अधिष्ठित, विकसित व पुष्ट* झालेलें आहे. एवढेंच काय पण प्राय- मेघदूतांत अशी कल्पना अगर भूमिका क्वचितच आढळेल कीं, जिचें साहश्य अगर मूळ रामायणांत सांपडणार नाहीं! मात्र हे वाल्मीकीचे विखुरलेले सौंदर्यकण वेचून, पचवून, जुळवून स्वतःच्या दिव्य प्रतिभेच्या मुशींत ओतून जें एकजिनसी प्रमाणबद्ध व हृदयंगम असें 'स्वतंत्र' भावकाव्य निर्मिलें त्याचें सर्व श्रेय कालिदासाचें आहे, त्याला त्यानें जें रूप दिलें आहे त्यांत त्याची खरी 'काल्पनिकता' आहे! मेघदूताचा मूलाधार रामायण याचा आम्हाला 'शोध' लावावा लागतो, हाच कालिदासाच्या स्वतंत्र प्रतिभेचा पुरावा होय. हीच कालिदासाची किमया. याचें नांव योजकता व रचनाचातुर्य. प्रतिभेच्या झिल्हईनें जुन्याचें नवें होतें तें असें. म्हणून आम्हीं प्रारंभींच्या नांदींत म्हटलें आहे कीं, वाल्मीकीच्या घरट्यांत रामकथेच्या चाऱ्यावर आपल्या मेघदूतरूपी अर्भकाचें संवर्धन करीत असूनहि आमचा कवि-कोकिल 'परभृत' भासत नाहीं! तो श्लोक असा—

कूजन् सुमधुरं 'मेघं' पीतरामकथाजलम् ।
कोकिलः स स्वयंप्रज्ञः परभृत् नैव भासते ॥ —नांदी श्लोक ९ वा

यक्ष हा विरही रामाचा काव्यभूमींतला अवतार किंवा ऐतिहासिक रामाचें काव्यरसांत पडलेलें प्रतिबिंब. इतिहासाची पुनरावृत्ति होत असते असें म्हणतात, पण थोडयोड्या फरकानें.

History repeats itself but with variations.

कालिदास आपलें मेघदूत रचीत होता त्यावेळीं जणूं काव्येतिहासाची पुनरावृत्तीच घडून येत होती. कालानुरूप वेष व रूपें बदललेलीं होतीं इतकेंच. वाल्मीकीचा झाला होता कालिदास, रामाचा झाला यक्ष, सीतेची झाली यक्षपत्नी आणि चित्रकूटाचा झाला रामगिरि ! मेघसंनिभ मारुतीचा बनला मेघ. फरक एवढाच झाला कीं, तो रामदूत दक्षिणेला गेला आणि हा मेघदूत उत्तरेकडे चालला आहे! पण त्यांतहि मौज ही कीं, या दोघांची निघण्याची जागा जवळजवळ[1] एकच !

मेघदूतांत राम घेतला मग त्याला रहाण्याकरितां त्याचें स्थळहि घेतलें यांत शंका कसली ? वाचकहो, हाच रामगड म्हणजेच पूर्वीचा ऐतिहासिक चित्रकूट. याच्या माथ्यावर अद्‌भुत हाथिफोड गुहा आहे तेंच रामायणांतलें ऋक्ष-बिल. येथें किंवा आसपास राम, लक्ष्मण, सीता राहिलीं. येथेंच हनुमान्प्रभृति वानर सीताशोधार्थ आले होते. या स्थळींच ते 'स्निग्ध छायातरु' होते. येथेंच राम राहिलेले अनेक आश्रम होते. या ठिकाणींच रामाचीं पावलें उमटलीं. इथल्याच पुण्योदकांत जनकतनयेनें स्नान केलें. याच उंच पर्वतावर शाप-निर्वासित यक्ष येऊन राहिला. याच्याच उत्तुंग शिखरावर आषाढांतल्या एका दिवशीं त्यानें टक्कर मारणारा मेघ पाहिला. हा मेघ पाहूनच प्रकृतिकृपण यक्षाला त्याला दूत बनविण्याची कल्पना सुचली. आणि रामायणकर्त्यानें ज्याप्रमाणें मेघसंनिभ रामदूत हनुमानाला रामाचा निरोप घेऊन सीतेकडे धाडला त्याच चालीवर कालिदासानेंहि यक्षसंदेश घेऊन त्या मेघदूताला यक्षप्रियेकडे धाडण्याचा मनसुबा रचला आणि येथेंच तो अमलांत आणला !

* * *

१. रामगिरि किंवा रामगड हा ऋक्षपर्वताचा भाग. या ऋक्षपर्वताच्या लगतच पूर्वेला महेंद्र पर्वत. या महेंद्रगिरीच्या शिखरावरून हनुमानानें लंकेला जाण्याकरितां उड्डाण केलें. (रामायण, किष्किंधाकांड : सर्ग ५० ते ६७ व सुंदरकांड सर्ग १ ला.)

## स्रोत ८ वा

# मेघदूताची जन्मकथा

रामस्य चित्रकूटोऽसौ तेन रामगिरिः कृतः ।
तुंगं शैलं तमाश्रित्य स्फूर्तिः श्लोकत्वमागता ॥
—नांदी, श्लोक ६.

फार प्राचीन काळची गोष्ट. कदाचित् ख्रिस्तपूर्व काळांतलीहि असेल. उज्जयिनीकडून पूर्वेच्या बाजूला—विंध्याच्या कडेकडेनें ऋक्षवान् पर्वताकडे जाणाऱ्या रस्त्यावर एक मध्यमवयीन प्रवासी मार्ग आक्रमितांना दिसत होता. नर्मदेच्या उत्तरतीरानें विदिशा, अमरकंटक इत्यादि परिचित रमणीय स्थळें ओलांडून तो आतां चित्रकूटाच्या (हल्लींचा रामगड) रोखानें निघाला होता. त्याच्या एका बगलेंत वाल्मीकिरामायणाची पोथी होती आणि दुसऱ्या हातांत अर्धरचित रघुवंश होता. त्याची कांति तेजःपुंज होती. मुखश्री प्रसन्न-स्मितहास्यशोभित. डोळ्यांत विद्वत्तेचें तेज प्रतिबिंबित झालेलें होतें. तो भरज्वानींत नसला तरी हौस, खेळकरपणा व विलासप्रियता इत्यादि तरुण वयाच्या खुणा अजून मावळल्या नव्हत्या. त्याचा डौल गंभीर व आकृति आदरभाव उत्पन्न करणारी असली तरी हा गृहस्थ रूक्ष नसून रगेल आहे असें वाटण्यासारखी त्याच्या चेहऱ्याची ठेवण होती. आपल्या कीर्तीची व गुणवत्तेची त्याला यथार्थ जाणीव होती हें त्याच्या धीरगंभीर हालचालीवरून स्पष्ट समजण्यासारखें होतें. वाटेवरील विस्तीर्ण विंध्याच्या वनांची वासंतिक शोभा पहात पहात ती हृदयांत सांठवीत तो पूर्वेकडे चालला होता. वाचकहो, तो प्रवासी म्हणजे प्रथितयश कवि कालिदास होता.

त्यानें विंध्याचा हा परिसर पूर्वी पाहिलेला नव्हता असें नाहीं. हा भाग तर त्याच्या खास प्रेमांतला—विशेषतः उज्जयिनी ते विदिशा. तेथील कानाकोंपरा त्याला माहीत. गंभीरा, वननदी आणि निर्विंध्या अशा बारीकसारीक कुल्योपम नद्या देखील त्याला ठाऊक होत्या. जन्मभूमि नसली तरी निदान त्यानें बाळपण या प्रदेशांत गेलेलें होतें. तो उज्जयिनी-विदिशेपासून अमरकंटकपर्यंत (= आम्रकूट) कितीकदां तरी गेलेला होता. ऋतुसंहाराचे वेळीं त्याची प्रतिभा प्रथम जागृत होऊन स्फुरूं लागली, त्या प्रारंभीच्या उदयोन्मुख अवस्थेंत या रमणीय भूभागानेंच त्याच्या

* हा मेघदूतरचनेचा वृत्तान्त आधींच्या सात प्रकरणांतील संशोधित सामुग्रीवर आधारित आहे. यांत प्रत्यक्ष माहितीच्या अभावीं प्रत्यक्ष काय असेल हें देण्यापुरताच कल्पनेचा उपयोग केलेला आहे.

काव्याला पहिला विषय पुरविला होता ! प्रयाग आणि अयोध्या पूर्वीच पाहून झाली होती. पहाण्याचा राहून गेला होता चित्रकूट पर्वत. म्हणून आतां रघुवंश-रचनेच्या समयीं व निमित्तानें येट राम-प्रसिद्ध चित्रकूट गांठावयाचा होता. नाहीतरी त्याला एकदां प्राचीन दंडकारण्य आणि प्रयाग ते पंचवटी हा वनवासी रामाचा मार्ग व वाल्मीकीनें वर्णिलेलीं तीं तीं स्थळें समक्ष पहायचींच होतीं. वर्ण्य स्थळें प्रत्यक्ष बघण्याचा त्याचा शिरस्ता होता. शिवाय राम-सीतांच्या चरणरजांनीं पवित्र झालेल्या स्थळांच्या दर्शनाची आकांक्षा मनांतून होतीच. रघुवंशांतल्या दशरथाचा मृत्यु समीप येऊन ठेपला होता. कैकेयीच्या अंगांत मंथरा संचारली होती. बाहेरून शृंगारलेली अयोध्या आंतून अस्वस्थ झाली होती. आणि उद्यां राजा होणारा राजबिंडा राम कोमलांगी सीतेसह वनवासाचा—दंडकारण्याचा मार्ग धरणार होता! तोच वनवासाचा मार्ग पहाण्याकरितां रघुवंशाची रचना थांबवून कालिदास घर सोडून बाहेर पडला होता. सरासरीनें रोज त्या आरंभिलेल्या महाकाव्याचा एक सर्ग पुरा करावयाचा असा त्याचा पण होता. पण हा स्वतःचाच बेत व बंधन त्यानें या कारणास्तव बुद्धिपुरःसर शिथिल करून घेतलें. चतुर कालिदासानें मनाशीं विचार केलाः राम-स्थळें पाहून होतील, वर्णनालाहि उपयोग होईल. आम्राश्च सिक्ताः पितरश्च तृप्ताः । याप्रमाणें एकच क्रिया द्वयर्थकरी होते आहे. मग कां न करावी ? वसंतऋतु ऐन भरांत होता. कालिदासानें बेत केला, चित्रकूट-पंचवटी-पर्यंतची सफर करून पर्जन्यकाळ सुरू होण्याच्या आंत घरीं परतावें म्हणजे झालें. कारण मेघ दिसूं लागले, कीं दूरस्थ-पथिकांनीं, वाट बघणाऱ्या स्वगृहाचा रस्ता लगबगीनें सुधारावा यांतलें गोड औचित्य व दुहेरी ओढ त्याला चांगली ठाऊक होती.

यो वृंदानि त्वरयति पथि श्राम्यतां प्रोषितानां
मंद्रस्निग्धैर्ध्वनिभिरबलावेणि मोक्षोत्सुकानि

कदाचित् घर सोडतांना त्याला कोणी प्रेमाचा लडिवाळ अडसरही घातला असेल. अगदीं जायलाच का हवें ! पुढेंमागें नाहीं कां जातां येणार ?... पण एकदां कलावंताची लहर फिरल्यावर तो थांबतो थोडाच. जो हिशेब मांडीत बसेल तो नादच नव्हे. ऊर्मि मोट दाखवील तो कवीचा रस्ता !

## चित्रकूटावर

छांदिष्ट कालिदास चित्रकूटावर जाऊन पोहोंचला तेव्हां त्याचा आनंद गगनांत मावेना. साध्या दृश्यांतहि रमणारा पहाणाऱ्या त्याच्या डोळ्यांना त्यावेळीं प्रत्यक्ष निसर्गदेवतेनें नटविलेलें हें रमणीयतेचें माहेरघर दिसलें त्यावेळीं तो चकित व आनंदित झाला. त्याचें अंतःकरण वाल्मीकीविषयींच्या कृतज्ञतेनें भरून आलें. प्रेमभरानें उचंबळलें. इतके दिवस रामायणांतलीं वर्णनें वाचून चित्रकूट पर्वत

त्याच्या डोळ्यांपुढें उभा रहात असे. आतां चित्रकूट प्रत्यक्ष पाहून रामायणाचीं वर्णनें त्याच्या डोळ्यापुढें नाचूं लागलीं! रामायणाची व चित्रकूटाची भव्यता, उत्तुंगता आणि नैसर्गिक रमणीयता कालिदासाच्या एकदमच लक्षांत आली. केवढे प्रचंड ते वृक्ष- आणि त्याना वेढणाऱ्या त्या लता. त्यांच्या गर्द झाडींतून सूर्यकिरणदेखील डोकावूं शकत नव्हते. आणि क्वचित् आंत शिरत असले तरी चंद्रमरीचिवत् शीतल व मृदु होऊनच. विविधवर्णांच्या पुष्पांनीं आणि शाखापल्लवांनीं चित्र-विचित्रित दिसणारें केवढें त्याचें तें भव्य गगनचुंबी शिखर! त्याचें नांव चित्रकूट पडलें होतें तें उगीच नव्हे. तो उंच सरसावलेला सुळका म्हणजे जणूं भूदेवीचा आकाशपटावर लिहिण्याचा टांकच.

भित्त्वेऽव वसुधां भाति कूटोऽयं दृश्यते शुभः

हें वाल्मीकीनें केलेलें वर्णन कालिदासाच्या मनाला भिडलें. त्यानें त्या निमुळत्या शिखरावरचें आरपार ऋक्षविल अथवा स्रोतोरंध्र (हल्लींची हाथिफोड गुहा) पाहिलें. त्यांतून ठिबकणारा निर्मळ निर्झर आणि त्याच्या निनादानें प्रति-निनादित होणारा आसमंतातचा डोंगरभाग—हा भव्य निसर्गचमत्कार बघून तर त्याच्या आश्चर्याला पारावार राहिला नाहीं. त्याचा प्रवास व पर्यटन पुष्कळ झालेलें होतें. पण असें विलक्षण दृश्य त्याच्या पहाण्यांत नव्हतें. तो जागच्या जागीं खिळून राहिला. त्याच्याच दिलीपाप्रमाणें पण आश्चर्यानें ' चित्रार्पितारंभ इवाऽवतस्थे ' असा तो दिङ्मूढ होऊन गेला. नित्यनवे खेळ मांडण्याची नटव्या निसर्गाची हौस व पात्रता येथें प्रतीत होत होती. वसंतऋतूच्या प्रादुर्भावामुळें रंगांत आलेला हा अद्रिराज रंग खेळण्याच्या लालसेनें या पोकळ गुहेची पिचकारी सज्ज करण्या-करितां प्रथम त्यांतून पाणी उटवून पहातो आहे कीं काय असा भास तो देखावा पाहून होत होता. सृष्टिदेवतेचें अंतरंग किती शुद्ध आणि रसार्द्र असतें याची साक्षच जणूं पर्वताच्या पोटांतून झिरपणारा तो स्वच्छ झरा, पहाणाऱ्यांना पटवीत होता. वल्कलें नेसलेल्या सीतेची करुणमूर्ति पाहिल्यापासून तर हें पाषाणहृदय द्रवीभूत झालें नसेल ना, अशी देखील कविकल्पना कालिदासाच्या डोक्यांत क्षणभर येऊन गेली. माथ्यावरच्या पठारावरून एक छोटी नदी कड्यापर्यंत वहात येऊन खालीं अंग टाकीत होती, तो जलप्रपात तर प्रेक्षणीयच होता. ती ऋक्षविलगुहा आंतून बाहेरून दाट वेतांनीं वेढलेली होती. ते वेत त्यांतील झऱ्याच्या पाण्यानें ओले व हिरवेगार असल्यामुळें तें स्रोतोरंध्र ' सरस-निचुल ' दिसत होतें. गुहाद्वाराच्या आसपासचे छायातरुसुद्धां निर्झराच्या संयोगानें स्वाभाविकपणेंच स्निग्ध म्हणजे ओले होत होते. सगळा देखावा हुबेहूब रामायणांत वर्णिल्याप्रमाणें होता. स्वप्नांत दिसलेली सुंदर स्त्री मागाहून खरोखरीच नजरेस पडावी, त्याप्रमाणें रामायणांत परिचित झालेलें हें रमणीय स्थळ कालिदासाला आतां प्रत्यक्षांत भेटत होतें!

येथें केवळ मूक निसर्गच नव्हे तर बोलकें प्राणि-जगतहि कालिदासाला भेटूं लागलें. त्याचे आवडते सगळे पशुपक्षी तेथें हजर होते. मत्त गजयूथ होते. मोर होते. चंचल हरिणांचे कळप तर वाऱ्यासारखे इकडून तिकडे धावत होते. त्यांत बहुधा हिमालयाच्या परिसरांत सांपडणारे ठिपक्यांचे मृग पाहून तर कालिदास चकितच झाला. नानाविध पक्ष्यांच्या तऱ्हेतऱ्हेच्या संमिश्र आवाजांनीं तो भाग किलबिलून गेला होता. त्यांत त्याला प्रिय अशा कोकिळा आणि सारिका होत्याच. हंस होते, चक्रवाक् होते. त्या उंच पर्वतावरून सभोंवतालचा चारी दिशांचा देखावा किती स्वच्छ व लांबपर्यंत दिसत होता. पश्चिमेकडे–'किंचित्' पश्चिमेकडे नर्मदेला जन्म देणारा भव्य अमरकंटक स्पष्ट ओळखूं येत होता. त्याच्याच पलीकडे विदिशा आणि उज्जयिनी हें लक्षांत आलें. विकडूनच तर तो तेथें आलेला होता. पुन्हा निसर्गाच्या या सर्व सामुग्रींत वाऱ्याचे खेळ चालत. भुंग्यांनीं आयत्याच पोखरलेल्या वेळूंत शिरून तो त्याचीं अलगुजें बनवी. मध्येंच तो मंद वाहून पुष्पांचा सुगंध इकडून तिकडे नेई. त्यावेळीं त्याचें गंधवाह हें नांव सार्थ होत असे. मध्येंच त्याच्या अंगांत येऊन तो सोसाट्यानें वाहूं लागे. त्यावेळीं शिखरांना आच्छादून टाकलेल्या वृक्षलता गदगदा हलूंडोलूं लागल्यामुळें हा पर्वत नृत्य करतो आहे कीं काय असा भास होई. आणि अशा वेळीं—

मारुतोध्दूतशिखरैः प्रनृत्त इव पर्वतः ।

ही रामायणांतील नृत्याची सुंदर उत्प्रेक्षा कालिदासाच्या जिव्हाग्रीं नाचूं लागे. एकीकडे वाल्मीकीच्या भव्य-सुंदर कल्पना आठवाव्या आणि त्याचवेळीं स्वतःच्या नवनव्या ललितरम्य कल्पना सुचाव्या, असा नव्या-जुन्याच्या पाठशिवणीचा गोड खेळ त्याच्या मनांत सुरू झाला.

तेथें अजूनहि तपश्चर्येकरितां राहिलेले कांहीं तापसी होते. तेथले जंगली लोक व त्यांच्या मुग्धसिद्धांगनादि क्वचित् भेटत. हे सुसंस्कृत व असंस्कृत लोक-या दोघांकडून राम-सीतांच्या रसभरित आख्यायिका ऐकावयाला मिळत. ते लोक बोट दाखवून सांगत: 'या प्रवाहांत जनकतनयेनें स्नान केलें. इथें रामाचे आश्रम होते. तिथें रामाचे पाय लागलेले आहेत,' इ० इ०. एकीकडे कालिदासाच्या डोक्यांत रघुवंशाची रचना व रामायणाचें अनुरणन चालूं होतें आणि एकीकडे डोळ्यांपुढें हीं रामस्थळें दिसत होतीं. सगळा रामकथेचा प्रसंगपट त्याच्या मनश्चक्षुंपुढें फिरूं लागला. चित्रकूटाच्या रंगभूमीवर रोज तो रामचरित्रांतले प्रवेश पाहण्यांत रंगून जाऊं लागला.

वस्तुतः चित्रकूटावर वास्तव्य होतें तोंपर्यंत राम आणि सीता एकत्र रहात होतीं. सीतावियोग मागाहून झाला, पंचवटीला गेल्यानंतर. पण पुढें रामायणांतरचा सीताहरणाचा वृत्तांत मनांत घोळूं लागल्यामुळें कालिदासाला चित्रकूटा-

वर विरही रामच दिसूं लागला. मनाच्या, विशेषतः कविमनाच्या गूढ व रहस्यमय कारखान्यात कधीं कधीं होतें त्याप्रमाणें पुढचा धागा मागें ओढला गेला ! पुढच्या अंकांतले प्रवेश आधींच्या अंकांतच दिसूं लागले ! पावसाळा सुरू होण्याचे दिवस जवळ येऊन ठेपलेले होते. तो स्वतः बरेच दिवस गृहापासून अलग पडला होता. त्या एकांतवासांत त्या राम-स्थळीं त्याला विरहव्याकुल मूर्ति दिसूं लागली–रामाची, आणि त्याहीपेक्षां लंकेंत दूरदूर असहाय स्थितींत पडलेल्या सीतेची. कारण दूरस्थ प्रियकरापासून अलग पडलेली विरहिणी हा पूर्वीपासून त्याच्या सहानुभूतीचा विषय होता.

विलोचनेन्दीवरवारिबिन्दुभिः
निषिक्तबिंबाधरचारुपल्लवाः
निरस्तमाल्याभरणानुलेपनाः
स्थिता निराशाः प्रमदाः प्रवासिनाम्

(ऋतुसंहार २-१२)

विरहिणीची करुण स्थिति हा काव्यविषय पुढें मागें विस्तारानें उपयोग करण्याकरितां त्यानें डोक्याच्या एका कोपऱ्यांत बाजूला पण जपून ठेवला होता. तो आतां जागृत झाला.

## राममय वातावरणांत

आरंभापासून नाट्यप्रेमी कालिदासाला नाटकें पहाण्याचा मनस्वी छंद होता. भासकवि त्याचा एक आवडता नाटककार. त्या काळीं सर्वत्र भासाचा बोलबाला होता. विशेषतः त्याचें गाजलेलें स्वप्नवासवदत्त गोड स्वप्नाप्रमाणें रसिकांचें प्यार बनलें होतें. त्याच्या खालोखाल चारुदत्त, अविमारक हीं स्वतंत्र आणि प्रतिमा, अभिषेक हीं रामचरित्रावर रचलेलीं नाटकें रंगभूमीवर रंगत होतीं. भासाचा नाट्यप्रयोग सुरू आहे आणि प्रेक्षागृहांत कालिदास नाहीं असें व्हावयाचेंच नाहीं.

त्यावेळीं वाल्मीकीच्या रामकथा ऐकूं येत होत्या तर डोळ्यांना मासाचीं रान-दृश्यें दिसत होतीं!

एखादा विषय डोक्यांत घोळत असावा, म्हणजे स्थलकालप्रसंगत्वानें त्याच्याशीं निगडित किंवा सदृश अशा त्या विषयाभोंवतालच्या कित्येक गोष्टी व स्मृति वरारून जाग्या होतात, हा तरलमनाचा धर्म आहे. आपल्या कवीचें येथें तेंच होत होतें. कालिदासाला रामायणांतील माल्यवान् पर्वतावरचा रामाचा पावसाळा व विलाप आठवला. त्यांत आर्त हृदयाचें क्रंदन होतें. अधिकारच्युताची असहायता होती. त्यांतून विरहजनित उन्मादावस्था उत्पन्न झाली होती. शाप, अपमान किंवा विरहासारखा दुःसह प्रसंग ओढवला कीं एकटें रहावेंसें वाटतें. आणि एकटें राहिलें, कीं विरह अधिक दुःसह होतो! असें हें दुष्ट रहाटगाडगें आहे पराक्रमी रामाची ती केविलवाणी अवस्था वाल्मीकीनें किती काव्यमयतेनें रंगविलेली होती. एवढा राम पण ललाटलिखितापुढें दीन झाला होता. कितीहि थोर झाले तरी अखेर माणसेंच ना? त्यांचीदेखील प्रसंगविशेषीं होणारी विकल मनोवस्था हा एक स्वतंत्रपणें हाताळण्यासारखा विषय आहे असें कालिदासाला वाटूं लागलें. बहुरंगी रामचरित्रांतला विरही रामाचा एवढाच 'तुकडा' वेगळा काढून वर्णन केला तर?... नेहमींच्या प्रसंगवर्णनपर काव्यापेक्षां मनोविश्लेषणात्मक चित्ररेखनांत नवें सौंदर्य नाहीं का येणार?... कालिदास एकेक कल्पना लढवूं लागला. तो मूनाग पूर्वीचा यक्षांच्या वसतीचा होता. तद्विषयक बौद्धवाङ्मयांतील कथा कालिदासाला माहीत होत्या. हा प्रदेश यक्षकिन्नरोरगसेवित हें त्यानें रामायणांतहि वाचलेलें होतें.

शिवाय यक्ष आणि यक्षिणी यांच्या मोठाल्या कोरीव [1]पाषाण-प्रतिमा करण्याची प्रथा येट मौर्यांच्या कालापासून सुरू झालेली होती. ती पुढें वाढत जाऊन गुप्त सम्राटांच्या कारकीर्दीत कळसाला पोंचली. [2]चक्रवाकांच्या जोडप्याप्रमाणें यक्षदांपत्य हें निःसीम अन्योन्यप्रेमाचें प्रतीक समजलें जात असे. कालिदासाच्या काळांत यक्ष-यक्षिणी हा शिल्पकारांचा एक आवडता विषय होता. हे पुतळे संपन्न नगरांतून, राजप्रासादांत व उद्यानांत ठेवलेले असत. अशा सुंदर शिल्पकृति-यक्षांच्या आकृति कालिदासानें कितीकदां तरी पाहिलेल्या होत्या.

कालिदासाच्या मनांत नकळत शुळगी चालली होती: एखाद्या व्यक्तीच्या

---

१. मौर्य, शुंग, कुशान व गुप्त काळातले यक्षाचे सुंदर दगडी पुतळे हल्ली मथुरेच्या म्यूझियम-मध्ये पहावयास सांपडतात.

२. ही चक्रवाकांची कल्पना फार प्राचीन आहे. नवविवाहित दांपत्यास आशीर्वाद देतांना अथर्ववेदांत म्हटलें आहे—

इहेमाविन्द्र संनुद चक्रवाकेव दम्पती

काण्ड १४ अनुवाक् २ मंत्र ६४

विरहावस्थेचें भावचित्र हें लहानसेंच कां होईना, पण स्वयंपूर्ण काव्य होऊं शकणार नाहीं काय ? पण तसें रामाचें चित्र म्हणून रंगवावें तर तें संपूर्ण रामचरित्राच्या दृष्टीनें अपूर्ण दिसणार -तोकडें व अनुचित. एकवेळ खंडकाव्य करतां येईल, पण एका सबंध ऐतिहासिक कथानकाचे खंड कसे पाडणार ? ऐतिहासिक व्यक्तींच्या चरित्रांतला लचका तोडण्याची पद्धति तर रूढ नाहीं ! मग रामाच्या ऐवजीं काल्पनिक नायक-समजा क्ष किंवा यक्ष बनविला तर ? त्याचें नांव काय योजावें बरें ? पण काय करायचें आहे नांवाशीं ? (शेक्सपियर म्हणतो त्याप्रमाणें What is in a name ?) मुद्दयाशीं गांठ हें मुख्य. भावचित्रणात्मक काव्यांत 'अ' च्या ऐवजीं 'ब' ला विरह झाला म्हणून काय फरक पडणार आहे ? उलट नांव गुलदस्तात ठेवण्यांतच अधिक रहस्य नाहीं काय ? कालिदासाची औचित्यबुद्धि निवडानिवड करीत होती. यक्ष व यक्षस्त्रिया यांचे आत्यंतिक अन्योन्यप्रेम प्रसिद्धच आहे. एक अज्ञात यक्ष नायक म्हणून घेतला तर ? सीतेच्या जागीं यक्षाची पत्नी ? पण यक्षांचें प्रसिद्ध वसतिस्थान कैलासावरच्या कुबेरनगरींत-अलकेंत !-मग असेना ? निर्वासित रामचंद्राप्रमाणें त्यालाहि इकडेच दूर-दक्षिणेंत आणावा. रामावर कैकेयीचा कोप ... यक्षाला कुबेराचा शाप ? जमलें. यक्ष तर ठरला. त्याची विरहिणी प्रिया ठरली. ती तिकडे अलकेंत राहील. अरे, पण त्या दोघांना जोडणारा सांधा कोणता ? मुळांत रामानें सीतेकडे मारुतीला धाडलें होतें. रामाची गोष्ट वेगळी. त्याला पवनपुत्र हनुमान् दूत मिळाला. यक्षाला कोण मिळणार ? ही मोठी अडचण होती. कालिदासाच्या डोक्यांत एकच विचार घोळत होता ! दोन दुरावलेले प्रेमिक-त्यांच्यामधील दुवा कोणता योजावा ?

•

## मेघ जमूं लागले

आणि एके दिवशीं खरोखरीच एक कृष्णमेघ येऊन त्या उच्च शिखरावर ओथंबला. त्याच्या गतीमुळें, बदलत्या आकारांमुळें तो सचेतन असल्याचा भास होई. वाटे हा जणूं पर्वताला टकराच देतो आहे. मेघ हा चंद्रावरील डागाप्रमाणे असा गमतीदार पदार्थ आहे कीं, आपण कल्पना करावी तसा त्याचा आकार दिसूं लागतो ! हत्तींच्या कळपांनीं गजबजलेल्या या पर्वतावरचा ढग कालिदासाला[1] हत्तीसारखा भासावा हें किती स्वाभाविक. दृष्टीपुढे दिसतें तें मनापुढें नाचतें हें जितकें खरें, तितकेंच मनीं तें नयनीं हेंहि खरें. हा उलट सुलट वहाणारा अजब प्रवाह आहे. त्या मेघदर्शनानें आणि त्याच्या गज-सादृश्यानें कवीला मोहून टाकलें. पावसाळ्याच्या आरंभाचीं सर्व चिन्हें प्रादुर्भूत होऊं लागलीं होतीं. तेथे

१. तुलनेकरितां पहा : गजेंद्र घनसन्निभैः (रघु. ४.२९) मेघदूतांत उलट म्हणजे गजाची उपमा मेघाला दिली आहे.

कालिदासाला दिसणारा, चित्रकूटाच्या उंच सुळक्याला धडका देणारा तो प्रचंड कृष्णमेघ हा जणूं वर्षाऋतूच्या आगामी स्वारींतला आघाडीचा हत्तीच होता. वातावरण बदलून गेलें होतें–बदलत होतें. दोन ऋतूंच्या मधील तो संधिकाळ होता–झटापट होती. सर्वांना ताप देणारा उन्हाळा उखडून टाकण्याकरितां एखाद्या कुशल सेनानीप्रमाणें पर्जन्यकाळानें सर्व बाजूंनीं आगाऊच तयारी आरंभिली होती· ज्याच्या जिवावर उष्णकाळ साऱ्या जगाला भाजून काढीत होता त्या सूर्याला त्याच्यापासून अलग पाडण्याकरितां दोवांच्यामध्यें त्यानें मेघांचें काळें पाणीदार सैन्य उभें करण्याला सुरवात केली होती. मध्येंच क्वचित् वीज चमके. वर्षावाची मोहीम सुरू करण्यापूर्वीं पर्जन्यकाळ त्या लखलखीत पट्टयानें जणूं आपली कंबर बांधीत होता. जुल्मी ग्रीष्माच्या मगरमिठींत सांपडलेली तप्त भूमि रावणाच्या अशोकवनिकेंत पडलेल्या कृशांगी सीतेप्रमाणें दीन भासत होती. त्या उष्ण भूमींतून निघणाऱ्या वाफा म्हणजे पर्जन्यरूपी प्रियकराला वृष्टि सुरू करण्याकरितां केलेल्या खुणा किंवा संदेशच आहेत कीं काय असें वाटत होतें. उन्हाळ्याची दाहकता सहन न झाल्यामुळें जणूं त्यक्तवसना झालेली सृष्टिदेवता आतां पावसाळ्याकरितां हिरवीगार गडद वस्त्रें पुन्हा परिधान करण्याच्या विचारांत होती. विंध्य-वनांतील हा परिवर्तन-चमत्कार पहाण्यांत कालिदास गुंग झाला. पण त्याचबरोबर या पावसाळी वातावरणामुळें त्याच्या मनांत एकप्रकारची अस्वस्थता, उदासवाणी छटा उत्पन्न झाली. घराची ओढ लागली.

वनानि वैंध्यानि हरन्ति मानसं
समुत्सुकत्वं प्रकरोति चेतसः
— ऋ० २·८।९

बाह्य निसर्गाचा मानवी मनाशीं किती घनिष्ठ संबंध आहे याची प्रत्यक्ष प्रचीति तो अनुभवीत होता. त्याच्या मनांत घोळणारा हा विचार थोड्याच वेळांत एका रमणीय श्लोकाचें रूप घेऊन प्रकटला.

मेघालोके भवति सुखिनोऽप्यन्यथावृत्तिचेतः
कंठाश्लेषप्रणयिनि जने किं पुनर्दूरसंस्थे ।

पहातां पहातां कालिदासाच्या मनांत एक कल्पना चमकून गेली. संदेश घेऊन समुद्रावरून लंकेकडे आकाशमार्गानें संचार करणाऱ्या रामदूत हनुमानाला रामायणांत चार-पांच वेळां मेघाची दिलेली उपमा त्याला एकदम आठवली...मग मेघाकडेच आपली कामगिरी द्यायला काय हरकत ? तो रामदूत तर आपला मेघदूत ! तीच कल्पना डोक्यांत घोळूं लागली. इथले पर्जन्यधारी मेघ अखेर उत्तरेला हिमाल्याच्याच दिशेनें जातात. मग मेघालाच दूत बनविलें तर ? अरे, पण मेघ पडला जड ! तो तर धूमज्योतिःसलिलमरुतां संनिपातः । औचित्यभंग नाहीं ना

होणार? रसिकांना आणि [1]संभाव्यतेला धक्का बसेल कीं काय? पण काय हरकत आहे? *उन्मादावस्थेंत अशा कल्पना कामिजनांच्या मनांत येतातच. रामायणांत* रामाची नव्हती का अशीच अवस्था झाली?

बस्स्. दूताचें सोंग मेघालाच द्यावयाचें. एकट्या पडलेल्या यक्षाची मेघाशीं गांठ घालून द्यावयाची. वर्षाऋतूचा प्रारंभ कामुकांना, विरहविव्हलांना उन्माद-कारक असा कविसंकेत आणि अनुभवहि आहे. पूर्वी विक्रमोर्वशीयाच्या चवथ्या *अंकांत त्यानें आपला नायक उर्वशीच्या विरहानें वेडा झाल्याचें नाट्यचित्र रंगवि-*लेलेंच होतें. पुरूरव्याला तरी सचेतन अचेतन यांतल्या भेदाचें कुठें भान राहिलें होतें? कालिदासानें त्याच्या तोंडीं खालील श्लोक घातला होता :

मधुकर मदिराक्ष्याः शंस तस्याः प्रवृत्तिम्

मधुकराला उद्देशून बोलणाऱ्या विरहवेड्या राजाच्या पुढची पायरी आतां कालि-दासाला सुचली. फक्त थोडासा फरक करावयाचा होता. **तिची** बातमी कळण्याच्या ऐवजीं आतां **तिला** बातमी कळवावयाची होती; आणि मधुकराच्या जागीं मेघ घालावयाचा होता. *या दुसऱ्या फरकांत अधिक भव्यता व सरसता होती.*

कालिदासाला किष्किंधा कांडांतील वर्षाऋतूच्या प्रारंभींचा रामाचा उन्मत्त विलाप आठवला :

शक्यमंबरमारुह्य मेघसोपानपंक्तिभिः ।
कुटजार्जुनमालाभिः अलंकर्तुं दिवाकरः ॥

[2]मेघाला दूत बनविण्याची कल्पना सुचल्यानंतर यक्षानें त्याचें स्वागत व स्तुति करावी हें स्वाभाविकच होतें. या स्वागतविधींकरितां कालिदासानें वरील श्लोकांतील 'कुटजकुसुमें' वापरलीं. अरे, पण हा अचेतन मेघ इष्टस्थळीं जाणार कसा आणि संदेश सांगणार कसा?—पण न सांगेना! त्याचा मार्ग प्रेमवेड्या

---

१. मेघ पाठविण्याची कल्पना अशक्य अतएव सौंदर्यहानि करणारी आहे अशी टीका भामहप्रभृति पौर्वात्यांनीं आणि पाश्चिमात्यांनीहि केली आहे. लैला सुंदर नाहीं असें लोक मज्नूला सुनवूं लागले तेव्हा तो म्हणाला: बचश्मे मजनु बायद दीद! लैलाचें लावण्य तुम्हांला पहावयाचें असेल तर मज्नूच्या चष्म्यांतून तिच्याकडे बघितलें पाहिजे. त्याप्रमाणेच मेघदूतांतील अद्भुत कल्पनाचें सौंदर्य अनुभवावयाचें असेल तर यक्ष-भूमिका-प्रवेश करावयास हवा. मेघदूत विरहो-न्मत्ताच्या नजरेंतून वाचावयाचें आहे.

२. चीनमध्ये मेघाला दूत बनविण्याची कल्पना त्याच्या वाङ्मयांत फार प्राचीन काळा-पासून दिसते. ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकांत होऊन गेलेल्या चू युआन या प्रख्यात कवीनें या कल्पनेचा उपयोग केला आहे. त्याच्या खालील ओळीवरून संस्कृत मेघदूताची आठवण झाल्या-शिवाय रहात नाही. O floating clouds that swim in the heaven above Bear on your wings there words to him I love. (एच्. ए. गाईल्स : History of Chinese Literature p. 119 )

यक्षाच्या तोंडून वदविला म्हणजे काम भागत होतें. आणि विरहोन्मत्त यक्षानें मेघाला संदेश सांगण्यांत जी थोडीफार असंभाव्यता होती, त्याचा परिहार—

इत्यौत्सुक्यात् अपरिगणयन्, गुह्यकस्तं ययाचे
कामार्ता हि प्रकृतिकृपणाः चेतनाऽचेतनेषु ॥

या यथोचित अर्थान्तरन्यासानें कालिदासानें करून टाकला. मेघाचा प्रत्यक्ष प्रवास न होवो, पण वाचकांचा प्रवास मात्र अलकेपर्यंत होतोच. तेंच कालिदासाला साधावयाचें होतें. त्याचा यक्षसंदेश मेघामार्फत अलकेला पोंचण्यापेक्षां मेघदूताच्या द्वारा रसिकांपर्यंत जाऊन भिडण्याकरितां होता!

## पहिलें खंडकाव्य रचणारा पहिला कवि

नाहीं तरी खंडकाव्य रचण्याचा आतांपर्यंत कोणींहि न केलेला प्रयोग कालिदासाला एकदां करून पहावयाचाच होता. ती अभिनव कल्पना कित्येक दिवसांपासून त्याच्या डोक्यांत डोकावत होती. पण अजून जमलें नव्हतें. कोणत्याहि गोष्टीला योग यावा लागतो हेंच खरें. प्रचंड महाकाव्यांचे डोंगर त्या काळीं होते. तसेच सुभाषितांचे चमकणारे अल्पकणहि होते. या दोन टोकांच्या मधला कोडारौल अर्थात् सुवर्णमध्य त्याला साधावयाचा होता. ऋतुसंहाराचा एक त्रुटित प्रयोग त्यानें करून पाहिला होता, पण त्यांत केवळ निसर्गच होता. माणूस नव्हता! आतां त्याला दोघांची गांठ घालून द्यावयाची होती. अशा चक्रांत कालिदास होता. डोक्याच्या कुठल्यातरी एका खोल कप्प्यांत त्याला न कळत आंखणी चालली होती....

मल्या पहाटेस उठण्याचा कालिदासाचा क्रम होता. अरुणोदयाच्या मागोमाग सूर्यप्रभा फांकावी त्याप्रमाणें तो आणि त्याची प्रतिभा प्रभातकाळीं लगोलग जागृत होत असत. त्या प्रसन्नकाळीं डोक्यांतली गुंतागुंत निवळून विषयाचें स्फुरण व जुळणी सहजतेनें होते, असा त्याचा अनुभव होता.

पश्चिमात् यामिनीयामात् प्रसादमिव चेतना (रघु०)

त्या रमणीय चित्रकूटावर कित्येक सुंदर कल्पना त्याच्या डोक्यांत गर्दी करून सोटीत होत्या. पण संयमी कालिदासानें त्यांतल्या नेमक्या तेवढ्याच निवडल्या. उपलब्ध झालेल्या असूनसुद्धां त्यांतल्या कित्येक कल्पनासुंदरी आपल्या लघुकाव्याच्या मर्यादित अंतःपुरांत मावण्यासारख्या नाहींत अशा नाइलाजाच्या हिशोबानें त्यानें तशाच टाकून दिल्या. त्या 'टाकलेल्या' कल्पना एखाद्यानें जमा केल्या असत्या तरी त्याचें नांव कवि म्हणून सर्वतोमुखीं झालें असतें! तेथें सुचलेल्या एका कल्पनेचा उपयोग त्यानें पुढें रघुवंशांत केला. चित्रकूटपर्वत कालिदासाला मोठ्या गमतीचा दिसला. पाणी वहाणारी कफविन्याची उघड्या तोंडाची प्रचंड गुहा त्याला मस्त रानरेड्याच्या टाळ गळणाऱ्या तोंडासारखी भासली. उंच पर्वत-शिखरें ही जणूं

त्याची शिंगें. शिखरावर ओथंबलेले कृष्णमेघ हा जणूं शिंगांच्या टोकांना लागलेला चिखल. कालिदासानें तेव्हाच चित्रकूटवर्णनाचा हा श्लोक अर्धामुर्धा रचला देखील—

धारास्वनोद्गारिदरीमुखोऽसौ । शृंगाग्रलग्नांबुदवप्रपंकः ॥

पण मेघदूतांत त्याला चित्रकूट उभा करावयाचा नव्हता. रघुवंशाच्या १३ व्या सर्गांत राम सीतेसह विमानांतून लंकेहून अयोध्येला परत यायचे होते. त्यांत या चित्रकूट-वर्णनाची योग्य जागा होती हें जाणून कालिदासानें पुढले दोन चरण जोडून तो अर्धवट राहिलेला श्लोक पुरा केला आणि मागाहून तेराव्या सर्गांतील स्थळवर्णनाच्या मालिकेंत तो बसवून दिला :

*बध्नाति मे बंधुरगात्रिचक्षुः । दृप्तः ककुद्मान् इव चित्रकूटः*

मेघदूतात यक्ष हा काल्पनिक नायक निर्मिल्यामुळे चित्रकूट प्रकट न करतां चित्रकूटाची सामान्य रूपरेषाच फक्त देणें इष्ट होतें. तेवढेंच नेमकें कालिदासानें केलें. **ज्या हेतूनें यक्षाचें नांव, प्रमाद, शापकारण इत्यादि गोष्टी टाळल्या त्याच कारणाकरितां रामगिरीचें अधिक वर्णनहि वगळलें.** कारण एकच. जरूर नव्हती त्याची. *ललित भाव-काव्यांत कशाला ही अडगळ? काव्याची श्रीमंती* कवीच्या उधळपट्टींत नसून मितव्ययांत आहे!

कांहीं श्लोक व फेरफार कालिदासानें घरीं परतल्यावर स्वस्थतेनें केले असतील. कांहीं चमकदार कल्पनांच्या टिकल्याहि मागाहून लावल्या असतील. पण मेघदूताचा बराचसा भाग-मुख्य गाभा त्यानें या चित्रकूटावरच्या वास्तव्यांतच योजला व रचला, यांत शंका नाहीं. हेंच या *काव्याचे जन्मस्थान. मूळ ठिणगी* पडली इथेंच. मग स्फोट होऊं लागला. पहिली वीज चमकली याच स्थळीं. त्या प्रकाशात 'मेघदूता'चा पुढला मार्ग दिसू लागला. चित्रकूट हीच मेघदूताची यक्ष-भूमि-जन्मभूमि. प्रतिभेच्या उघडलेल्या शिंपल्यांत मध्यवर्ती कल्पनेचा प्रथमबिंदु येथें पडला. थोड्याच काळांत त्याचें काव्यमौक्तिक बनलें. कालिदासाचा उत्तरार्ध आधीं पुरा झाला. कारण तोच काव्यमय भाग आधीं स्फुरूं लागला होता. मग त्या कळसाला शोभेल असा पाया त्यानें प्रथमपासून रचून त्याला बेमालूम जोडून दिला. रघुपतिपदांनीं अंकित अशा चित्रकूटाला त्यानें रामगिरि हें सुंदर नांव योजलें. *अतिपरिचयामुळें आतां रामगिरि या नावांत राम उरलेला नाहीं, ही गोष्ट वेगळी.* पण प्रथम चित्रकूटाला त्यानें मेघदूतांत रामगिरि असें संबोधलें, तेव्हां त्या नवीन नांवांतल्या नावीन्यानें रसिकांची पहिली पिढी डुलली खास!

रामगिरीपासून हिमगिरीपर्यंत मेघांच्या संचाराची दिशा स्थूलमानानें त्यानें लक्षांत आणली आणि त्याला अविरोधी असा आपला मेघाचा मार्ग मुक्रर केला.

अशा दोन जाती आहेत. पैकीं खोराकु लोकांमध्यें Saddam नांवाची एक जमात आहे. (इंपीरियल गॅझेटीयर पृष्ठ २३४ व पुढें) हा शब्द मूळ सिद्ध शब्दाचा अपभ्रंश असावा. हे रानटी लोक मेघदूताच्या कालाइतकेच हल्लींहि मागासलेले आहेत. त्याची कल्पना येण्याकरितां हल्दारांचा एक छोटासा कारणापुरता उतारा देतों.

Generally speaking the villagers were so timid that our arrival at the outskirts of a village was the signal for a general stampede and it was most amusing to find men, women and children attepting to hide themselves from our view in all sorts of odd nooks and corners. Most of the people are aborigines. They look very much like the Mundas and Oraons of Chota Nagapur. They go by the name of Korwa.

रामगड व भोंवतालचा प्रदेश गोंडवनांत मोडतो. तेथें आजहि गोंड लोकांची पुष्कळ वस्ती आहे. तथापि त्यांच्याहि आधीं प्राचीन काळीं तेथें कोल लोकांचें राज्य होतें. तेथें आर्य लोकांनीं येऊन जेव्हां आपल्या वसाहती स्थापल्या त्या वेळीं त्यांच्या संस्कृतीचा तद्देशीयांवर बराच परिणाम झाला. त्यांचा धर्म, रहाणी व भाषा यांवर आर्यांची छाप पडली. त्यामुळें तेव्हांपासून बरेच लोक हिंदुधर्मांत आले व हिंदीचीच एक पोटबोली (dialect) बोलूं लागले. यानंतरच्या काळांत गोंड या प्रदेशांत आले व त्यांनीं तेथील रहिवासी कोल लोकांना जिंकलें व कांहींना हांकून दिलें. (Hunter: Statistical Account of Bengal Vol. XVII p. 231).

सुप्रसिद्ध रामायणसंशोधक श्री. आबा चांदोरकर यांनीं गोंडवन भागांत जाऊन हिंडून बरीच माहिती गोळा केली आहे. ते सांगतात कीं, गोंड लोक स्वतःला रावणाचे वंशज म्हणवितात आणि रामचंद्रानें आम्हांला आर्य किंवा हिंदुधर्मांत आणलें असें सांगतात. आपल्याकडे ज्याप्रमाणें हनुमानाचें देऊळ असतें त्याप्रमाणें त्या भागांत प्रत्येक गांवांत दशमुखी रावणाची मूर्ति असते. या मूर्ति दोन फुटांपासून २५ फुटांपर्यंतच्या असतात. या रावणमूर्तींची दसऱ्याला पूजा करतात. यावरून या भागांत राम व रावणाच्याहि आख्यायिका किती प्राचीन काळापासून चालत आल्या आहेत, हें कळून येतें.

१०. सरसनिचुलाद् (मे. श्लोक १४):—

निचुल याचा अर्थ सर्व टीकाकारांनीं वेतस किंवा वेत असा दिला आहे. समुद्रफळ असाहि एक अर्थ आहे, पण तोहि तितकासा जमत नाहीं. सरस म्हणजे फार तर हीं वेताचीं झाडें एखाद्या तळ्याच्या किंवा ओढ्याच्या कांठीं असतील.

तथापि एकंदरींत हा अर्थ समाधानकारक नाहीं. वेताच्या झाडांखेरीज रामगिरीचीं पुष्कळ वैशिष्ट्यें असल्यामुळें एखादा प्रख्यात व जातिवंत कवि महत्त्वाच्या ठिकाणीं-रामगिरीचा निरोप घेण्याच्या प्रसंगीं-वेतांचें वर्णन करीत बसेल असें वाटत नाहीं. सरस व निचुल या दोन्ही शब्दांचा अधिक सरस, समर्पक व खास अर्थ असला पाहिजे. आमचें एक अनुमान आहे. पण चित्रकूटावरचें प्रकरण झाल्याशिवाय त्याचें औचित्य लक्षांत येण्यासारखें नाहीं. म्हणून तें नंतर सादर करूं.

११ लक्षण ९ संबंधींचें जंगली वस्तीसंबंधींचें विवेचन याहि मुद्द्याला लागू पडतें.

१२. रामगडवर घनदाट वृक्षांची गर्द झाडी आहे. हें लक्षण वर्णन करणाऱ्या पहिल्याच श्लोकांतले स्निग्ध व छायातरु हे दोन शब्द कालिदासानें कांहीं खास अर्थानें व कारणानें योजले आहेत. त्यांचा उलगडा पुढें होईल. तूर्त रामगडभोंवतीं अरण्य किती घनदाट आहे याची कल्पना देण्याकरितां श्री. हलदार यांचे दोन उतारे नमूद करतों. रामगड व त्याच्याभोंवतालचा भाग हा रानहत्तींचें वसतिस्थान आहे. अरण्य इतकें दाट आहे कीं, कांहीं ठिकाणीं सूर्यकिरणांनासुद्धां प्रवेश मिळत नाहीं! मधून मधून कमळांनीं फुललेलीं सुंदर सरोवरें असून हें जंगल विविध पक्षिगणांच्या संमिश्र आवाजांनीं गजबजलेलें असतें.

> The forest was so thick that in some places the sun's rays could hardly penetrate through the foliage......the journey was enlivened by the sight of beautiful lakes full of lilies and by the sweet blended notes of various kinds of birds as we marched through the jungles. ( p. 380-2.)

प्रचंड रामगड पर्वतावर दोनदोनशें फूट उंचीचे प्रचंड सालवृक्ष आहेत. साल वृक्षालाच यक्षधूप असें दुसरें नांव आहे. यांत राळ असते. रामगडवर व या भागांत प्रचंड साल वृक्षांचें वैपुल्य आहे. यावरून या परिसरांत यक्षांची वस्ती होती असें दिसतें. यक्षधूप हें नांव त्याचें गमक होय.

१३. मालक्षेत्र ( मे० श्लोक १६ )—रामगिरीच्या नजीक असलेलें व कालिदासानें उल्लेख केलेलें मालक्षेत्र कोणतें, हें अजूनपर्यंत संशोधकांना समाधान-कारकपणें सांपडलेलें नाहीं. त्याचा शोध 'उदङ्मुख' या १४ व्या श्लोकांतील शब्दावरून रामगिरीच्या उत्तरेला करतात. पण तें योग्य नसून मालक्षेत्र पश्चिमेच्या बाजूलाच असलें पाहिजे हें पुढें दाखविलें आहे.

रामगड डोंगर म्हणजे भोंवतालच्या मैदानांतून मध्येंच वर निघालेला मुळका आहे. या प्रदेशालादेखील ' रामपूर टप्पा ' म्हणतात, हें ध्यानांत घेण्याजोगें आहे. रामगड पर्वताची विंध्य पर्वतराजीची सांखळी मध्येंच तुटलेली असून त्याच्या

पश्चिमेला विस्तीर्ण पठार आहे. त्यालाच नकाशांतून छोटा नागपूरचें पठार असें नांव आहे. हें पठार संपतांच अमरकंटक पर्वत म्हणजे नर्मदेचें उगमस्थान लागतें व तेथपासून पुन्हा विंध्याची रांग येट पश्चिमकिनाऱ्यापर्यंत जाऊन मिळते. म्हणजे रामगडहून पश्चिमेला अमरकंटकाकडे (आम्रकूट) जातांना मध्येंच लें मोठें पठार लागतें तेंच किंवा त्यांत हें मालक्षेत्र असलें पाहिजे. या पठाराचा रामगडलगतचा प्रदेश पूर्वीच्या सिरगुजा संस्थानाचा पश्चिमभाग होय. हा भाग शेती करण्यालायक आहे व तेथें शेती करतातहि. त्यामुळें 'सद्यःसीरोत्कषणसुरभि' हें वर्णन या भागाला जुळण्यासारखें आहे.

···The other table-land trends to the west and, opening out as it goes, forms the main area of cultivated land in the State (Sirguja).

—इंपीरियल गॅझेटियर व्हॉ. १७, पृ. १७०.

शिवाय, रामगडावर उभें राहिलें आणि नजर फिरविली की सहजच पश्चिमेकडे पसरलेल्या या मोकळ्या मैदानाचा रमणीय देखावा दृष्टीस पडतो. एवढेंच नव्हे तर हवा स्वच्छ असली तर तेथून मध्य अमरकंटक (आम्रकूट पर्वत) सुद्धां स्पष्ट दिसतो असें म्हणतात.

···Ramgarh temple on the top of the hill – a magnificient place, whence may be seen the interminable hills of Chhuri-Mahtin teprora, and on a clear day, it is said, even the famous Amarkantak.

—Archaeological Survey of India. vol. XIII p. 31 onwards.

मेघाच्या प्रवासांतील रामगड हें पहिलें स्टेशन आणि अमरकंटक हें नंतरचें स्टेशन ठरलें म्हणजे मधलें मालक्षेत्र हें या दोहोंच्या दरम्यान कुठेंतरी असलें पाहिजे हें उघड आहे. विल्सनसाहेब आम्रकूटलाच अमरकंटक मानीत असल्यामुळें मालक्षेत्र येथेंच म्हणजे छत्तीसगड प्रांताच्या उत्तर भागांत रतनपूरच्या उत्तरेस असावें असें मत त्यांनीं व्यक्त केलें आहे.

···The place here mentioned ('Mal') must be somewhere in the vicinity of रतनपूर, the chief town of the northern half of the province of छत्तीसगड ...... The only modern traces that can be found of it are in a place called माल्दा, a little to the north of रतनपूर.

हल्लीं रतनपूरच्या उत्तरेला म्हणजे रामगडच्या पश्चिमेला जें माल्दा नांवाचें ठिकाण आहे त्यालाच पूर्वी माल नांव असावें. माल्दा हें नांव 'माल'चें अपभ्रष्ट रूप दिसतें. पण या बाबतींत तर्क करण्याचीहि जरूर नाहीं. कारण या भागांत पूर्वीच्या

सिरगुजा संस्थानांत राहणारे खोराकु हे आदिवासी लोक *माल-धनी* व महादेव यांना दैवत मानून त्यांची पूजा करतात. (डिस्ट्रिक्ट गॅझेट, छत्तीसगड पृ. २३४।५) यावरून या भागाला पूर्वी माल हें नांव असावें, याबद्दल संशय रहात नाहीं.

## शकुन म्हणून उत्तरेला तोंड

*उदङ्मुखः* याचा अर्थ कित्येक टीकाकार 'उत्तरेच्या दिशेनें जा' असा करतात, पण तो बरोबर बसत नाहीं. येथपासूनच उत्तर दिशेनें प्रत्यक्ष गमन करावयाचें असा अर्थ नाहीं-असणें शक्य नाहीं. कारण पुढच्याच १५ व्या श्लोकांत 'कांहींसा पश्चिमेला जा आणि मग पुन्हा उत्तरेला जा' असा स्पष्ट दिशा-निर्देश केलेला आहे. ( = किंचित् पश्चात् व्रज इ० ) कांहींसा पश्चिमेला जर जावयाचें आहे, तर त्याच्याच आधीं उत्तरेला जायला कोण सांगेल? तेव्हां या दिशेच्या प्रश्नाचें हें 'उत्तर' चूक आहे. येऊन-जाऊन उदङ्मुख आणि पश्चात् व्रज यांच्या दरम्यान फक्त एक मालक्षेत्र लागतें. पण या मालक्षेत्रांत (माळरान किंवा पठारी प्रदेश) असें काय विशेष आहे कीं, ज्याकरितां पश्चिमेला जावयाचें असून कालिदास उत्तरेला जायला मेघाला सांगेल? आधीं उत्तर, लगेच बदलून पुन्हा पश्चिम आणि नंतर पुन्हा उत्तर-इतका द्राविडी प्राणायाम आणि आडवळणाचा मार्ग कशाकरितां? कालिदास कांहीं कारणावांचून वाकड्या वाटेला जाणारा मंद बुद्धीचा किंवा गबाळा कवि नाहीं. साराश, मालक्षेत्राचा शोध रामगिरीच्या उत्तरेला न करतां पश्चिमेला केला पाहिजे. उदङ्मुख या शब्दप्रयोगानें फसून जातां कामा नये. उदङ्मुख म्हणजे उत्तरेकडे तोंड वळवून म्हणजे रोख ठेवून म्हणजे अखेर उत्तरेला जावयाचें आहे हें ध्यानीं धरून उड्डाण कर, एवढाच अर्थ आहे. उदङ् म्हणजे उत्तर या शब्दाची व्याप्ति अखेरच्या मुक्कामाची दिशा स्पष्ट करण्यापुरतीच मर्यादित आहे. शिवाय उदङ्मुख हा शब्द उत्पत या क्रियापदाकडे जोडावयाचा आहे. येथें व्रज इ० गमनार्थी क्रियापद घातलेलें नसून रामगिरीहून उड्डाण करण्याचीच फक्त क्रिया निर्दिष्ट केली आहे. म्हणजे निघतांना अखेर उत्तर दिशा गांठावयाची आहे एवढीच पूर्वसूचना मेघाला करावयाची आहे, हें स्पष्ट आहे. म्हणून मालक्षेत्राचा तपास व स्थापना रामगिरीच्या उत्तरेला करतात, तें युक्त नव्हे.

वस्तुतः माल पठार हें एक अप्रसिद्ध व मामुली ठिकाण आहे. मेघाच्या प्रवासांतलें तें कांहीं अपरिहार्य 'स्टेशन' नव्हे. पादपूरणार्थक अव्ययाप्रमाणें, मेघमार्गाच्या स्थलनकाशात मध्येंच बरीचशी जागा कोरी राहूं नये एवढ्याकरिता कालिदासानें या माल पठाराचा उपयोग करून घेतला आहे, हें सहज कळण्याजोगें आहे. मेघदूताच्या काव्यकोठारांत कांहीं भर पडेल असें या माळरानांत कांहींच उगवत नाहीं! या मालक्षेत्राविषयीं मेघदूत काव्यांत आपल्याला माहिती अशी

एवढीच मिळते कीं, नुकतेंच नांगरलें असल्यामुळें हें क्षेत्र म्हणजे शेतजमीन सुगंधित झालेली होती. नांगरण्याची क्रिया आणि सुगंधाची निर्मिति हा कार्यकारण-भाव स्पष्ट आणि प्रतीत होण्याजोगा नसल्यामुळें वाचकाला या दोहोंच्या दरम्यान पर्जन्यवृष्टि झाली असली पाहिजे, अशी एक मनची कल्पना करून ती गृहीत धरावी लागते. तेव्हां कांहीं सुसंगत अर्थ या मालक्षेत्राच्या वर्णनांतून निघूं शकतो. *याखेरीज मालक्षेत्राचें दुसरें वैशिष्ट्य किंवा उपयोग काव्याला नाहीं. त्यांत विशेष* काव्योपकारकता अशी दिसत नाहीं. शिवाय पावसाच्या पहिल्या सरीनें तप्त भूमि तृप्त व शांत होणें आणि त्यापासून विशिष्ट प्रकारचा आल्हाददायक सुगंध दरवळणें हा जो अनुभवसिद्ध सृष्टिचमत्कार आहे त्याचा उल्लेख व वर्णन कालिदासानें खुद्द मेघदूतांतच अन्यत्र केलेलें आहे. मग जवळजवळ अजागलस्तनवत् असलेला हा माल प्रदेश काव्यांत कसा घुसला? वाचकांच्या हें लक्षांत येईल कीं, मधली मोकळी जागा भरण्याकरितां ही कवीची योजना आहे. रामगिरि आणि आम्रकूट या दोन स्थळांच्या दरम्यान जी मोठी तूट, पोकळी किंवा खड्डा पडत होता, तो भरून काढण्याकरितां घातलेली ही भर होय. मालक्षेत्र म्हणजे या दोहोंच्यामधील दुवा. चांगले कवि क्षुद्र व सामान्य गोष्टींचाहि आपल्या कामाकरितां आणि कामापुरता कसा उपयोग करून घेतात, याचें हें मालरान म्हणजे उत्कृष्ट उदाहरण होय. हा *माल-प्रदेश जर उत्तरेला असता तर उत्तर-पश्चिम-पुन्हा उत्तर असा वाकडा वळसा* कालिदासानें खास घेतला नसता. त्याला जर मेघाला पश्चिमेकडे न्यावयाचें आहे (नर्मदा, विदिशा व उज्जयिनी यांच्या रोखानें) तर कवि या मामुली मालक्षेत्राकरितां दिशांची इतकी घालमेल कशाला करील? म्हणून मालक्षेत्र रामगिरीच्या पश्चिमेकडेच असणें अधिक संभवनीय आहे. तसें पाहूं गेलें तर मेघाला पश्चिमेकडे नेणें हीच मुळीं वाकडी वाट आहे! पण वाकडी वाट होते याची कालिदासाला पूर्ण जाणीव आहे.

वक्रः पंथा यदपि भवतः प्रस्थितस्योत्तराशां (श्लोक २७)

धडधडीत वाकडी वाट होत चालली आहे, हें लक्षांत येऊन आणि खटकत असूनहि कालिदास तरीहि त्या मेघाला पश्चिमेकडे कां ओढून नेत आहे? कै. शिवरामपंत परांजपे आपल्या सरस लेखांत (साहित्य-संग्रह भाग १) त्याचें *कारण देतात :*

"या प्रश्नाचें असें उत्तर दिसतें कीं, कांहीं तरी कारणामुळें ही विदिशेच्या बाजूची वाट कालिदासाच्या विशेष परिचयाची आणि प्रेमाची असली पाहिजे. आपल्या मेघाला उत्तरेकडे जावयाचें आहे ही जाणीव कालिदासाच्या मनामध्यें जागृत असतांनाहि 'परि परिचिता त्या त्या वस्तु न राहविती धिरा' या उत्तररामचरितांतील रामाच्या वचनाप्रमाणें कालिदासाच्या त्या त्या चिरपरिचित स्थळांविषयींचा ओढा मेघाला उत्तर दिशेच्या ऐवजीं

पश्चिम दिशेकडेच-विदिशा नगरीकडे आणि वेत्रवती नदीकडेच-ओढून नेत आहे! 'सद्यः सीरोत्कषणसुरभिक्षेत्रमारुह्य मालं। किंचित् पश्चाद् व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण' या ठिकाणीं 'थोडासा पश्चिमेकडे चल, मग फिरून उत्तरेकडे जाशील,' असें कालिदास पूर्वमेघाच्या सोळाव्या श्लोकांत यक्षाच्या तोंडून मेघाला म्हणतो; आणि नंतर आम्रकूट म्हणजे अमरकंटकपर्वत, रेवा म्हणजे नर्मदा नदी, विदिशा नगरी, वेत्रवती नदी इत्यादि ठिकाणांची एकामागून एक रांग सुरू होते. इतका या विदिशा नगरीच्या प्रदेशाकडे कालिदासाचा ओढा कां? तू आपली उत्तरेकडची वाट जराशी सोडून दे आणि पश्चिमेच्या दिशेला चल, असें कालिदासानें मेघाला कां म्हणावें?

"असल्या बारीकसारीक नद्यांचें कालिदास ह्या ठिकाणीं मेघाला उत्तरेकडे पाठविण्याचें थांबवून वर्णन करीत बसला आहे, याचा अर्थ काय? या प्रश्नाचें एकच समाधान आहे आणि तें उत्तररामचरितांत म्हटल्याप्रमाणें '*तत् तस्य किमपि द्रव्यं यो हि यस्य प्रियो जनः*' हेंच होय. निर्विंध्या आणि सिन्धु, गंधवती आणि गंभीरा, या नद्या निर्मनोविकारबुद्धीच्या तुम्हां आम्हां लोकांना कितीहि बारीकसारीक असोत; परंतु कालिदासाला त्या फार महत्त्वाच्या वाटत असल्या पाहिजेत, असें दिसतें. एरवीं त्यांचें तो वर्णन करीत बसला नसता. "उत्पतोदङ्मुखः खं" असें १४ व्या श्लोकामध्ये म्हणून झालें नाहीं, तोंच लगेच "किंचित्पश्चाद् (पश्चिमभागेन) व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण" या १६ व्या श्लोकामध्यें उत्तरदिशा सोडून मेघाला कालिदास पश्चिमेकडे नेत आहे आणि "वक्रः पंथा यदपि भवतः प्रस्थितस्योत्तराशां" या २७ व्या श्लोकांत उत्तरेकडे जाणाऱ्या मेघाची ही जरी वाकडी वाट होत आहे, तरीहि उज्जयिनी नगरीकडे जाण्याचा कालिदास मेघाला आग्रह करीतच आहे, यांत कालिदासाचें या प्रदेशावरील प्रेम स्पष्टपणें व्यक्त होत आहे.

"हें प्रेम जन्मभूमीच्या वात्सल्यामुळें असो, किंवा चिरदहवासाच्या बंधनानें असो, परंतु मुद्दाम वाकडी वाट काढून त्या वाटेंतील बारीकसारीक नद्या वगैरेंचें वर्णन करीत बसणाऱ्या कालिदासाचें त्या प्रांतावर प्रेम होतें, असें अनुमान काढण्याला येथें निर्विवाद जागा आहे."

या विचारसरणींत बरेंच तथ्य आहे यात शंका नाहीं. कालिदासाचें प्रथमकाव्य ऋतुसंहार विंध्याद्रीवरतींच लिहिलेलें आहे. हें आम्हीं मागें दाखविलेंच आहे. त्याला आपल्या लहानपणच्या विंध्य-परिसरांतलीं आवडतीं ठिकाणें व दृश्यें यांचें स्थलक्रमानुसार वर्णन करून घेण्याची हौस व संधि साधावयाची होती, असें दिसतें. ती त्यानें साधली म्हणूनच मेघाचा मार्ग त्यानें रामगडहून गुर्वीनें प्रथमारंभींच

पश्चिमेकडे वळविला व अमरकंटक, नर्मदाद्वय उरकून विदिशेला (हल्लींची भिलसा) भेट देऊन त्याला उज्जयिनीपर्यंत ओढलें आणि अशा रीतीनें आपला अंतःस्थ हेतु पूर्ण झाल्यावर मग त्याला उत्तरेकडे वळवून रीतसर इच्छित स्थळापर्यंत त्याची वर्णात लावली आहे. वर उल्लेखिलेल्या कारणासाठीं व विदिशा, उज्जयिनी यांच्यासारखीं उल्लेखनीय व काव्याला रंग चढविणारीं स्थळें असल्यामुळें कालिदासानें पश्चिमेकडची वाट काढली हें ठीक आहे. परंतु पश्चिमेकडे जावयाला निघण्यापूर्वीं मालक्षेत्राला भेट देण्याकरितां उत्तरेला उगीच एक वाकडी वेलांटी घेण्याला कांहीं सबळ कारण नाहीं. यावरूनहि माल रामगिरीच्या पश्चिमेलाच असावें, या म्हणण्याला पुष्टि मिळते.

वर चर्चिलेल्या कारणांसाठीं कालिदासानें हा पश्चिमेकडचा वाकडा रस्ता पत्करला असेल. परंतु त्याबरोबरच हा त्यानें वर्णन केलेला मार्गच मेघाच्या नैसर्गिक मार्गाशीं व मान्सून वाऱ्यांच्या दिशेशीं भौगोलिक दृष्टचा बराचसा जुळता आहे, ही गोष्टहि लक्षांत ठेवली पाहिजे. त्यावरूनहि रामटेकवरून निघालेल्या मेघानें भिराशी म्हणवात त्याप्रमाणें थेट सरळ उत्तरेला विंध्य व नर्मदा ओलांडून जाण्याची अशक्यता लक्षांत येईल. रामगडवरून निघणाऱ्या मेघाचा वरीलप्रमाणें मार्ग *भौगोलिक नियमांना* धरून आहे.

उदङ्मुख हाच शब्द कालिदासानें अन्यत्र अनेक ठिकाणीं वापरला आहे (रघु. ४:५९) तेथेंहि त्याचा अर्थ फक्त उत्तरेला तोंड करून एवढाच विवक्षित आहे. शिवाय ज्या रामायणांतून कालिदासानें बऱ्याच कल्पना आणि शब्दप्रयोगहि जशाच्या तशा उचलून घेतले आहेत, त्या रामायणांतहि उदङ्मुख शब्द फक्त वरील अर्थानेंच वापरलेला आहे (रामा० अयोध्या. ९६·१२) यावरून उदङ्मुख शब्दाचा 'उत्तरेकडे जा' असा अर्थ नसून उत्तरेकडे नजर ठेवून, उत्तरेच्या रोखानें, अखेर उत्तरेला जावयाचें आहे हें ध्यानांत धरून, एवढाच मर्यादित अर्थ कालिदासाला अभिप्रेत आहे, हें स्पष्ट दिसतें. प्राचीन काळीं आर्य लोक उत्तर दिशा शुभ समजत असत आणि दक्षिण अशुभ समजत. दक्षिण दिशा ही राक्षसांच्या राहण्याची आणि म्हणूनच कदाचित् यमाची दिशा ठरलेली असावी. राक्षसांना 'नैर्ऋत' म्हणतात यासाठींच. रामायणांत देखील रामचंद्र वनवासार्थ अयोध्येहून बाहेर पडले त्या वेळीं जरी त्यांना दक्षिणेकडे *गमन करावयाचें होतें तरी रामानें शुभसूचक म्हणून* रथाचें तोंड प्रथम उत्तरेकडे केलें होतें.

उदङ्मुखं तं तु रथं चकार।
प्रयाणमांगल्यनिमित्तदर्शनात् ॥

—अयोध्याकांड सर्ग ४६·३४

म्हणूनच मेघाच्या प्रस्थानसमयीं–अगदीं ऐन निघण्याच्या वेळीं-प्रयाण-मांगल्याकरितां यक्षानें 'उदङ्मुखः उत्पत' असें मेघाला सांगितलें असलें पाहिजे.

याचेंच आणखी एक उदाहरण पहा. खुद्द कालिदासानें हा उदङ्मुख शब्द रघुवंशाच्या पांचव्या सर्गांत वापरला आहे. नर्मदेच्या दक्षिण तीरावर तळ असतांना अज राजानें एका गजरूपधारी गंधर्वाला शापमुक्त केलें. त्यानें संतुष्ट होऊन राजाला प्रभावी अस्त्रमंत्र दिला. तेव्हां अजानें उत्तरेकडे तोंड करून त्याचा स्वीकार केला, हा कवीचा उल्लेख सूचक आहे.

उदङ्मुखः सोऽस्त्रविदस्त्रमंत्रं । जग्राह तस्मान्निगृहीतशापात् ॥

यावरून शुभ व महत्त्वाची गोष्ट करतांना उदङ्मुख होऊन करावयाची, हा संकेत व प्रघात स्पष्टपणें दिसून येतो. घराबाहेर पडतांना अजूनहि उत्तरेकडे तोंड करण्याची चाल दिसते. प्रयाणमांगल्यानिमित्तदर्शन हेंच उदङ्मुख होण्यांतील रहस्य होय.

## आधीं पश्चिम, मागाहून उत्तर

१४. येथून पश्चिमेकडे वळ आणि मग फिरून उत्तरेला जा म्हणजे अलका लागेल. ( श्लोक १६ ), असें यक्ष मेघाला सांगतो. सबंध मेघदूत काव्यांत दिशेचा आदेश असा हा एकच आहे म्हणून त्याला फार महत्त्व. या प्रश्नाची चर्चा आतांपर्यंत जागजागीं विषयानुरोधानें आधींच येऊन गेली आहे. ग्रंथरचनेच्या सोयीकरितां लेखक विषयाचे अलग अलग भाग पाडून घेतो खरे, पण ते राजकीय हेतूनें पाडलेल्या प्रांतांप्रमाणेंच कृत्रिम ठरतात. लेखनाच्या ओघांत लेखणी शेजारच्या संलग्न विषयांत हिंडून आल्याशिवाय रहात नाहीं. आतां पूर्वी येऊन गेलेल्या विवेचनाखेरीज उपोद्बलक असे नवीन मुद्दे येथें मांडतों. मूळ श्लोक असा :—

सद्यः सीरोत्कषणसुरभि क्षेत्रमारुह्य मालं ।
किंचित् पश्चात् व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण ॥

यांतील 'एव' हें पद फार सूचक आहे. याचा स्पष्ट अर्थ असा कीं, पुढें अखेरीस उत्तरेलाच जावयाचें असलें तरी तूर्त पश्चिमेकडेच वळ. म्हणजे पश्चिमेकडे वळण्यानें किंचित् वाकडी वाट होत आहे याची जाणीव 'एव' शब्दात स्पष्टपणें व्यक्त झालेली आहे. पुढें 'वक्रः पंथा यदपि भवतः' या २७ व्या श्लोकांत स्पष्ट शब्दांत व्यक्त झालेली वाकड्या वाटेची जाणीव या १६ व्या श्लोकांत[1]

१. या १६ व्या श्लोकात किंचित् पश्चात् असे शब्द आहेत. तेथें किंचित् म्हणजे थोडेंसें असा अर्थ नसून काहींसें पश्चिमेला (somewhat to the west) असा अर्थ आहे. तथापि याखेरीज आणखीहि एक अर्थ कवीच्या मनात असणें संभवनीय आहे. किंचित् हें क्रियाविशेषण वरच्या ओळीतील आरुह्य पदाकडे जाऊ शकतें. म्हणजे मालक्षेत्र विस्तृत असल्यास तें सबंध व्यापणें मेघाला शक्य नाहीं. म्हणून त्याचा कांहीं भाग वाटेंत लागेल तेवढाच आक्रमून व सिंचन करून (मालं किंचित् आरुह्य) असा अर्थ निष्पन्न होतो. तो स्वाभाविक व सुसंगत आहे. हा अर्थ घेतला, तर किंचित् शब्दानें पश्चिमेकडील दिशेचा व प्रवासाचा जो संकोच, तो होणार नाहीं.

असपष्टपणें सुचित झालेली स्पष्ट दिसते. यावरून वस्तुतः उत्तर दिशा गांठावयाची असलेल्या मेघाची वाकडी वाट थेट रामगिरीपासूनच सुरू होत आहे हें दिसून येईल आणि याची कल्पना कालिदासाला नाहीं असेंहि नाहीं. म्हणून या दिशा-दर्शक उल्लेखाचा अर्थ *'आधीं पश्चिमेला वळ आणि मग मात्र उत्तरेलाच जा'* असाच केला पाहिजे. पश्चात् व्रज म्हणजे मेघाला बराचसा पश्चिमेला न्यावयाचा आहे हें उघड आहे. नाहीं तर भूयः म्हणजे पुन्हा आणि एव म्हणजे उत्तरेलाच हे शब्द योजण्याचें कारण नव्हतें. ही दिशा व मार्ग निश्चित झाल्यानंतर त्याला रामगडाशिवाय दुसरें ठिकाण जुळत नाहीं, हें उघड आहे.

आतां रामटेकहून अलकेला जावयाचें आहे, अशी कल्पना करूं या. तर मग यक्षानें मेघाला प्रस्तुतसारखा आदेश दिला नसता. आधीं उत्तरेला जा-मग पुन्हा पश्चिमेला-आणि मग पुन्हा उत्तरेला जा. अशी द्राविडी प्राणायामाची वाट मेघाला सांगावी लागली असती (मागील प्रकरणांतला नकाशा पहा). उलटपक्षीं रामगडहून **कैलासाकडे** (अर्थात् नर्मदा-विदिशा-उज्जयिनी या मार्गानें) जावयाचें म्हटल्यास मात्र या श्लोकांत सांगितलेली वाटच कोणीहि सांगेल. यक्षानेंहि तीच वाट सांगितली आहे. यावरून रामगड हाच रामगिरि हें सिद्ध होतें.

*'माल'* याचा आणखीहि एक अर्थ संभवतो. आणि तो अतिशय समर्पक रीतीनें जुळतो. तो असा: रामगडपर्वताचें उत्तुंग शिखर चढून गेलें म्हणजे अगदीं थेट माथ्यावर सुमारें दोनशें फूट लांबीरुंदीचें छोटेंसें पठार किंवा क्षेत्र आहे. त्याला Mehal म्हणजे मेहल अथवा महल असें नांव आहे. (A. S. I. vol. XIII p. 36) तिथें बेगलरसाहेब गेले असतांना केळीची बाग केलेली होती व एका हत्तीनें नुकत्याच त्यांतील केळी मोडून त्यांची नासधूस केल्याचें दिसत होतें. बेगलरसाहेबांना हत्तीचीं पावलें दिसलीं. *त्यांवरून बऱ्याच अंतरापर्यंत त्याचा माग* काढला. तथापि हत्तीचा शोध लागणें शक्य झालें नाहीं. सारांश, या पर्वत-माथ्यावरच्या छोट्या पठाराला पूर्वी माल हें नांव असावें. असें असल्यास मेघ त्या उंच शिखराच्या मध्यें कोठेंतरी किंवा मेखलाभागावर बिलगलेला असतांना यक्षानें त्याला वर म्हणजे माथ्यावरच्या माळापर्यंत चढावयाला सांगणें स्वाभाविक आहे. *त्याशिवाय शिखराला अडलेल्या किंवा टकरा मारणाऱ्या मेघाची पुढली* वाट मोकळी कशी होणार? शिवाय मग *'आरुह्य मालं'* यांतील आरुह्य म्हणजे 'वर अथवा उंच चढून' हा जो सरळ व स्वाभाविक अर्थ आहे तो किती चपखल व हृदयंगम रीतीनें जुळतो, हें वाचकांच्या लक्षांत येईल. वर दिलेल्या दोन अर्थांपैकीं कोणताहि स्वीकारला तरी चालेल. कारण आमचा प्रस्तुत सिद्धान्त मालक्षेत्राच्या निश्चितीवर आधिष्ठित नाहीं. सुचलेले संभाव्य अर्थ सादर केले आहेत एवढेंच.

## आम्रकूट म्हणजे अमरकंटकच

१५. क्र. १५ ते १८ हीं चार लक्षणें आम्रकूटाशीं संलग्न आहेत. आधींच्या १४ व्या लक्षणांत किंचित् पश्चात् या दिशा-उल्लेखाच्या स्पष्ट केलेल्या अर्थाप्रमाणें पाहिलें तर आम्रकूट हा आपोआपच अमरकंटक ठरतो! पण तें सोडून देऊन स्वतंत्रपणें आम्रकूट कोणता हें पाहूं. येथें एक गोष्ट अवश्य सांगितली पाहिजे. रामगड, किंचित् पश्चात् इ० ओळीचा अर्थ, मालक्षेत्र, अमरकंटक आणि नर्मदेचें 'नक्षीदार' दृश्य या पांच गोष्टींपैकीं कोणतीहि एक निश्चित झाली, कीं बाकीचीं स्थळें आपोआपच नक्की ठरतात. अशी त्यांची सांखळी आहे. तथापि यांपैकीं एकमेकांची मदत न घेतां आम्हीं प्रत्येक स्थळाचा स्वतंत्र विचार करून तें निश्चित केलें आहे. परंतु शिवाय या संबंधित स्थळांच्या निश्चयानें अप्रत्यक्षपणें मिळणारी पुष्टि त्यात मिळविली म्हणजे हीं सर्व स्थळें (विशेषतः रामगड) 'द्विर्बद्धं सुबद्धं भवति' या न्यायानें किती दृढ व निर्विवादपणानें सिद्ध होतात, हें वाचकांच्या लक्षांत येईल.

अमरकंटक पर्वताचें स्थानमाहात्म्य मोठें आहे. अमरकंटक म्हणजे छोटा नागपूर प्रदेशांत गोंडवनांतील मैकल पर्वतराजींचा एक भाग होय. येथें नर्मदा, महानदी व शोण या तीन मोठाल्या नद्यांचा उगम आहे. मैकल पर्वतरांगेचें तें अगदीं पूर्वेकडील टोकाचें शिखर होय (असें कांहीं लोक समजतात). याची उंची ३४६८ फूट म्हणजे रामगडपेक्षांहि अधिक आहे. हा पर्वत हिंदूंचें एक पवित्र क्षेत्र समजला जातो. (B. C. Law : Holy Places of India p. 34) पद्म-पुराणांत त्यावरील चंडिका-तीर्थाचें वर्णन आहे. मत्स्यपुराणाच्या हिशोबीं अमरकंटकचें पावित्र्य कुरुक्षेत्रापेक्षांहि अधिक आहे. नर्मदा, शोण व महानदी या तीन पवित्र व महत्त्वपूर्ण नद्यांचा उगम याच पर्वतांतून होतो. असा हा प्रचंड, पवित्र व प्राचीन पर्वत आहे.

अमरकंटक भव्य व उंच आहे. त्यावर अनेक उत्तुंग शिखरें आहेत. (सानुमान् आम्रकूटः) त्यावर रान-आंब्यांचीं विपुल झाडें आहेत. त्यावर रान-वणवे लागतात. रान-आंब्यांच्या पिकलेल्या पिवळ्या आम्रफलांनीं झंवरलेल्या व फुगीर दिसणाऱ्या या डोंगराच्या शिखरावर काळा मेघ ओथंबला म्हणजे खूप उंचीवरून पहाणाऱ्याला तो भूदेवतेच्या स्तनासारखा दिसेल, हें रसिकाना न सांगताहि समजण्यासारखें आहे. शिवाय ही कल्पना कामुक व विरहोन्मत्त यक्षाच्या तोंडीं किती खुलून दिसते, याचें औचित्य वेगळें सांगावयास नको. या डोंगराच्या पश्चिमेस गेलें कीं, विंध्याच्या पायथ्याजवळची स्फुटितप्रवाहा नर्मदाहि लागते. यावरून अमरकंटक मेघदूताच्या सर्व अटी पुऱ्या करतो हें दिसून येईल.

पण हा इतका लायक उमेदवार मिराशींना मंजूर नाहीं:

"कारण अमरकंटक पर्वत ईशान्येस दूरवर राहतो; शिवाय अमरकंटकाचें प्राचीन नांव आम्रकूट नसून मेकल असें होतें. नर्मदा नदीचा उगम अमरकंटकला होतो व तिला मेकलसुता म्हणतात हें प्रसिद्ध आहे. तेव्हां अमरकंटक प्राचीन आम्रकूट असणें शक्य नाहीं."

अमरकंटक ईशान्येस रहातो? कुणाच्या ईशान्येस? रामटेकच्या असेल, **रामगडच्या** ईशान्येस नव्हे! म्हणजे मौज अशी कीं, जी गोष्ट सिद्ध करावयाची आहे तीच गृहीत धरली आहे! रामटेक सिद्ध करावयाचा आहे, असें असतांना रामटेक गृहीत धरून अमरकंटक त्याच्या ईशान्येला म्हणून रद्द ठरवावयाचा, ही युक्तिवादाची तऱ्हा काय आहे हें समजत नाहीं! त्याचप्रमाणें मेकल हें प्राचीन नांव आहे हें मान्य. पण एका स्थळाला अनेक नांवें असूं शकत नाहींत काय? अमरकोश किंवा इतर शब्दकोश सारे निष्कारण रचले गेले काय? शिवाय हिमालय, विंध्य किंवा खुद्द मिराशींच्या सातपुड्याप्रमाणेंच मेकल हें एका पर्वतराजीचें सामुदायिक किंवा समावेशक असें नांव आहे, हें स्पष्ट आहे. त्यांतल्या पर्वतांना अथवा शिखरांना स्थलकालभेदानें स्वतंत्र नांवें असूं शकणार नाहींत काय? त्यांतीलच एखाद्या आम्राच्छादित उंच डोंगराला पूर्वी आम्रकूट (कूट=शिखर) आणि अलीकडे अमरकंटक असें वर्णनात्मक किंवा अपभ्रंशात्मक नांव पडलेलें असणें असंभवनीय आहे काय? प्राचीन व प्रारंभींचीं नामाभिधानें गुण-दर्शक किंवा वर्णनात्मकच असतात. किंबहुना तीं विशेषणेंच असतात, नामें नसतातच. उदाहरणार्थ कृष्ण, परशुराम, भीम, दशरथ, जानकी, ऊर्मिला, शकुंतला, विंध्य, चित्रकूट, भागीरथी, यमुना, दशार्ण, कुरुक्षेत्र इ० इ०. प्रथम काळा म्हणून कृष्ण किंवा दांडगा म्हणून भीम होता. पुढें गोऱ्या किंवा कृश माणसालाहि कृष्णाजीपंत व भीमराव अशीं नांवें मिळूं लागलीं! पहिलीं पहिलीं नांवें हीं विशेषनामें नसून सामान्यनामें होतीं, हा सामान्य नियम विशेष लक्षांत ठेवला पाहिजे. तात्पर्य, मेकल रांगेतल्या एखाद्या शिखराला आम्रकूट हें वैशिष्ट्य-दर्शक वर्णनपर नांव मिळालेलें असणें अगदीं स्वाभाविक व संभवनीय आहे. सातपुड्यांतलें एखादें शिखर आम्रकूट होऊं शकतें आणि मेकलांतलें शिखर आम्रकूट असणें शक्य नाहीं हा न्याय कुठला?

यांतली खरी गोम अशी आहे कीं, मिराशींना अमरकंटकचा कांटा दूर करावयाचा आहे. कारण तो त्यांच्या रामटेकला सलतो आहे म्हणून. अमरकंटक प्रस्थापित झाला, कीं रामटेकचें माहात्म्य संपलेंच! उलट आम्रकूट अमरकंटक ठरला, कीं आपोआपच रामगड हा रामगिरि ठरूं लागतो. याची जाणीव असल्यामुळें मिराशींनीं अमरकंटकवर आक्षेप काढले आहेत. पण ते फोल आहेत. दिशा, अर्थवर्णन व शब्दसादृश्य या सर्व दृष्टींनीं चपखल जमणारा अमरकंटक केवळ त्यांच्या रामटेकला जुळत नाहीं एवढ्या सबबीवर बाजूला सारतां येणार नाहीं.

आम्रकूटाचा उल्लेख अन्यत्र कोठेंहि आढळत नाहीं. त्यामुळें त्याला ओळखणें जड जातें. तथापि कालिदास मेघदूतांत त्याच्या खाणाखुणा देऊन चुकला आहे. त्यांवरून त्याला उघडकीस आणणें शक्य आहे.

आम्रकूट म्हणजेच अमरकंटक असे बहुतेक संशोधक मानतात. याबाबत पाहिली लक्ष वेधणारी गोष्ट या दोहोंमधील शब्दसाम्य व ध्वनिसादृश्य. पदव्युत्पत्तिदृष्टयाहि अमरकंटक पदभ्रष्ट होऊं शकत नाहीं. अमरकंटकला किंवा नर्मदेच्या उगमस्थानाच्या प्रदेशाला पूर्वी वंशगुल्म असेंहि नाव होतें. त्यावरून येथें बांबूंच्या बेटांची दाटी असावी असें दिसतें. आजहि अमरकंटकवर बांबू किंवा वंश मुबलक आहेत. शिवाय कंटक या शब्दाचा बांबू असाहि अर्थ आहे. तेव्हां आम्र आणि कंटक या तेथील वृक्ष-दर्शक नांवांचा संधि होऊन कालांतरानें आम्र याचा अमर असा अपभ्रंश होऊन अमरकंटक हें नांव सिद्ध झालें असण्याचीहि शक्यता आहे. आणखी एक गोष्ट अशी कीं, गोंडवनाच्या पूर्वभागाला पूर्वी महाकांतार असें म्हणत. या देशाच्या राजाला महाकांतारक व्याघ्रराज असें नांव होतें (अलाहाबाद येथील कोरीव शिलालेखः-समुद्रगुप्त-प्रशस्ति) कांतार किंवा कांतारक म्हणजे अरण्य. गोंडवन हा अरण्याचा भाग असल्यामुळें त्यावरूनच त्याच्या पूर्वभागाला महाकांतार हें नांव पडलें असावें. त्याचप्रमाणें या प्रदेशाच्या लगत पश्चिमेकडे असलेल्या मेकल-पर्वताच्या परिसरांतल्या अरण्यांत आम्रवृक्ष विशेषत्वानें असल्यामुळें त्यांला आम्र-कांतार किंवा आम्रकांतारक आणि नंतर अपभ्रंशाच्या घसरगुंडीनें हल्लींचें अमर-कंटक नांव पडलें असावें, असाहि संभव आहे.

आतां एक मनोरंजक प्रमाण सादर करतों. प्रथम आम्रकूटाच्या वर्णनाचा श्लोक पहा.

त्वामासारप्रशमितवनोपप्लवं साधु मूर्ध्ना
वक्ष्यत्यध्वश्रमपरिगतं सानुमानाम्रकूटः ।
न क्षुद्रोऽपि प्रथमसुकृतापेक्षया संश्रयाय
प्राप्ते मित्रे भवति विमुखः किं पुनर्यस्तथोच्चैः ॥

आणि आतां त्याच कवीच्या ऋतुसंहारांतील विंध्य पर्वताचें पावसाळ्यांतलें वर्णन पहा—

जलधरविनतानामाश्रयोऽस्माकमुच्चै-
रयमिति जलसेकैस्तोयदास्तोयनम्राः ।
अतिशयपरुषाभिर्ग्रीष्मवह्नेः शिखाभिः
समुपजनिततापं ह्लादयन्तीव विन्ध्यम् ॥ २७ ॥

—ऋतु० सर्ग २-२७

एकाच कवीचे दोन ठिकाणचे हे दोन श्लोक किती एककर्तृत्वप्रतिपादनोपयोगी आहेत, हें वेगळें सांगावयास नको. या दोन श्लोकांतील कल्पना-सादृश्य विस्मयजनक आहे. किंबहुना सादृश्य नसून एकच कल्पना दोन ठिकाणीं अवतरली आहे, असेंहि म्हणतां येईल.

एकाच प्रतिभेंतून, एकाच अनुभूतींतून हे दोन श्लोक निघालेले आहेत. किंबहुना त्याच अनुभूतींतून एकच श्लोक दोनदां स्फुरला, असेंहि म्हणतां येईल. ऋतुसंहारांत कालिदासानें विंध्यावरची वृष्टि वर्णन केली. रघुवंशांत रामचंद्रावर राज्याभिषेक होत असतांना त्याला विंध्यमस्तकावरचा जलाभिषेक आठवला (सर्ग १४·८). मग मेघदूतांतहि त्यानें त्याच प्रियपरिचित विंध्यावरचा तोच वणवा त्याच पर्जन्यवृष्टीनें शांत केलेला असणें शक्य नाहीं काय? आम्रकूट हें विंध्यांतलेंच शिखर असलें पाहिजे. आणि तेंहि नर्मदेच्या स्फुटितप्रवाह दृश्याच्या अलीकडचें. कारण पुढेंच विंध्याचा पायथा लागतो आणि नर्मदाप्रवाहाचें दृश्य दिसतें. कालिदासाच्या डोक्यांत आणि डोळ्यांपुढें विंध्य आहे, रामटेक किंवा सातपुडा नव्हे!

अशा रीतीनें ऐतिहासिक व भौगोलिक प्रमाणांनीं अमरकंटक किंवा त्याचें पूर्वटोंकाकडील शिखर हाच प्राचीन आम्रकूट ठरतो, यांत शंका नाहीं. तथापि आतां निरपेक्षपणें आणि तटस्थतेनें या प्रश्नाकडे उंचावरून एक विहंगमदृष्टि टाकूं या. असेंहि, वाचकहो, कालिदास भव्यतेचा भोक्ता आहे हें विसरतां कामा नये. उत्तुंग, अफाट, मोठाले पर्वत व त्यांच्या वरील दृश्यें, आकाश व समुद्र यांच्यासंबंधींचे देखावे आणि भव्य सृष्टिचमत्कार वर्णन करण्याची या कविश्रेष्ठाची हातोटी व आवड आहे. आपल्याला असें दिसेल कीं, तो भव्य मोठाल्या गोष्टींचें वर्णन करून राहिला आहे. मेघदूताचें कथानक जर काल्पनिक तर त्यांतील स्थल-मालिका निवडण्याला तो पूर्णपणें स्वतंत्र होता. तर मग तो आपल्या प्रारंभबिंदूकरितां अनोळखी, ठेंगणा व अप्रसिद्ध डोंगर वेंचून काढील कीं पूर्वपरिचित, उंच, वैशिष्ट्यपूर्ण व राम-संबंधानें सर्वतोमुखीं झालेला रामायण-प्रसिद्ध चित्रकूट (=रामगड) पसंत करील? आणि प्रवासांत विश्रांतीसाठीं सातपुड्यांतलें एखादें अज्ञात कोपऱ्यांतलें शिखर निवडील कीं रामगडापेक्षांहि उंच, भव्य व तीन महान् नद्यांचें उगमस्थान म्हणून पवित्र व प्रसिद्ध असलेला विस्तीर्ण गिरिराज पसंत करील? Little things please little minds ही म्हण कविवर्गासमुद्धां लागू पडेल. कालिदासाची बुद्धि व स्फूर्ति दांडगी आणि महत्त्वाकांक्षी होती. 'वचने किं दरिद्रता' हा न्याय निदान काव्याच्या प्रांतांत लागू करण्याइतकी योजकता व धडाडी त्याच्या अंगांत खासच होती. वर्णन करून करायचें मग तें भिकार गोष्टींचें कशाला? सकारण केलेले किरकोळ अपवाद सोडले तर असें प्रत्ययाला येईल कीं, कालिदासाच्या कवितेनें क्षुद्र वस्तूंना जवळ केलेलें नाहीं, त्याच्या प्रतिभेचा उंच मेघ

टेंगण्या रामटेकच्या पातळीइतका खाली येणार नाहीं. तो रामगडसारख्या गगनचुंबी व महनीय पर्वतालाच हत्तीसारखी टक्कर देणार !

## नर्मदेचें नक्षीदार दृश्य

१९. आम्रकूटानंतर थोडा रस्ता चालून गेल्यानंतर (तत्परं वर्त्म तीर्णः) *विंध्याच्या पायथ्याशीं तुला नर्मदा दिसेल असें वर्णन आहे ( श्लोक १९ ).* येथें नर्मदेच्या एका विशिष्ट दृश्याचें रेखाचित्र कवीनें फार सूक्ष्म व रमणीय काढलें आहे. त्यावरून या नर्मदा-दृश्याचें ठिकाण जबलपुरापाशीं ( मिराशी म्हणतात त्याप्रमाणें ) खात्रीनें नसून तें बरेंच अलीकडे म्हणजे अमरकंटकच्या नजीक पश्चिमेला आहे हें आम्ही पूर्वींच विस्तारानें दाखविलें आहे. (नर्मदाप्रवाहाचा मुद्दाम पुस्तकांत दिलेला नकाशा पहा.) या बहारीच्या नर्मदावर्णनांतलें काव्यकौशल्य अत्यंत उच्च दर्जाचें असून शिवाय त्याचा उपयोग स्थळ-निश्चयाला फार आहे. यातेरीज हें नर्मदादृश्याचें ठिकाण नक्की व निःसंदिग्धपणें ठरविण्यांत एक फार मोठें महत्त्व व लाभ आहे. कारण हें कोडें उकलण्यानें रामगिरीचें रहस्य उकलणार आहे. या श्लोकांत वर्णिलेल्या नर्मदा-स्थानाची जागा पक्की झाली, कीं स्वाभाविकपणेंच आम्रकूट हा अमरकंटक व रामगिरि हान रामगड ठरतो. म्हणून आम्ही या स्थळाची छाननी विशेष बारकाईनें व विस्तारानें करणार आहोत. खोलांत जाऊन या ठिकाणाचा पाया पक्का केला पाहिजे. प्रथम मूळ श्लोक व त्याचें मराठी भाषांतर पहा—

> रेवां द्रक्ष्यस्युपलविषमे विंध्यपादे विशीर्णां
> भक्तिच्छेदैरिव विरचितां भूतिमंगे गजस्य ॥

*आम्रकूटाची हद्द ओलांडून गेल्यावर पाषाणांच्या योगानें उंच-सखल* झालेल्या विंध्यपर्वताच्या पायथ्याशीं, अनेक फाटयात-प्रवाहांत-विखुरलेली नर्मदानदी हत्तीच्या शरीरावर काढलेल्या चित्रविचित्र पट्टयांच्या वेलबुट्टीसारखी दिसेल.

आतां प्रसिद्ध पुरातत्त्वज्ञ कै. प्रो. पाठक यांचें इंग्रजी भाषांतर पहा.

And traversing the road beyond Amrakut at a swifter pace by reason of the discharge of water, thou wilt see the Narmada **parted into streamlets** at the foot of the Vindhya rugged with stones and resembling the figures composed of the marks of pointed streaks on the body of an elephent.

वस्तुतः या श्लोकाचा अर्थ अगदीं स्पष्ट आहे. पण त्यांतहि मतभिन्नता आहे. म्हणून चर्चा केली पाहिजे. नर्मदेचें कोणतें दृश्य कवीला अभिप्रेत आहे? गज-शृंगारांत हत्तीच्या अंगावर बहुधा तांबड्या रंगाच्या (कारण त्याच्या काळ्या पाठीवर दुसरा रंग तितकासा खुलून दिसत नाहीं) चित्ररेखा किंवा आकृति काढतात त्याप्रमाणें नर्मदा नदीचा देखावा दिसणार आहे. असा देखावा कोणत्या ठिकाणीं दिसेल? जेथें नर्मदा अमरकंटकावरून खालीं उतरते व ज्या ठिकाणीं तिला आसपासच्या या डोंगराळ मुलखांतून अनेक जलौघ-प्रवाह-उपप्रवाह येऊन मिळतात, तेंच हें ठिकाण होय. नकाशांत (इंपी० गॅझे० प्लेट २२) मंडल नांवाचें गांव दाखविलेलें आहे. त्या ठिकाणी हे नर्मदेचे कित्येक उपप्रवाह एकत्रित व केंद्रित झालेले स्पष्ट दिसतात. भौगोलिक भाषेत ८० ते ८२ × २२ ते २३ या नकाशासारख्या चौकटींत नर्मदा-प्रवाहांचें हें जाळें फार स्पष्ट दिसतें, व सहज डोळ्यांत भरतें (मागच्या प्रकरणांतील नर्मदा-प्रवाहाचा नकाशा पहा[1]). मौज अशी कीं, येथून पुढें मात्र नर्मदेचा एकत्रित प्रवाह थेट अखेरपर्यंत बहुतांशीं चक एकेरी-एकच रेघ लांबच्या लांब काढल्यासारखा अखेरपर्यंत दिसतो! यावरून हें लक्षांत येईल कीं, या विशिष्ट ठिकाणचे हें दृश्य दिसावयाचें म्हणजे मेघाला पूर्वे-कडूनच अमरकंटकवरून पश्चिमेकडे आलें पाहिजे. याचाच अर्थ रामगड हाच रामगिरि! रामटेकहून निघून दक्षिण-उत्तर दिशेनें जबलपुरापाशीं येणाऱ्या मेघाला हें दृश्य दिसणें अशक्य आहे. त्यामुळें रामटेक निःसंदिग्धपणें चुकीचा व रद्द ठरतो. म्हणून आम्हीं प्रारंभीं म्हटलें होतें कीं, नर्मदेच्या स्फुटितप्रवाहांचें वर्णन हें गमक अतिशय बलवत्तर व निर्णायक असून रामटेकला नाशाबित करून रामगडला प्रस्थापित करण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं आहे.

आतां यांतील कालिदासाचें काव्यकौशल्य व उपमाचातुर्य पाहूं. तें बघावयाचें वरच्या प्रमाणाला पुष्टि मिळते म्हणून. जबलपुराच्या पुढचा नर्मदेचा एकेरी प्रवाह कवीला वर्णावयाचा नसून त्याच्या अलीकडील नर्मदेचे फाटे किंवा प्रवाहांचें जाळें कवीला अभिप्रेत आहे, हें आपल्याला त्याच्या उपमेवरून समजतें. हत्ती शृंगारतात

१ मेघमडलातून म्हणजे आकाशांतून खालीं पहात असतां हें दृश्य खरोखरीच कालि-दासानें वर्णिल्याप्रमाणे दिसतें, याची माहिती अकल्पितपणें आम्हास मिळाली. मुंबईचे वैमानिक कॅ० एन्. व्ही. जोगळेकर यांना अमरकंटक ते मंडल या भागांत असा देखावा हुबेहूब दिसतो. अीण पुढें मात्र नर्मदेचा प्रवाह एकेरी रेघेसारखा दिसतो, अशी माहिती सांगितली.

जलप्रवाहाला जें पावनत्व आलें तें जनकतनयास्नानानेंसुद्धां आलें नसेल. तें अश्रुजल नव्हतें–काळजाचें पाणी होतें, बंधुप्रेमाचें संगमतीर्थ होतें. ती भाऊ-भेट पहाणारा एकच साक्षीदार आज पायावर उभा आहे आणि तो म्हणजे आपला रामगड पर्वत.

## कालिदासाचें स्मारक रामगडावर हवें

कालिदास चार भिंतींत कोंडून घेऊन निसर्गाचीं वर्णनें करणारा रचनाकार नव्हता. तो निसर्गस्वरूपाशीं तन्मय होणारा, निसर्गाशीं जाऊन भिडणारा कवि होता. मेघदूतकाव्याची कल्पना व निदान काहीं भाग त्यानें या स्थळीं लिहिला हें मागें दाखविलें आहे. कालिदासाच्या काव्याचे आणि त्याचे स्वतःचे चरण देखील प्रस्तुत पर्वताशीं संलग्न आहेत हें निःसंशय. हें इतिहासप्रसिद्ध भौगोलिक स्थळ भारतीय परंपरेचें उंच शिखर होय. हे जसें पुण्यक्षेत्र तसेंच काव्य-तीर्थ. देवमानवांनीं अलंकृत तसेच निसर्गानें नटविलेलें. भारताला प्रिय आणि पवित्र असा हा पर्वत आहे. त्याची वाट आम्हांला मोकळी करून घेतली पाहिजे. हल्लीं बहुतेक नकाशांतूनसुद्धां या विचाऱ्याचें उच्चाटन झालें आहे ! यापेक्षां अधिक विधिवक्रता कोणती असूं शकेल ? वाट चुकलेल्या इतिहासाच्या लहरी राज्यांतून पदभ्रष्ट किंबहुना हद्दपार झालेल्या या अद्रिराजाला परत 'स्थानापन्न' करणें आवश्यक आहे. शेंकडों वर्षांची वहिवाट, रामायणाची साक्ष आणि कालिदासाचा लेखी पुरावा पहातांना हा राम-पदांचा मानकरी कोणाल्याहि नाशाबीत ठरविता येणार नाहीं. काळाला देखील स्वतःचीं पावलें बुजवितां येणार नाहींत ! भारताची दीर्घ ऐतिहासिक स्मृति, संस्कृति व परंपरा टिकण्याकरितां, हें ठिकाण आमचें श्रद्धास्थान व यात्रा-स्थळ बनावयास हवें. या प्राचीन व पडीत पुण्यक्षेत्राचा जीर्णोद्धार होण्यांत आमचा उद्धार आहे. पुराणवस्तु-संशोधन खात्यानें व सरकारनें या दुर्लक्षित स्थळाकडे लक्ष द्यावें. त्याची दुर्गमता दूर करून दर्शनसुलभता उत्पन्न करावी. म्हणजे विसरलेल्या राम-पदाची व रामभक्ताची पुन्हा एकदां गांठ पडूं लागेल. येथें मेघदूत रचणाऱ्या कविश्रेष्ठ कालिदासाचें स्मारकहि याच ठिकाणीं उभारावयास हवें, यातलें औचित्य आतां निराळें सांगावयास नको खरोखर कालिदासासारखे कवि स्मारकाच्या पलिकडले होत. जे विसरलेले असतील किंवा विसरण्यासारखे असतील त्यांचीं स्मारकें करावयाचीं ! जो कवि अजूनहि असंख्य वाचकांना रडवून व रंगवून सोडीत आहे, त्याच्या वेगळ्या स्मृति-स्तंभाचें काय प्रयोजन ? आपल्या करुणरसानें आजपर्यंत त्यानें कितीक रसिकांच्या डोळ्यांतून पाणी काढलें असेल ! सहृदयांच्या डोळ्यांतले ते अश्रुबिंदु नसून, कालिदासाला काव्यसाम्राज्याच्या सिंहासनावर सुप्रतिष्ठित करणाऱ्या त्या अभिषेकजलाच्या धाराच आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. रसिकांचीं उचंबळणारीं अंतःकरणें आणि डुलणारीं मस्तकें हीं कालिदासाचीं खरीं स्मारकें होत.

तथापि आदर्श व आदराचा विषय झालेल्या व्यक्तीविषयींच्या भावना प्रकट करणें असाहि एक हेतु स्मारकांच्या उभारणींत असूं शकतो. त्या दृष्टीनें कालिदासाच्या योग्य स्मारकाकरितां योग्य स्थळ हवें असेल तर तें रामगडचें उंच शिखर हेंच होय यांत शंका नाहीं. त्या महाकवीशीं व त्याच्या काव्यरचनेशीं निःसंशयपणें निगडित झालेलें याखेरीज दुसरें कोणतेंहि ठिकाण नाहीं. कालिदास येथें आला होता. हेंच मेघदूताचें जन्मस्थान आणि म्हणूनच तें स्मारक-स्थान होण्याला योग्य.

अशा रीतीनें हें रामगडचें स्फूर्ति-शिखर भारतवर्षाच्या उंचीचें प्रतीक व मानदंड बनून राहील. तेथें भरत-भेट आणि यक्ष-संदेश यांचे ऐतिहासिक काव्यमय देखावे आमच्या मनश्चक्षूंना दिसतील. राजा कसा असावा आणि कवि कसा असावा या दोन्ही आदर्शांचा साक्षात्कार या ठिकाणीं लोकांना घडेल. लग या ठिकाणाकडे बोट दाखवून म्हणेल कीं, हीच अयोध्येच्या रामाची त्यागभूमि आणि कालिदासाच्या काव्याची जन्मभूमि !

हें स्थळ–हें स्मारक, गतेतिहासांतील आदर्शांनीं व आठवणींनीं हर्षपुलकित झालेल्या भारतवासीयांच्या मनांत अभिमान व स्फूर्ति उत्पन्न करीत राहील. भविष्यकाळांत खर्च करण्याकरितांच भूतकाळ जमा करावयाचा असतो. इतिहास-ज्ञानाचें साफल्य त्यांतच आहे. म्हणून या जुन्या विषयाचा एवढा नवा प्रपंच. आपण ऐतिहासिक विकासप्रक्रियेंतील मर्म व वळण डोळसपणानें उचललें तर भूतकाळांतल्याप्रमाणेंच सात्त्विक व समर्थ संस्कृतीचा वैशिष्ट्यपूर्ण भविष्यकाळ नव्यानें अवतरेल आणि भारतवर्षाचा पुरातन महिमा जगांत पुन्हा एकदां प्रस्थापित होईल. एक दिवस असा उगवेल यांत शंका नाहीं.

* * *

तथापि आदर्श व आदराचा विषय झालेल्या व्यक्तीविषयींच्या भावना प्रकट करणें असाहि एक हेतु स्मारकांच्या उभारणींत असूं शकतो. त्या दृष्टीनें कालिदासाच्या योग्य स्मारकाकरितां योग्य स्थळ हवें असेल तर तें रामगडचें उंच शिखर हेंच होय यांत शंका नाहीं. त्या महाकवीशीं व त्याच्या काव्यरचनेशीं निःसंशयपणें निगडित झालेलें याखेरीज दुसरें कोणतेंहि ठिकाण नाहीं. कालिदास येथें आला होता. हेंच मेघदूताचें जन्मस्थान आणि म्हणूनच तें स्मारक-स्थान होण्याला योग्य.

अशा रीतीनें हें रामगडचें स्फूर्ति-शिखर भारतवर्षाच्या उंचीचें प्रतीक व मानदंड बनून राहील. तेथें भरत-भेट आणि यक्ष-संदेश यांचे ऐतिहासिक काव्यमय देखावे आमच्या मनश्चक्षूंना दिसतील. राजा कसा असावा आणि कवि कसा असावा या दोन्ही आदर्शांचा साक्षात्कार या ठिकाणीं लोकांना घडेल. जग या ठिकाणाकडे बोट दाखवून म्हणेल कीं, हीच अयोध्येच्या रामाची त्यागभूमि आणि कालिदासाच्या काव्याची जन्मभूमि!

हें स्थळ–हें स्मारक, गतेतिहासांतील आदर्शांनीं व आठवणींनीं हर्षपुलकित झालेल्या भारतवासीयांच्या मनांत अभिमान व स्फूर्ति उत्पन्न करीत राहील. भविष्यकाळांत खर्च करण्याकरितांच भूतकाळ जमा करावयाचा असतो. इतिहास-शनाचें साफल्य त्यांतच आहे. म्हणून या जुन्या विषयाचा एवढा नवा प्रपंच. आपण ऐतिहासिक विकासप्रक्रियेंतील मर्म व वळण डोळसपणानें उचललें तर भूतकाळांतल्याप्रमाणेंच सात्त्विक व समर्थ संस्कृतीचा वैशिष्ट्यपूर्ण भविष्यकाळ नव्यानें अवतरेल आणि भारतवर्षाचा पुरातन महिमा जगांत पुन्हा एकदां प्रस्थापित होईल. एक दिवस असा उगवेल यांत शंका नाहीं.

* * *

# प्रमुख संदर्भग्रंथ व लेख


वाल्मीकि-रामायण

इतर रामायणें (विशेषतः बौद्धांचें दशरथजातक)

महाभारत

जातकग्रंथ

उत्तररामचरित-भवभूति

मेघदूताच्या विविध आवृत्त्या व भाषांतरें टीकाग्रंथ-प्राचीन व आधुनिक.

गव्हर्नमेंट डिस्ट्रिक्ट गॅझेटियर्स

Story of Ramayan-चिं. वि. वैद्य.

India in Kalidas-प्रो. उपाध्याय.

मॉडर्न रिव्ह्यू १९१५ (श्री. असित हल्दार यांचा लेख, Ramagadh Hill).

वनश्री-दर्शन व पक्षीदर्शन (डॉ. आपटे)

संस्कृत कोश (श्री. वामन शिवराम आपटे)

रघुवंश

ऋतुसंहार

कालिदासाचीं इतर काव्यनाटकें-विशेषतः -रघुवंश

मेघदूत-(साहित्य अकॅडमी, दिल्ली यांची सरकारी आवृत्ति)

मेघदूत-एक अध्ययन (हिंदी)-पंडित वासुदेवशरण अग्रवाल.

Statistical Account of Bengal-Sir W. Hunter

Kol Tribes of Central India.

संशोधनमुक्तावलि-सर पहिला-प्रो. मिराशी

रामकथा-उत्पत्ति और विकास-फादर बुल्के.

भारत और उसके निवासी (हिंदी) -जयचंद्र विद्यालंकार.

विष्णु-पुराण, मार्कण्डेय-पुराण, पद्म-पुराण व इतर पुराण-ग्रंथ, पार्श्वाभ्युदय इ. इ.

Geographical Dictionary-डॉ. नंदलाल डे.

Geographical Dictionary-डॉ. बी. सी. लॉ.

Early History of the Deccan-डॉ. भांडारकर.

Bhasa Problem-डॉ. पुसाळकर.

The Origin and Development of Dutakavya Literature in Sanskrit-चिंताहरण चक्रवर्ति.


## स्फुट लेख


पार्जिटर : The Geography of Rama's Exile. (I. R. A. S. 1894).

मेघदूतावरून कालिदासाविषयीं (साहित्य-संग्रह, भाग १ ला —शि. म. परांजपे).

श्री. आबासाहेब चांदोरकर यांची छापलेली मुलाखत. (रविवार सकाळ, ता. २६-७-५३)

Kalidasa And Music (Paper read by Sardar G. N. Mujumdar at the first Oriental Conference in 1919).

# सूचि

## ग्रंथांतील विषय

—

## चित्रें व नकाशे



क्रमांक ४,५ व ६ हीं रेषाचित्रें आहेत. कलकत्याचे प्रसिद्ध चित्रकार श्री. असित हलदार हे १९१४ सालीं रामगड-सफरीला गेले होते. त्यांनीं काढलेलीं हीं स्केचेम् मॉडर्न रिव्ह्यूच्या अंकांत (सन १९१५ पृ. ३७९) प्रसिद्ध झालेलीं आहेत. त्यांवरून हीं रेषाचित्रें तयार केलीं आहेत. क्र. ७ हा मूर्तीचा फोटो छत्तीसगड गव्हर्मेंट गॅझिटीयरमधील आहे. क्र. २ व ३ हे नकाशे गॅझेटीयर-वरून घेतलेले आहेत. क्र. ८ चा नकाशा भूगोलशास्त्रावरील पुस्तकांतील आहे.

---

* रामगडवरील देवळांत सीता रामाच्या उजवीकडे आहे. दुसऱ्या कोणत्याहि रामाच्या देवळांत अगर चित्रांत असें दिसत नाहीं. 'वामांकारूढ सीता' प्रसिद्ध आहे. वास्तविक पत्नीची जागा पतीच्या डाव्या हाताला हें शास्त्र व रूढि फार जुनी आहे. यजयागादिकांच्या मंत्रांत व प्रयोगांतहि ती सांपडते. तात्पर्य, पत्नीची डावी-कडची जागा पक्का व शास्त्रविहित होण्याच्या पूर्वीच्या काळांतल्या या मूर्ति असल्या पाहिजेत, असा निष्कर्ष निघतो. एवंच, या मूर्ति फारच प्राचीन आहेत, याबाबत संशय रहात नाहीं.

## कोष्टकें

पृष्ठ



